






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










वर्ष १५ वें : डिसेंबर '५९ + जानेवारी १९६०

# दीपावली

## श्रेयनामावलि







संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. 

अनुक्रमणिका










# मराठ्यांचें गुणावगुण आणि ब्राह्मणांच्या वर्चस्वाची कारणें

[ भारतीय जनतेच्या स्वभावविशेषांचा आणि गुणावगुणांचा अभ्यास ब्रिटिश राज्यकर्त्यांएवढा बारकाईनें कोणीच केला नसेल. विशेषतः इंग्रजांचा मराठी राजकारणाशीं जेव्हां निकट संबंध आला तेव्हां इंग्रजांनीं मराठ्यांच्या स्वभावाचा आणि कर्तृत्वाचा अभ्यास करून आपलें पुढील धोरण आंखलें. पेशवाईच्या अखेरीस १७८७ मध्यें पुण्यास येऊन राहिलेल्या चार्लस मॅलेट या ब्रिटिश वकिलानें कलकत्त्यास गव्हर्नर जनरलला पाठविलेल्या पत्रांतील मजकूर मोठा उद्बोधक आहे. ]

२ नोव्हेंबर १७८६ च्या पत्रांत चार्लस मॅलेट म्हणतो— "मराठ्यांची प्रकृति लढाईला अनुकूल नाहीं. ( लढाई नको असें त्यांना मनापासून वाटतें. ) या राज्याचे सूत्रधार जे ब्राह्मण त्यांच्या एकंदर धोरणाला लढाई मानवत नाहीं. ( मॅलेटच्या मतें मराठेशाही म्हणजे ब्राह्मणाचें राज्य ) मराठा सैनिकांना लूटमारीचा धुमाकूळ आवडतो, प्रत्यक्ष आत्मरक्षणाची (defensive) लढाई तितकीशी त्यांना पसंत पडत नाहीं. ब्राह्मण पुढारी आपली फौज जेव्हां शत्रूच्या पैशानें पोसण्याचा संभव दिसतो तेव्हांच स्वारी शिकारीला पाठवतात."

२९ मार्च १७८८ च्या पत्रांत त्यानें ब्राह्मणांच्या वर्चस्वाचीं एकूण ९ कारणें नमूद केली आहेत. तो म्हणतो—" मराठी सरदारांना ब्राह्मणांचा वरचष्मा नकोसा वाटतो. व ब्राह्मण मराठे सरदारांवर आपलें वर्चस्व टिकविण्याचा प्रयत्न करतात. ब्राह्मणांच्या वर्चस्वाची कारणें पुढील प्रमाणें. १ लेखणीचें प्रभुत्व, २ निरलस उद्योग ३ कारभाराचा पद्धशीरपणा व दक्षता, ४ राज्यांतील उपकारक स्वरूपाचे अधिकार ( जहागिरी व इनामें देण्याचा अधिकार ) ५ लहान मराठे जहागीरदारांवरील सत्ता. ६ सर्व सरदारांच्या घरांतल्या कारभारांमध्यें ब्राह्मणांचें अस्तित्व ७ मराठी घराणीं निर्वंश झाल्यास त्यांची जागा भरून काढण्यासाटीं लागणारी शिपाईगिरी ८ ब्राह्मणांनीं उदयास आणलेल्या सरदारांची त्यांच्याविषयींची निष्ठा ९ आणि ब्राह्मणांविषयीं बहुजन समाजाला धर्मदृष्ट्या वाटणारी भीति.

• • •








भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ९ **दत्त दिगंबर.**

माला कमण्डलुधरः करपद्मयुग्मे ।
मध्यस्त पाणियुगले डमरू त्रिशूले ।
यस्यस्त ऊर्ध्वकरयोः शुभशंख चक्रे ।
वन्देतमत्रिवरदं भुजषङ्कयुक्तम् ॥

माला आणिक कमंडलू या दोन्ही करकमली धरलेली
डमरूसह हे त्रिशूळ धरिले मध्य-स्थित या पाणी-युगली
दोन्ही उर्ध्वकरातुनि ज्यांच्या शुभ-शंखासह चक्र गरगरे
'सहाभुजां'ना नित्य वंदि तू तारिल तारक तीन-वरे
— लोककवि **श्री. मनमोहन**

अनुक्रमणिका



# भारतीय लोकनृत्यें

( मध्यप्रदेश )

मध्यप्रदेशामध्यें बऱ्याच आदिवासी जमाती राहातात. त्यांतील भिल्ल आणि वंजारा, या, लोकनृत्याच्या दृष्टीनें फार महत्वाच्या. विशेषतः भिल्ल जमात ही रांगडी आणि रसिक आहे. त्यांची नृत्यें मोठी चित्रविचित्र आणि विलोभनीय असतात. भिल्ल पुरुष 'डगला' नांवाचा एक नृत्यप्रकार स्वतःच्या मनरंजनासाठीं करीत असतात तो सर्वत्र लोकप्रिय आहे. 'पाली' नांवाचें एक लोकनृत्य स्त्रीपुरुष मिळून करेतात.

वंजारा जमातीचे 'लांगी' नांवाचें एक लोकनृत्य श्रावणांत केलें जातें. या लोकनृत्याला पार्श्वभूमीदाखल गीतें गायिली जातात. त्यांत पृथ्वीराज चौहानाच्या शौर्याची कहाणी गायिलेली असते. 'घेरो' नामक एका लोकनृत्यांत पुरुष एकमेकाच्या खांद्यावर हात ठेऊन सांघिकपणें नाचतात. पण यापेक्षां त्यांचा 'कामचीनो' नांवाचा नाच मोठा आकर्षक आहे. या नाचांत सात आठ पुरुष वर्तुळाकार उभे राहातात आणि प्रत्येकाच्या खांद्यावर एक पुरुष बसलेला असतो.

होळीमध्यें वंजारा जमात फार मोठ्या उत्साहानें भाग घेते. एकमेकांच्या अंगावर यथेच्छ रंग उडविल्यावर ते 'फाग' नांवाचें एक लोकनृत्य करतात. हातांत तरवारी घेतात आणि वेहोषपणें नाचतात. त्याप्रसंगीं एक पुरुष स्त्रीचा वेष धारण करतो व कांहीं दूर अंतरावर पार्श्वभूमीदाखल गाणीं म्हणतात.

वंजारा जमातींत स्त्रीपुरुषांची सांघिक नृत्यें होत नाहींत. स्त्रिया स्वतंत्रपणें नाचतात. स्त्रियांचा 'लोटा' आणि 'सौन्दर्य' नामक दोन नृत्यें फार लोकप्रिय आहेत. विशेषतः 'लोटा' नृत्यांत स्त्रिया डोकीवर पाण्यानें भरलेली कळशी ठेवतात. आणि नाचतांना ही कळशी खालीं पडूं न देण्याची पराकाष्ठा करतात आणि यामुळेंच हा नाच पाहातांना प्रेक्षक तल्लीन होतात. सौन्दर्य नृत्यांत स्त्रियांचे दोन विभाग करतात आणि या जोड्या समोरासमोर उभ्या राहून एकमेकांच्या हातावर टाळ्या मारत मागेंपुढें नाचतात आणि गाणीं म्हणतात.

'करमा' नांवाचें एक लोकनृत्य मध्यप्रदेशच्या उत्तर आणि मध्यभागांत राहाणाऱ्या वैगा नामक आदिवासी जमातींत फार लोकप्रिय आहे. दसऱ्यालाच प्रामुख्यानें हें नृत्य केलें जातें. नाचणारे स्त्री-पुरुष आकर्षक पोशाख करतात, फुलांचे हार गळ्यांत घालतात आणि एका वर्तुळांत उभे राहातात. वर्तुळाच्या मध्यभागीं ढोलकीवाले उभे राहातात. आणि या ढोलकीच्या तालावर साभिनय पदन्यास सुरू होतो. पुढें पुढें त्याला विलक्षण गति प्राप्त होते. नर्तक अगदीं बेभान होतात. जणूं वादक आणि नर्तक यांच्या गतींतच स्पर्धा चालते आणि कोणी कुणाला हार जात नाहीं. त्यामुळें नृत्याला एक विलक्षण रंग चढतो. या नृत्याशीं आजूबाजूला गर्दी केलेले प्रेक्षक हि समरस होतात आणि त्यांच्या प्रोत्साहनानें नर्तकांना नृत्याची नशाच चढते जणूं!

—कथा-कलि














# ❋ सगुण दत्तभक्ति ❋

वासूकाकांसारखा दत्तभक्त अन्य कुणी मी पाहिला नाहीं. आतां तर त्यांची " दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान। हरपलें मन झालें उन्मन॥ " अशी खरोखरीची अवस्था झालेली आहे आणि हें सारें व्यवस्थित आणि सावधानपणें प्रपंच करून! कृष्ण भक्त, विष्णु भक्त, शिव भक्त अशी निरनिराळ्या देवांची भक्ति करणारे इतर लोक पुष्कळ होते; परंतु वासूकाका त्यांच्यांत उठून दिसत. आपल्या दैवताची उपासना ते पद्धतशीरपणें करीत असत. त्यांत वक्तशीरपणाहि असे. समयाप्रमाणें राग गायले जावे, तसें भल्या पहांटे आंघोळ करून ते गुरुचरित्राचे दोन अध्याय वाचींत. 'नामधारक म्हणे सिद्धासी। पुढील कथा वर्तली कैसी। विस्तारोनि सांग आम्हासी। कृपा करोनी गुरुवर्या॥' इथपासून 'इतिश्री गुरुचरित्र। परम कथाकल्पतरू। श्री नृसिंहसरस्वतीउपाख्याने। सिद्धनामधारकसंवादे '...या खड्या सुरांत वाचलेल्या ओव्या कानावर पडत. त्यांचें " इंदुकोटिचंडकिर्ण सिंधुभक्त वत्सलम्। वंदनामि नारसिंह सरस्वतीशपाहिमाम्।" हें गीत ऐकतांना आतां सकाळचे ६ वाजले आहेत असें खुशाल समजलें जात असे. गुळाच्या ढेपीएवढा उन्हाचा तुकडा, सूर्यदेव ओसरीच्या खिडकींतून आंत टाकी, ती आठ वाजल्याची खूण होती. त्यावेळीं वासूकाका दत्ताशीं भांडत बसलेले असत. " सुदर्शनाची धार मोडली। कीं गदा समुद्रांत पडली। म्हणोनि माझी करुणा न आली। कृपासमुद्रा स्वामिया॥ आतांच देईं अभयदान। शरण शरण नारायण। कांहींच माझे दोषगुण। पाहूं नको दयाळा। आशा लावुनि निराशा करणें। शरणांगतातें त्यागणें। आणि त्रीदें मिरवणें। हें केंवि साजे सर्वेशा ?"

दुपारीं " त्रि गु णा त्म क त्रै मू र्ति " ही आरती होई, आणि " येईं या गुरुराया, मज वे पदरीं " या गीतानें सायंकाळ होई. मार्गशीर्ष हा वासुकाकांचा महिना, माझ्या मार्गशीर्षाला अमुक पाहिजे माझ्या मार्गशीर्षाला तमुक पाहिजे. चांगलें लोणचें मार्गशीर्षाला ठेवा, चांगलें सर्व कांहीं मार्गशीर्षाला पाहिजे. असें वर्षभर स्तोत्र चाललेलें असे. कारण त्या मार्गशीर्ष पौर्णिमेला त्यांच्या दत्ताचा जन्म होई त्यादिवशीं समाराधना असे. मार्गशीर्षातल्या प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत ते कडकडीत व्रत पाळीत. एक वस्त्रानें रहाणें, एकवेळ आहार, जमिनीवर झोंपणें, आणि गुरुचरित्राचा सप्ताह हें दरवर्षी असे. दत्तजयंतीच्या दिवशीं दत्त जन्माची कथा ते अत्यंत रसाळ पद्धतीनें सांगत. जणुं तो प्रसंग त्यांनीं प्रत्यक्ष पाहिला होता.

"अरे हा देवर्षी—म्हणजे कळीचा नारद—तो तिन्हीं लोक फिरून फिरून दमला. कारण त्याला कलह असा कुठेंही आढळला नाहीं. पृथ्वीवर तो आला तेव्हां अत्रीची भार्या अनसुया हिनें त्याचें अत्यंत चांगलें स्वागत केलें. तिला आशीर्वाद देऊन तो तडक कैलासाला गेला आणि स्वतःच्या सद्गुणाबद्दल अत्यंत गर्वयुक्त असणाऱ्या

अनुक्रमणिका







पार्वतीजवळ त्यानें अनसुयेची स्तुति केली. आपल्याहून श्रेष्ठ अशी अन्य स्त्री आणि शिवाय ती पृथ्वीतलावर आहे हें तिला सहन झालें नाहीं. तिच्या मनांत असुया उत्पन्न झाली. कांहींतरी करून या अनसुयेचें सत्व हरण केलें पाहिजे म्हणून शिवाजवळ तिनें हट्ट धरला.

कैलासावरून नारद ब्रह्मलोकाला गेला आणि ब्रह्मपत्नीच्या मनांत किल्मिष उत्पन्न करून तो वैकुंठाला जाऊन लक्ष्मीलाही त्यानें चाळवली. झालें ! ब्रह्मा, विष्णु, महेशाच्या स्वाऱ्या स्त्रीहट्ट पुरविण्यासाठीं ब्राह्मणाच्या रूपानें अत्री ऋषींच्या आश्रमापाशीं टळटळीत दुपारीं येऊन 'भिक्षांदेही' म्हणाल्या. त्यावेळीं अनसुया आंघोळ करीत होती. "थांबा मी विवस्त्र आहें, एवढी आंघोळ पुरी करतें आणि तुम्हाला इच्छाभोजन देतें" असें ओरडून तिने सांगितलें. "असेल तशी बाहेर येऊन भिक्षा वाढ नाहींतर आम्हीं शाप देऊं" असे शब्द बाहेर उभ्या असलेल्या त्या तिन्हीं ब्राह्मणांनीं उच्चारतांच पतिभक्तपरायण अशा त्या पतिव्रतेनें मनांत पतीचरणांचें चिंतन केलें आणि आंतूनच ती म्हणाली, "तुम्हीं काय, मला लहान बालकांसारखेच आहांत, ही पाहा मी आलें भिक्षा घेऊन"

आणि बाहेर येऊन तिनें पाहिलें तों तीन बालकें त्या आश्रमाच्या ओसरीवर खेळत असलेली तिला दिसलीं. इतक्यांत अत्री ऋषि अनुष्ठान आटोपून आश्रमांत आले. अंतर्ज्ञानानें त्यानी सगळा प्रकार जाणला. आणि तिन्ही बालकांचें संगोपन करण्यास पत्नीस अनुज्ञा दिली. एवढा लहानसा हट्ट पुरविण्यासाठीं पृथ्वीवर गेलेले आपले नवरे, कित्येक दिवस परत न आलेले पाहून देवपत्न्यांचें भाबें दणाणलें डोळ्यांत प्राण आणून त्या प्रतीक्षा करीत होत्या. इतक्यांत पुनश्च देवर्षींची स्वारी हजर झाली आणि, तिघींचे नवरे बालरूपानें अनसुयेच्या घरी खेळतानां प्रत्यक्ष पाहिल्याचें त्यांनीं या देवपत्नीना सांगितलें. पश्चात्तापदग्ध अशा त्या तिघीही अत्रींच्या आश्रमांत येऊन अनसुयेजवळ आपल्या पतीचें दान मागायला लागल्या. अत्री अनसुयेनें ब्रह्मा-विष्णु-महेशाची स्तुति करून त्यांना आपलें पूर्वीचें रूप घ्यायची विनंति केली. आणि तिघानींही पुनश्च आपलें रूप धारण करून प्रसन्न होऊन अनसुयेला वर मागायला सांगितला. आपल्या अंगावर वाढत असलेलीं हीं बालकें आतां आपल्याला सोडून जाणार या विचाराने अनसुया दुःखी झाली होती. तिचें मनोगत जाणून देवानीं एकरूप होऊन तीन शिरें, सहा हात असलेला एक पुत्र अनुसुयेला दिला. तोच हा दत्तात्रय. दत्त म्हणजे दिलेला, दत्तक, दैवाने लाभलेला. अचानक येऊन उभा राहिलेला म्हणून त्याचें नांव दत्त. त्रिमुखी म्हणून दत्तात्रेय, आणि उघडाबंब लंगोटी लावलेला म्हणून तो अवधूत. परंपरागत चालत आलेली दत्तात्रेय जन्माची अशी ही एकच कथा. आणखीही कथा आहेत; परंतु त्या ओढून ताणून कल्पनेनें रंगवलेल्या वाटतात. महाभारतांतील अनुशासन पर्वांत, अत्रीला तीन पुत्र होते. त्यापैकीं एक दत्त हा असून अत्रीचा पुत्र म्हणून दत्त-आत्रेय या नांवांतें विख्यात झाला, अशी कथा आहे, तर कांहीं ठिकाणीं दत्त हा एक ऋषि असून त्याला 'निमि' नांवाचा एक पुत्रही होता अशी आख्यायिका आढळते. सृष्टीक्रमानुसार नऊ मास गर्भवास भोगून मार्गशीर्षाच्या पौर्णिमेस अनुसुयेला पुत्र झाला. तोच दत्त, असा स्कंदपुराणांत उल्लेख आढळतो.

श्रीपादयति, नृसिंहयति, नरहरियति असे तीन दत्तसांप्रदायिक झाले. त्यांनीं दत्तभक्तीचा बराच प्रसार केला. भाविक लोक त्यांना दत्ताचे अवतार मानतात. गाणगापूर, नरसोबाची वाडी आणि औदुंबर हीं दत्ताचीं राहाण्याची ठिकाणें. गोव्यांत सांखळी, म्हैसुरांत चिकमंगळूर, अबू, गिरनार, सातारा जिल्ह्यांतलें अखलकोप हीं दत्ताचीं जाज्वल्य स्थानें. आजच्या या कलियुगांत साक्षात्कारी दैवत असें हेंच एक.

तशा निष्ठेनें गुरुचरित्राचा सप्ताह केला तर सातव्या दिवशीं स्वप्नांत किंवा जागतावस्थेंत तुम्हांला दृष्टांत हा मिळालाच पाहिजे. तशा शुचिर्भूत, शुचिष्मंत वृत्तीनेंच दत्त भक्ति करावी लागते. समीप असलेलीं चार श्वानें हे चतुर्वेद, आणि पाठीमागें असलेली गाय ही कामधेनु आहे."

नानुकाकानीं त्यावेळी प्रतिवर्षी सांगितलेलें हें कीर्तन अजून माझ्या लक्षांत आहे. जिथें जिथें म्हणून दत्ताचें स्थान आहे, तिथें तिथें ते जाऊन आले होते. त्यांची दृष्टि संशोधक होती, तशीच आधुनिकहि होती, कुणीही गोसावी जोगडा हा दत्तावतारी आहे असें त्यांनीं मानलें नाहीं. "तुम्ही दत्तभक्ति करूं नका, हा प्रपंची माणसाला लंगोटी लावतो" असेंही ते म्हणत असत. ते श्रद्धाळू होते; परंतु अंधश्रद्धा त्यांच्यापाशीं नव्हती. त्या भक्तीचे स्तोम त्यांनीं कधीं माजवलें नाहीं. "प्रपंच सोडून परमार्थ कराल। तेणें तुम्हीं कष्टि व्हाल। प्रपंच परमार्थ चालवाल। तरी तुम्ही विवेकी" असे ते नेहमीं सांगत असत. "दत्त भक्तीनें अंगीं निष्ठा बळावते, सत्व, रज, तम हे

(पान ९ वर)

## या महिन्यातील माननीय व्यक्ति



झुंजार सेनानी-सव्यसाची मुत्सद्दी

## प्रे. आयसेनहॉवर

शिपाईगिरी आणि मुत्सद्दीपणा यांचें नेहमींच साहचर्य असतें असें नाहीं. शिपाई हा शिस्तीचा ताबेदार आणि राजकारणी हा स्वतःचा ताबेदार असें प्राचीन काळापासूनचें लोकप्रिय समीकरण आहे. पण आज जमाना पालटला आहे. इजिप्त पाकिस्तानपासून तों अमेरिकेपर्यंत अनेक राष्ट्रांचें राजकारण शिपाईगडी अगदीं शिस्तींत चालवित आहे.

अमेरिकेचे अध्यक्ष श्री. आयसेनहॉवर हे नामांकित सेनानी. आयुष्याची चाळीसांहून अधिक वर्षे रणांगणावर काढलीं आणि आतां तितक्याच उत्साहानें राजकीय रणांगणावर अमेरिकेचें नेतृत्व यशस्वी रीतीनें करीत आहेत.

आयसेनहॉवर हे मूळचे शेतकरी. शालेयशिक्षण चालू असतां त्यांचा उरलेला सारा वेळ शेतींतच गेलेला. पण अमेरिकेला कर्तबगार शेतकऱ्यांपेक्षां कर्तबगार सेनानी आणि लोकप्रिय अध्यक्ष पाहिजे होता म्हणूनच कीं काय एका मित्राच्या सल्ल्यानें ते सैन्यांत शिरले आणि हळूहळू चढत चढत दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं हिटलरशीं मुकाबला करणाऱ्या दोस्तांच्या सेनेचे प्रमुख झाले.

असा हा खंदा लढवय्या आज अमेरिकेसारख्या धनवान-सुवर्णभूमीचा अध्यक्ष असला तरी अत्यंत साधा माणूस आहे — यावर कुणाचाच विश्वास बसायचा नाहीं. फावल्यावेळीं आपल्या आवडीचे पदार्थ तयार करणं यांत त्यांना मनमुराद आनंद लाभतो. आयसेनहॉवरना चित्रकलेचाहि नाद आहे. पण चित्रकारापेक्षां ते उत्तम स्वैंपाकी आहेत हें निश्चित ! यासाठीं व्हाइट हाऊसच्या वरच्या मजल्यावर अध्यक्षांच्या फावल्यावेळासाठीं एक स्वतंत्र स्वैंपाकगृह तयार करण्यांत आलें आहे. आयसेनहॉवर यांनीं तयार केलेलें जेवण जेवून तृप्त झालेला एक पत्रकार म्हणाला—That man is a walking recipe book

ऑफीसच्या फायली आणि गोल्फ यांतून मुक्त झाल्यावर आयसेनहॉवर कुंचला घेऊन बसतात. अर्थात् आपल्या चित्रकौशल्याबद्दल त्यांचें स्वतःचेंच चांगलें मत नाहीं. आपल्यापेक्षां चर्चिल हेच अधिक उत्तम चित्रकार आहेत अशी त्यांची खात्री आहे.

आयसेनहॉवर यांचे बारीकसारीक गोष्टींत लक्ष असतें. इतका चिकित्सक अध्यक्ष अमेरिकेला अजून तरी लाभलेला नाहीं.

विशेषतः खाण्यापिण्याच्या बाबतींत ते फारच चोखंदळ आहेत. थ्रॉम्बासिसचा आजार येण्यापूर्वी आयसेनहॉवर यांची एक जबरदस्त खवय्या म्हणून ख्याति होती. ज्या दिवशीं ते आजारी पडले त्या दिवशीं यांनीं खाण्याचा विक्रमच केला होता.

आयसेनहॉवर यांचा दुसरा नाद म्हणजे ब्रिजचा खेळ. कलबर्स्टन या नामांकित ब्रिजपटूनें आयसेनहॉवर यांच्याशीं एकदां ब्रिज खेळल्यानंतर असे उद्गार काढले कीं—आयसेनहॉवर हे अमेरिकेंतील एक उत्कृष्ट ब्रिज खेळाडू गणले जावेत.

आपल्या राजकीय जीवनांतहि आयसेनहॉवरनीं आपली धार्मिक वृत्ति सोडलेली नाहीं. त्यांच्या प्रत्येक कॅबिनेट मिटिंगची सुरुवात प्रार्थनेनें होते. ते आंत येतांच सर्व सेक्रेटरी उभे राहातात आणि प्रार्थना संपेपर्यंत खालीं बसत नाहींत.

आयसेनहॉवर यांचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ते कोणताहि निर्णय तडकाफडकी घेत नाहींत. पण एकदां एखादा निर्णय घेतला कीं त्याला अखेरपर्यंत चिकटून राहातील.

पण इतकं असूनहि ते अत्यंत साधे निगर्वी आणि सतत आपल्या मर्यादांची जाणीव ठेवणारे आहेत.

आणि यामुळें 'आईक' ही व्यक्ति अमेरिकेंतच काय पण जिथें जाईल तेथें उदंड लोकप्रियता मिळविते.

---

तीन गुण सर्व प्राणीमात्रांस खेळवीत असतात या तिन्ही गुणांच्या आहारीं जाऊन भलभलती कृत्यें आपल्या हातून घडूं नये म्हणून निष्ठेनें ही त्रिगुणात्मक त्रैमूर्तीची भक्ति मी करतों ! धनदौलत मागून तुम्ही त्या दैवताचा उपमर्द करतां. स्वतः तो 'भिक्षू' आहे. त्याच्याजवळ तुम्ही धनाच्या अपेक्षेनें कां जातां ? गाणगापूरला गेलांत तर तिथें भिक्षा मागूनच उदरंभरण केलें पाहिजे, असा दंडक आहे." वासूकाका असें पुष्कळ बोलत आणि पुनश्च मिळेल त्या वेळीं तोंडांत घोळत असलेल्या स्तोत्राला वाट मोकळी करून देत. "दत्तात्रेयो हरि कृष्णो उन्मादोनंददायका !"

महर्षि कर्व्यांपेक्षां वासूकाका वयानें थोडेसे लहान आहेत. कांहीं वर्षांपूर्वी मी गांवीं गेलों होतों त्यावेळीं ते मला भेटले होते. सगळा प्रपंच त्यांनीं आपल्या मुलांच्या हवालीं केलेला आहे. आणि दत्त-नामामृतांत ते विलीन झालेले आहेत. येतांना मला त्यांनीं उपदेश केला होता. "दुष्कृत्यें करून तीं निस्तरण्याकरितां दत्ताला शरण जाऊं नकोस. कारण ती उग्रमूर्ति क्षमाशील नाहीं, आपल्याकडून सुकृत्यें वाढावीं म्हणून दत्ताला शरण जा !"

— **अनंतकुमार**

...वासू माझा मित्र होता. जिवाभावाचा होता. त्याने माझा हात आपल्या



अच्युत बर्वे

मा मा भटाच्या हॉटेलांतून मी मोठ्या खुषींत बाहेर पडत होतों. नुकत्याच चापलेल्या बटाटेवड्याची चव अजून जिभेवर रेंगाळत होती. कितीतरी दिवसांनीं मला मनासारखे वडे खायला मिळाले होते. एका पाठोपाठ एक असे चार वडे मी फस्त केले होते. तृप्तीची ढेंकर दिली होती, पैसे चुकते केले होते आणि हॉटेलच्या बाहेर पडत होतों. मी रस्त्यावर आलो आणि वासू दृष्टीस पडला. मलाही त्यानें पाहिलें असावें कारण झपाझप चालत तो माझ्याच दिशेनें येत होता. तो येत आहे असें पाहून खिशांतला रुमाल काढला, चेहरा साफ केला आणि चेहऱ्यावर हंसू खेळवीत त्याच्याकडे पाहूं लागलो. आल्या आल्याच त्यानें म्हटलें
" तुझ्या घरीं जाऊन आलों–"

" तुला उगाच हेलपाटा पडला " मी असें बोलल्यावर हा विषय वास्तविक तेवढ्यावरच संपावयास हवा होता. पण माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून त्यानें म्हटलें,

" मला वाटलं रविवारचा दिवस तेव्हां तूं घरीं असशील, टाईम्स वाचीत असशील."

" मी टाईम्स वाचीत नाहीं–"

" शूः ! हळूं बोल. कुणी ऐकेल "

" कुणी ऐकलं तर काय झालं ? मी टाईम्स वाचीत नाहीं ही गोष्ट खरी आहे–"

"वाचीत नसलास तर वाचला पाहिजे. इव्हज् वीकली, ऑन लुकर, फेमीना, ट्रेंड अशी साप्ताहिकं मासिकं तूं वाचलो पाहिजेस—"

" कारण ? "

" कारण मी सांगतों म्हणून–"

" हा जुलूम होतो आहे–"

" होत असला तरी तो तुझ्या चांगल्याकरतां आहे " आणि मला विश्वास वाटावा म्हणून त्यानें माझा हात हातांत घेतला. मला जरा बरा पैसा मिळूं लागला आणि नोकरीधंद्यांत मी वरवर चढूं लागलो तेव्हां अनेक लोक माझ्याभोंवती गोळा होऊं लागले होते. आपापल्या कुवतीप्रमाणें हे लोक मला वेळोवेळीं उपदेश करूं लागले होते. आणि त्यांची ही सारी धडपड माझ्या चांगल्याकरितां म्हणून पुनः पुनः माझी समजूत घालीत होते. ह्या अवांतर लोकांसारखे वासूने



अनुक्रमणिका

हातांत घेतला होता. पण मला एवढेंच कळत होते कीं त्याचा हात फार घामेजलेला आहे आणि ह्या थंडगार हातांतून माझा हात सोडवून घेणें आवश्यक आहे...

ः लावे ह्याचे मला आश्चर्य वाटले. ह्या बाबतींत मी त्याला कांहीं बोलणार तोंच त्यानें एकदम विचारलें, "तुला हल्ली पगार किती मिळतो ?"

वासूच्या ह्या प्रश्नावरून त्याला आज कांहींतरी झालें असावें हें माझ्या लक्षांत आलें. शाळेंत असल्यापासून वासू मला ओळखीत होता. पुढें कॉलेजांत आमची घसट वाढली. एकाच वेळीं आम्ही पदवी परीक्षेला बसलो. मी पास झालो, तो अडला. परीक्षेचा नाद सोडून त्यानें, साठ–तीन–एकशेंवीसच्या चक्रांतून माणसाला फिरवणारी कारकुनी पत्करली. चांगल्या नोकरीसाठीं मी एकदोन ठिकाणी उमेदवारी केली. माझ्या अंगच्या चिकाटीला नशीबाने हात दिला आणि चांगल्यापैकीं नोकरी मला मिळाली. नोकरीत मी भराभर वर चढूं लागलो. पगारांत वाढ होऊं लागली आणि मी मोठा होण्याच्या मार्गावर आहे ह्याविषयीं लोकानी खूणगांठ बांधली. ही सारी स्थित्यंतरे वासूने फार जवळून पाहिली होती. ह्याविषयीं आम्ही वेळोवेळीं बोललोही होतो. मला वरची जागा मिळाली किंवा पगार वाढ झाली तर न चुकतां मी वासूला सांगत होतो. आणि मी मोठा होत आहे ह्या गोष्टीचा वासूला माझ्याहूनहि अधिक अभिमान वाटत होता. असें असतां आतां वासू विचारीत होता, "तुला हल्ली पगार किती मिळतो ?"

"मिळतो पोटापुरता—"

"अशी उडवाउडवीची उत्तरें इतराना दे—"

"मग इतरानी करावे असे प्रश्न तूं कां विचारतोस ?" माझ्या ह्या प्रश्नावर तो हंसला आणि म्हणाला, "तसंच कारण आहे—"

माझ्या पगाराचा आंकडा मी त्याला सांगितला तेव्हां तो म्हणाला, "खरं वाटत नाहीं—"

"तुझ्या बोलण्याचा अर्थ ?"

"उघड आहे—" आणि खांदे उडवल्यासारखे करून तो म्हणाला, "तूं सांगतोस त्यापेक्षां तुला कमी पगार मिळत असला पाहिजे." वासूचे हे बोलणे चीड आणणारे होते. त्याच्या जागीं इतर कुणी असता तर मी केव्हांच पाठ फिरवली असती. पण वासूची गोष्ट निराळी होती. आज भेटल्यापासूनच तो विचित्र वागत होता तेव्हां त्याचे कांहींतरी बिनसले असावे असा विचार करून मी विचारले, "कशावरून ?" माझ्या ह्या प्रश्नावर तो हंसला आणि म्हणाला, "छान प्रश्न विचारलास. ह्याच प्रश्नाची मी वाट पहात होतो..." आणि बोलता बोलता तो एकदम थांबला. थोडा वेळ न बोलतांच आम्ही चालत राहिलो. त्याला कसा बोलता करावा असा मी विचार करीत आहे तोच त्याने विचारले, "हॉटेलांत कशाला गेला होतास ?"

"लोक हॉटेलांत कशाकरतां जातात ?"

"ते मला ठाऊक आहे" आणि माझ्याकडे रोखून पहात त्याने म्हटलें, "मी मामा भटाच्या हॉटेलाविषयीं विचारतो आहे—" वासू आज फारच विचित्र वागत होता. कांहीं कारण नसतांना त्याने माझ्या पगाराची चौकशी केली होती. पगाराचा आंकडा सांगितल्यावर, संशय व्यक्त करून त्यानें मला डिवचले होते. तरीहीं न चिडता मी मवाळपणें वागलो होतो. मी सांगतो त्यापेक्षां मला कमी पगार मिळतो असें त्याला कां वाटते हे विचारले होते. कारण सांगण्याचा त्यानें आविर्भाव केला होता. पण मग कारण न सांगताच मूळ प्रश्नाशीं अर्थाअर्थीं कांहींही संबंध नसलेला हॉटेलचा विषय त्यानें काढला होता. अनुसंधान सोडून तो बोलत आहे हे त्याच्या लक्षांत यावे म्हणून मी म्हटलें, "वासू, आपण माझ्या पगाराविषयीं बोलत होतो—"

तो एक क्षणभर माझ्याकडे पहात राहिला आणि म्हणाला, "तुझ्या पगाराचा आणि मामा भटाच्या हॉटेलचा फार जवळचा संबंध आहे—"

"कसा काय ?"

पण माझ्या प्रश्नाचे सरळ उत्तर न देतां त्यानें विचारले, "मामा भटाच्या हॉटेलांत कुठच्या दर्जाचे लोक जातात ठाऊक आहे ?"

बटाटेवड्याच्या आणि मिसळीच्या ओढीनें भटाच्या हॉटेलांत तसा मी चार पांच वेळा गेलो होतो. पण कांहीं गैर वाटावे असा प्रकार तिथें मला कधीं आढळला नव्हता. तांबारलेल्या डोळ्यांचे आणि केंस विस्फारलेले व्यसनी किंवा आंकडा लावणारे आणि तीन पानी खेळणारे जुगारी मला ह्या हॉटेलांत कधीं दिसले नव्हते. ह्या ठिकाणीं येणारे सगळे गिन्हाईक पांढरपेशा वर्गातले आणि दुसऱ्याला भिऊन वागणारे होते. हॉटेलांतले पदार्थ स्वच्छ, स्वस्त आणि चवदार असत. असे असतां, वासू मला विचारीत होता, "मामा भटाच्या हॉटेलांत कुठच्या दर्जाचे लोक जातात ठाऊक आहे ?" त्याच्या ह्या प्रश्नावर मी गोंधळून त्याच्याकडे पाहूं लागलो तेव्हां तो म्हणाला, "माझ्यासारखे कारकून लोक ह्या हॉटेलांत जातात समजलास ! बटाटेवडे, मिसळ, भजी आणि कांदेपोहे खायला—" त्याच्या बोलण्यांतला उपरोध जाणवून मी विचारले, "भजी किंवा कांदेपोहे ही कारकुनांचीच मिरासदारी आहे काय ?"

"अलबत्."

"मग माझ्यासारख्या माणसानें काय खावे ?"

"चिकन रोल्स्, हॉट डॉग्ज् किंवा—"

"आणि हे पदार्थ एखाद्याला आवडत नसले तर ?"

"कटलेटस्, पॅटीस किंवा सँडविचेस् खावे—"

"आणि हेहि पदार्थ आवडत नसले तर ?" माझ्या ह्या प्रश्नावर, 'आता काय सांगू कपाळ !' असा त्याने चेहरा केला आणि म्हणाले, "मग तू बटाटेवडे आणि भजीच खात जा.". त्याच्या ह्या बोलण्यावर मी एकदम हंसलो आणि म्हटलें, "म्हणजे कुणीं काय खावे ह्या बाबतींत तडजोड करायला तू तयार आहेस—"

"पण कुणी कुठे खावे ह्या बाबतीत मात्र तडजोड करायला मी तयार नाहीं."












## वेड—

पाय मुडपतां साद घातली जडावल्या रक्तानें
कोंबापाशीं श्वास अडखळे, गळलीं पानें...पानें...
भरून आल्या घशांत स्फुंदे कातरवेळीं वाट
व्यथार्चिंब मी पुन्हा लावतों सर्वस्वाची तीट
पायाखालीं किसल्या गेल्या मुकाटल्या वाळूंत
डोळ्यांमधलें रक्त ओघळें...भास फक्त हातांत
अरुंद खड्डे इकडे तिकडे उरलें माझ्यासाठी
किती बांधल्या हुंकारानें काळजांतल्या गांठी
...गांठ सुटेना फक्त गुंतलीं बोटें भोळी दुबळी
डोळ्यांकांठीं बोलबोलकीं किती वर्तुळें उठलीं !
वर्तुळांत मी गेलों हरवून हवेनकोची आग
निळ्या नभाच्या मातीसोबत डोळां तेवे जाग...
...पुन्हां घातला पाय पथावर शिरशिरलेला देह
श्वासफाटक्या जडरक्ताचा हवाहवासा दाह !!

— *केशव मेश्राम*

---

" म्हणजे तुझा राग मामा भटाच्या हॉटेलवर आहे—"

" राग आहे; पण तो हॉटेलवर नव्हे तुझ्यावर. " आणि त्याच सुरांत तो म्हणाला,

" कारण एवढा मोठा झालास तरी तुला कांहीं कळत नाहीं. ज्या हॉटेलात तुझा शिपाई जाऊं शकतो त्याच हॉटेला तूं जातोस. मोठ्याने ओरडून तो जशी ऑर्डर देतो तसेच तुला करावे लागते. ऑर्डर दिल्यावर त्याच्याचसारखे तुलाही ताटकळत बसावे लागते. तो जे खाऊ शकतो तेच तू मोठ्या आवडीने चारचौघांच्या देखत खातोस. शीः शीः ! अशा ठिकाणीं तू जावे ही कल्पनाही मला सहन होत नाहीं. " वासूने माझ्या समोर उभे केलेले चित्र भडक असले तरी थोडे फार खरे होते. माझ्या हाताखालीं काम करणाऱ्या एका कारकुनाची आणि माझी ह्याच हॉटेलात गांठ पडली होती. मी आंत येत असलेला पाहून तो कावरा-बावरा झाला होता आणि टेबलापाशीं त्याला बसलेला पाहून मला संकोच वाटला होता. पुढ्यांतला पदार्थ घाईघाईत संपवून तो हॉटेलच्या बाहेर पडला होता. हॉटेलमध्यें माझ्या येण्याने त्याचा विरस झाला हें पाहून मी त्यावेळीं थोडासा अस्वस्थ झालो होतो. पण पुढें ही गोष्ट मि विसरून गेलो होतो. आतां वासू बोलला आणि हा प्रसंग एकदम आठवला. वासू बोलत होता ते खरे होते. माझ्यासारख्या पगारदार माणसानें, जनतेसाठीं मोकळ्या असलेल्या अशा हॉटेलांत जाणे गैर होते. वासूचे बोलणें वाजवी आहे हें त्याला कळावें म्हणून मी म्हटलें, " तूं म्हणतोस तें अजूनपर्यंत माझ्या कधींच लक्षांत आलें नव्हते. " मला वाटलें कीं मी अशी कबूली दिल्यावर तो पड खाईल आणि नेहमी-सारखा रंगांत येईल, पण मला आज असा तसा सोडावयाचा नाहीं असें त्यानें ठरवून टाकलें असावें कारण तो म्हणाला, " तशा अनेक गोष्टी तुझ्या लक्षांत येत नाहींत—"

" उदाहरणार्थ—"

" तुला अजून माणसें ओळखतां येत नाहींत. वाटेल त्या माणसांत तूं मिसळतोस. ज्या माणसांची तुझ्या जवळपास फिरकायचीसुद्धां लायकी नाही अशा माणसांना तू विश्वासांत घेतोस. त्यांना मदत करतोस " वासूने माझ्या वर्मावरच बोट ठेवले होते. माणसांची मला पारख करतां येत नाहीं ही गोष्ट खरी होती. कुणी तोंड वेंगाडले कीं मी माणसाला जवळ करतो. पात्रापात्रतेचा विचार न करतां मदतीचा हात पुढें करतो. काम झालें कीं ही माणसें आपल्या वळणावर जातात आणि दुगाण्या झाडूं लागतात. माझें मनःस्वास्थ विघडवून टाकतात. वासूने नेमका ह्या गोष्टीचा उल्लेख केला तेव्हां मी वरमलों आणि म्हटलें, " पण वासू, हल्ली अशा माणसांना मी दूर ठेवूं लागलो आहे. "

" ज्यांची तुला झळ लागली आहे अशांना दूर ठेवतोस, पण पुन्हा नवे भेटतातच "

" म्हणजे नव्या ओळखी करूंच नयेत कीं काय ? "

" जरूर कराव्या. पण त्या आपल्या दर्जाला शोभतील अशा असाव्या. सी. सी. आय्. रेडिओ क्लब, चेंबर ऑफ कॉमर्स अशा ठिकाणीं तू वारंवार गेलं पाहिजेस . तिथं येणाऱ्या माणसांत मिसळलं पाहिजेस—" वासू बोलत होता आणि मी त्याच्याकडे पहात होतो. ह्या गोष्टी वासूसारख्या कारकुनाच्या लक्षांत याव्या आणि माझ्या येऊं नयेत ह्याचे मला आश्चर्य वाटत होते. त्याला बोलूं दिले तर तो मला नुस्ता साफ करील आणि मी बावळट आहे हें पटवून देईल, ह्या भितीनें मी बोलणे आवरते घेतले. घाईघाईत त्याचा निरोप घेऊं लागलो तेव्हां तो म्हणाला, " मी तुला सुधारणार आहे. तुझ्या दर्जाला आणि पगाराला शोभेल असं वागायला शिकवणार आहे. "

मला सुधारायचा वासूने चंगच बांधलेला दिसत होता. मी भेटेन त्यावेळीं किंवा मी सहजासहजी भेटलो नाहीं तर मुद्दाम येऊन तो मला कांहीं ना कांहीं सांगत राहिला. माझ्यासारख्या माणसानें बसनें प्रवास न करतां गाडींतून फिरले पाहिजे हें त्यानेंच माझ्या कानावर घातले.. स्वतःची गाडी येईपर्यंत मी टॅक्सीतून फिरावें अशी तडजोड झाली आणि येताजाता मी टॅक्सींतून फिरूं लागलो. सिनेमा नाटकाची वरच्या दर्जाची तिकिटें काढूं लागलो. विशेष स्वारस्य नसले तरी सांस्कृतिक कार्यक्रमांना न चुकतां हजर राहूं लागलो. फार कमी आणि तेही हलक्या आवाजांत बोलूं लागलो. कुणाचा राग आला तरी न संतापता खोटं खोटं हसायला शिकलो. दुपारच्या जेवणाचा घरून येणारा डबा बंद झाला आणि ' लंच 'साठीं

अनुक्रमणिका

मोठ्या रुबाबांत मी ऑफीसच्या बाहेर पडूं लागलो. माझ्या अंगावर उंची कापडाचे आणि कडक इस्त्रीचे कपडे दिसूं लागले. मी नेहमी सूटा-बुटांत वावरूं लागलो. माझ्यांत पडत असलेला हा फरक वासू पहात होता आणि कमालीचा सुखावत होता. स्वतः कोरीत असलेल्या शिल्पाला आकार येत असलेला पाहून शिल्पकाराला आनंद व्हावा तसा माझ्यांत होत असलेला बदल पाहून वासूला आनंद होत होता. रक्तांत असलेल्या गोष्टी, केवळ आपल्या पैशामुळें आणि पेशामुळें करता येत नाहींत म्हणून खंतावणारा वासू त्याच्या सांगण्यावरून मी करीत असलेल्या गोष्टी पाहून खुषींत येत होता. प्रत्येकवेळीं मला कांहीं ना कांहीं सांगून एकेक पाऊल पुढें टाकायला शिकवीत होता. माझी प्रगति पाहून पसंतीची मान डोलवीत होता आणि माझें कांहीं चुकले तर मला झाडीत होता. चार दिवसापूर्वीच त्याने मला तापवले होते. कामाचा पहिला हप्ता संपवून, पाय मोकळे करायला मी बाहेर पडलो होतो. कांहीं कामासाठीं माझ्याकडे येत असतांना वाटेंतच तो मला भेटला. भेटल्या भेटल्याच त्याने विचारलें, " हें काय ? आज सूट नाहीं घातलास ?

" घातला आहे. पण आतां खांद्यावर कोट नाहीं ही गोष्ट खरी आहे. घाईघाईंत बाहेर पडलो—केबीनमध्यें हॅंगरवर कोट राहिला–"

" असा घाईघाईंत कुठें चाललास ? "

" पान खायला—"

" पान खायला ? " मोठ्या आवाजांत एकदम विचारलेल्या ह्या प्रश्नानें मी चमकलो. पण तसें न दाखवतां म्हटलें, " मी पान खातो तें तुला आवडत नाहीं, हें मला ठाऊक आहे. पण वासू, ही संवय सुटणार नाहीं–"

" ठाऊक आहे–"

" मग ? "

पान खायला मी बाहेर पडलो असें सांगितल्यावर तो कां चिडला ते त्यानें सांगून टाकले. माझ्यासारख्या माणसानें असें स्वतः जाऊन पान खाणें चांगलें नव्हतें. पान खायचेंच झालं तर तें केबीनमध्यें बसून खावें. पान आणायला शिपायाला पाठवावे. त्यानें तें नीट बशीमध्यें ठेऊन बशी टेबलावर आणून ठेवावी. हे सारें तपशीलवार सांगून तो म्हणाला, " ह्याच्या पुढें असें रुबाबांत पान खा " आणि मला अर्ध्या वाटेवरून त्यानें पुन्हा ऑफिसांत आणलें. केबीनमध्यें बसून माझा पान खाण्याचा सोहळा त्यानें साग्रसंगीतपणें पाहिला आणि जणुं कांहीं त्यानेंच स्वतः अशा रुबाबांत पान खाल्ले आहे अशा थाटांत तो माझ्या केबीनच्या बाहेर पडला.

वासूची ही शिकवणी मला चांगली मानवत होती. मी प्रत्येक गोष्टीत चांगला तरबेज होत होतो. कुणालाही कळून येईल असा फरक माझ्या वागण्यांत भराभर पडत होता. मला चांगल्यापैकीं नोकरी आहे आणि चार आकडी पगार मला मिळतो ह्या गोष्टी इतके दिवस माझ्या लक्षांतही येत नसत. पण अलीकडे ह्या गोष्टींची वारंवार जाणीव होऊं लागली होती आणि मी कुणीतरी आहे असें उगाचच मनांत डोकावूं लागलें होते. कसल्या तरी कैफांत असल्या प्रमाणें इतरांना तुच्छ लेखून मी वागूं लागलो होतो. असाच एकदां लंचसाठीं बाहेर पडलो तेव्हां वासू भेटला. मी टॅक्सींतून उतरत असल्याचे पाहून तो भराभर चालत टॅक्सीपाशीं आला आणि म्हणाला, " वा ! सुंदर ! "

" वासू, काय सुंदर ? "

" तुझ्या अंगावरचा सूट फार सुरेख आहे. " त्याच्या ह्या बोलण्यानें माझा अहंकार दुखावला. माझा सूट भारीपैकीं आहे हें वासूनें सांगण्याची आवश्यकता नव्हती. थोड्याशा तुटकपणेंच मी विचारले, " नुसता सूटच चांगला आहे काय ? "

" नाहीं, नाहीं. सर्वच गोष्टी चांगल्या आहेत. तुझ्या अंगावरचा सूट सुंदर आहे, तूं वापरलेला सेंट सुंदर आहे, तूं सुंदर आहेस फार काय, तूं ज्या टॅक्सींतून उतरलास ती टॅक्सीही सुंदर आहे—" तो वहावत आहे हें लक्ष्यांत येऊन मी म्हटलें, वासू--" पण माझ्या आडकाठीनें तो थांबला नाहीं. बोललेली गोष्ट पटवून द्यावी म्हणून तो सांगूं लागला, " खरं सांगतो. टॅक्सीही सुंदर आहे. पूर्वी तूं बसने फिरत असस मग टॅक्सींतून फिरूं लागलास. पण चांगली टॅक्सी तुला पकडता येत नसे. मिळेल ती टॅक्सी, जुना खोका असला तरी त्यांत तूं बसत असस पण हल्लीं हल्लीं ह्या बाबतींतही तूं तरबेज झाला आहेस. कुठली टॅक्सी करावी हें आतां तुला कळूं लागले आहे–" त्याच्या बोलण्याचा मला कंटाळा येत आहे हें पाहून त्याने मोठ्या सफाईदारपणें विषय बदलला. एखादी खाजगी गोष्ट विचारावी त्याप्रमाणें हलक्या आवाजांत विचारले, " कुठें चाललास ? "

" लंचला—"

" मग चल मीही येतो बरोबर "

साध्या धुलाईचे आणि बिनइस्त्रीचे वासूचे कपडे तो भेटल्यापासूनच माझ्या डोळ्यांना खुपत होते. आतां त्याने माझ्याबरोबरच लंचला यायचा प्रस्ताव केला तेव्हां ते जास्तच खुपूं लागले. मी त्याच्या बाजूला झुकलो आणि मुलायम आवाजांत म्हटलें, " वासू, लंचसाठीं मी 'ला वेला'मध्यें जात आहे. तिथें माझ्या ओळखीचे अनेक लोक येतात. माझ्याबरोबर तूं आलास..." आणि मला जे बोलावयाचे होते ते न बोलतांच खांदे उडवून मी सूचित केले आणि विचारलं, " समजलं ना ? "

मला काय म्हणावयाचे होते ते त्याला बरोबर समजले असावे. त्याने माझा हात एकदम हातांत घेतला आणि कांहींतरी बोलण्याचा प्रयत्न केला. पण माझ्या एवढेंच लक्षांत आलें कीं त्याचा हात फार घामेजलेला आहे आणि ह्या थंडगार हातांतून माझा हात सोडवून घेणे आवश्यक आहे. • • •


शॉर्ट लेग !

अनुक्रमणिका




एकभाषी मराठी राज्याची निर्मिती ही मराठी माणसाची फारां दिवसांची आकांक्षा या दृष्टीनें गेलीं तीन वर्षें महाराष्ट्राला फार फार यातना झाल्या—

आतां हे दुर्दिन संपल्याची ही नवी साक्ष म्हणजे संयुक्त महाराष्ट्राचें—

# स्वप्न साकार झालें

महाराष्ट्रीय

अखेर एप्रिलच्या सुमारास संयुक्त महाराष्ट्र आणि महागुजरात हीं दोन राष्ट्रें अस्तित्वांत येणार ! आणि गेल्या पन्नास वर्षांचें महाराष्ट्राचें स्वप्न साकार होणार.

१९०५ सालीं कॉंग्रेसनें बंगालच्या फाळणीला कडाडून विरोध करतांना भाषावार प्रांतरचनेचा पहिला जोरदार पुरस्कार केला. पण लोकमान्य टिळकांनीं प्रतिपादिलेल्या विविध राज्यांच्या भाषावार पुनर्रचनेच्या कल्पनेला जाहीर मान्यता कॉंग्रेसनें १९२० सालीं दिली. पुढें कॉंग्रेस संघटनेची उभारणी महात्माजींनीं भाषावार तत्त्वावर केली आणि १९४५-४६ च्या निवडणूकीतील कॉंग्रेस जाहीरनाम्यांत भाषावार प्रांतरचनेची भूमिका खणखणीतपणें मांडण्यांत आली होती.

पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशापुढें इतके बिकट प्रश्न आले कीं कॉंग्रेसच्या जुन्या जाहीरनाम्यांतील अनेक कलमांचा विचार करावयास फुरसत नव्हती. आणि त्यांतील अनेक बाबींत फेरविचार करणें आवश्यक आहे असें अनेक पुढाऱ्यांना वाटूं लागलें. त्यांतील कांहीं जबाबदार व्यक्तींना भाषावार पुनर्रचना नापसंत होती.

पण भाषावार प्रांतरचनेच्या पुरस्कर्त्यांचा असा दावा होता कीं राष्ट्रीय ऐक्यासाठीं आणि राष्ट्राच्या प्रगतीसाठीं देशांतील प्रांतांची भाषावार पुनर्रचना झालीच पाहिजे. यामुळें अन्तर्गत मतभेद विलयाला जातील आणि ऐक्याचें निरोगी वातावरण सर्व राष्ट्राच्या एकजुटीला अंतिम उपकारक ठरेल. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें कीं, राष्ट्रीय ऐक्यासाठीं उलट हे भाषिक बांध दूर केले पाहिजेत आणि एकराष्ट्रीयत्वाची भावना फोफावली पाहिजे. इतिहासकाळांत प्रादेशिक भावनेमुळें राष्ट्राचें फारसें हित झालेलें नाहीं. उलट संकुचित प्रदेशवादामुळें राष्ट्रीय ऐक्यांत बिघाडच निर्माण झालेला आहे.

हे भिन्न भिन्न मतप्रवाह लक्षांत घेऊन या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्यासाठीं १९४८ सालीं दार कमिशन नेमण्यांत आलें. दार कमिशननें आपल्या अहवालांत भाषावार प्रांतरचना करण्याला विरोध व्यक्त केला. आणि प्रांतांची पुनर्रचना करावयाची असल्यास शासनात्मक आणि कारभार विषयक सोयी गैरसोयीचा विचार करूनच नवी विभागणी करावी अशी सूचनाकेली.

पुढील वर्षी जे. व्ही. पी. कमिटी नेमण्यांत आली या कमिटीचे पं. नेहरू, सरदार पटेल









अनुक्रमणिका

आणि डॉ. पट्टभीसीतारामय्या हे सभासद होते. या कमिटीनें भाषावार तत्त्वाला विरोध केला. आणि प्रत्येक घटकाचा काळजीपूर्वक विचार या दृष्टीनें करण्यांत यावा आणि यामुळें कारभारविषयक अडचण आणि गुंतागुंत निर्माण होणार नाहीं याची काळजी घ्यावी असें मत व्यक्त केलें. शिवाय एखाद्या प्रांताच्या बाबतींत लोकमत फारच प्रभावी बनलें असेल तर त्यांच्या मागणीचा विचार करण्यांत येईल. आणि त्यानुसार आंध्र राज्याची स्थापना करावी असें सुचविलें.

या दोन तज्ज्ञांच्या समितीनें भाषावार प्रांतरचनेला जोरदार विरोध केल्यामुळें भाषावार प्रांतरचनेची चळवळ मंदावली. याला एकमेव प्रखर अपवाद म्हणजे तेलगू भाषिकांच्या आंध्र राज्याच्या निर्मितीसाठीं केलेल्या ५० दिवसांच्या उपोषणाच्या मुळें झालेला पोट्टी सीताराम यांचा मृत्यू. या आंध्र नेत्याच्या हौतात्म्यामुळें १ ऑक्टोबर १९५३ सालीं आंध्र राज्याची स्थापना झाली.

आंध्रराज्याच्या निर्मितीमुळें भाषावार प्रांतरचनेच्या चळवळीला पुनरपि जोर चढला. विशेषतः म्हैसूर आणि मुंबई राज्यांत ही चळवळ अधिक तीव्र झाली. मुंबई राज्यांत या चळवळीचें नेतृत्व सर्वपक्षीय संयुक्त महाराष्ट्र परिषदेकडे होतें. या परिषदेचे अध्यक्ष म्हणून कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे एकेकाळचे जनरल सेक्रेटरी आणि महाराष्ट्राचे थोर कॉंग्रेस पुढारी श्री. शंकरराव देव हे होते. १९५३ च्या अखेरीस सरकारने श्री. फाजल अली यांच्या अध्यक्षतेखालीं स्टेटस रिऑर्गनायझेशन कमिटीची स्थापना केली. संयुक्त महाराष्ट्र परिषदेनें मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा एक खलीता कमिशनला सादर केला.

दोन वर्षांनीं कमिशनचा अहवाल प्रसिद्ध झाला. या अहवालामुळें महाराष्ट्रांत तीव्र नैराश्य आणि असंतोष निर्माण झाला. या अहवालांत विदर्भाच्या आठ जिल्ह्याचे एक मराठी राज्य आणि मुंबई शहर, महाराष्ट्राचे जुने बारा जिल्हे, मराठवाड्याचा नवा प्रदेश आणि गुजरात सौराष्ट्र आणि कच्छ यांचे मिळून एक द्विभाषिक राज्य सुचविले गेलें. कमिशनचा हा अहवाल संयुक्त महाराष्ट्र परिषदेनें धिक्कारला.

या अहवालाच्या शिफारसीवर सर्व पक्षांकडून आणि पुढाऱ्यांकडून न भूतो न भविष्यति अशी चर्चा झाली. कॉंग्रेस श्रेष्ठींनीं मुंबई, गुजरात आणि महाराष्ट्र अशीं त्रिराज्य योजना सुचविली. तिचाहि धिक्कार झाला. शंकरराव देवांनी द्विभाषिकाची योजना पुढें मांडली पण तिला गुजरातचा पाठिंबा मिळाला नाहीं.

पण आजचें महाद्विभाषिक म्हणजे पार्लमेंटमधील कांहीं खासदारांच्या उत्स्फूर्त सूचनेंतून जन्माला आलें आणि ९ ऑगस्ट १९५६ रोजीं पार्लमेंटनें त्यावर शिक्कामोर्तब केलें. या नव्या राज्याची निर्मिती म्हणजे एका राष्ट्रीय प्रश्नाची राष्ट्रीय उकल असें पं. पंतांनी वर्णन केलें.

या नव्या घोषणेमुळें गुजरातमध्यें असंतोष निर्माण होऊन श्री. इंदुलाल याज्ञिक यांच्या अध्यक्षतेखालीं महागुजरातच्या स्थापनेसाठीं महागुजरात जनता परिषदेची स्थापना करण्यांत आली. संयुक्त महाराष्ट्र परिषद केव्हांच विसर्जित झाली होती, तिच्या ऐवजीं प्रजासमाजवादी पुढारी श्री. एस. एम. जोशी यांच्या नेतृत्वाखालीं संयुक्त महाराष्ट्र समितीची स्थापना करण्यांत आली.





अनुक्रमणिका

महागुजरात जनता परिषद आणि समिती या दोघांनीं गेल्या सार्वत्रिक निवडणुकीत हिरीरीनें भाग घेतला. समितीनें मुंबई असेंब्लींत १२८ जागा पटकावल्या, कॉंग्रेसनें १३६, व गुजरातमध्यें परिषदेनें २७ जागा व कॉंग्रेसनें १०२ जागा मिळवल्या. याशिवाय समितीनें बहुसंख्य स्थानिकस्वराज्य संस्था काबीज केल्या, त्यांत प्रामुख्यानें पुणें आणि मुंबई कॉर्पोरेशनमधील समितीचा विजय फार महत्वाचा मानावा लागेल. याशिवाय लोकसभा आणि विधानसभा यांच्या सर्व पोटनिवडणुका समितीनें जिंकल्या हा मोठा विजय. या विजयामागें राष्ट्र पुनर्रचनेनंतर झालेली चळवळ, त्यांतील गोळीबार, शिवाय अन्यांच्या मराठा पत्रांतील झंझावाती प्रचार इत्यादि अनेक गोष्टी कारणीभूत होत्या.

ऑगस्ट १९५७ मध्यें अहमदाबादमध्यें हुतात्म्यांचें स्मारक करण्याच्यां प्रश्नावर फार मोठी दंगल माजली. १ नोव्हेंबर १९५८ ला समितीनें सीमा प्रदेशांत सत्याग्रह सुरू केला.

याशिवाय मुख्यमंत्रि श्री. यशवंतराव चव्हाण यांनीं यांनीं सीमा प्रश्न सोडवण्यासाठीं आपलें केंद्रीय सरकारांतीला वजन खर्चावें अगर राजीनामा द्यावा अशीहि समितीनें मागणी केली. आणि १ नोव्हेंबर १९५९ पासून समिती आणि परिषद यांनीं आपल्या ध्येय स्थापनेसाठीं सार्वत्रिक सत्याग्रह सुरू करण्याचा निर्धार जाहीर केला.

—या सर्व घटनांचा आणि इतर देशांतर्गत राजकीय घटनांचा परिणाम म्हणून कीं काय आज कॉंग्रेस श्रेष्ठींनी द्विभाषिक विभाजनाला अखेर मान्यता दिली आहे.

नवा संयुक्त महाराष्ट्र, आकार आणि लोकसंख्या बाबत गुजरातपेक्षां दुप्पट मोठा असेल. महाराष्ट्राचे एकूण २६ जिल्हे असतील त्यांचें क्षेत्रफळ ११९०२४·७ चौरस मैल व लोकसंख्या एकूण ३२,१७७,५६७ राहील.

महागुजरातचे १७ जिल्हे व ७२६७५ चौरस मैल क्षेत्रफळ आणि १६०९६६०७ एवढी लोकसंख्या आहे. महाराष्ट्राच्या असेंब्लीतील पक्षोपक्षांचे उमेदवार पुढील प्रमाणें.

एकूण आमदार २६४
कॉंग्रेस १३५
विरोधी १२९

त्याची प्रादेशिक वाटणी पुढील प्रमाणें.

महाराष्ट्र : मुंबई शहरात एकूण १५९ पैकीं कॉंग्रेस ४७. विरोधी ११२

विदर्भ एकूण ६७. कॉंग्रेस ५४ विरोधी १३

मराठवाडा एकूण ४२ कॉंग्रेस ३४ विरोधी ८

विदर्भातील एक जागा अजून रिकामीच आहे. पक्षोपक्षांचे बलाबला वरीलप्रमाणें प्रजासमाजवादी २८, शेतकरी कामकरी २८, कम्युनिस्ट १९, कॉंग्रेसजन परिषद ५, हिंदुमहासभा १, स्वतंत्र १५.

गुजरात विधानसभेंत १३३ सभासदांपैकीं कॉंग्रेसचे १०३, महागुजरात जनता परिषदेचे २७, आणि प्रजासमाजवादी ३.

### नागपूर करार

महाराष्ट्र अस्तित्वांत आल्यावर विधानसभेचें एक अधिवेशन नागपूरकरारान्वयें नागपूरला भरवावें लागेल.

### नागपूर करारांतील मुख्य कलमें

१ मुंबई, मध्यप्रदेश आणि विदर्भ- या प्रदेशांतील मराठी भाषिक प्रदेशाचें एकीकरण करावें. या प्रदेशाला महाराष्ट्र अगर महाराष्ट्र प्रदेश असें नांव ठेवण्यांत यावें व मुंबई ही त्याची राजधानी राहावी.

३ या राज्यांतील एकूण उत्पन्न त्यां त्या विभागांतील लोकसंख्येच्या प्रमाणांत खर्च केलें जावें हें खरें असलें तरी मराठवाड्यासारख्या अविकसित प्रदेशासाठीं काहीं जादा रक्कम उपलब्ध करुन देण्यांत यावी. याबाबतचा अहवाल स्टेट असेंब्लीपुढें दरवर्षी सादर करण्यांत यावा.

या राज्याचें हायकोर्ट मुंबई येथें व त्याची एक शाखा नागपूर येथें. ती शाखा मराठवाड्याचें काम पाहील. न्यायाधिशांची नेमणूक करतांना मराठवाड्यास न्याय मिळेल अशी खबरदारी घेण्यांत यावी.

४ सरकारी नोकरांची भरती त्या त्या विभागांतील लोकसंखेच्या प्रमाणानुसार व्हावी.

५ सत्तेच्या विकेंद्रीकरणावर आमची श्रद्धा राहील.

६ नागपूरचें महाविदर्भातील ऐतिहासिक महत्व लक्षांत घेतां त्याला धक्का पोंचू नये म्हणून दरवर्षी ठराविक काल राज्य सरकार तेथें हलवलें जाईल व असेंब्लीची एक बैठक तेथें भरेल.

७ या मराठी विभागांतील सीमाप्रदेशाची सरहद्द निश्चित करताना खेडें हा घटक मानला जाईल.

---

### खास दीपावलीच्या वाचकांसाठीं

## पारितोषिकांची योजना

**दीपावलीचा** पुढील फेब्रुवारीचा अंक म्हणजे या वर्षाचा शेवटचा अंक. दीपावलीच्या वर्गणीदारांनीं आणि वाचकांनीं आपले सर्व अंक जपून ठेवले असतीलच. आतां त्यांनीं एवढंच करायचं कीं सारे अंक पुनरपि नीट नजरेखालीं घालून गेल्या वर्षांतील त्यांना आवडलेल्या पुढील प्रकारांतील सर्वोत्कृष्ट साहित्याची आपल्यापाशीं नोंद करावयाची.

१ कथा
२ ललित अगर विनोदी लेख
३ विचारप्रवर्तक लेख
४ कविता

फेब्रुवारी महिन्याच्या अंकांत एक परिपत्रक प्रसिद्ध करण्यांत येईल. त्या परिपत्रकांत आपला निर्णय नमूद करून दीपावलीकडे पाठवावा.

साहित्याच्या सरसनीरसतेबद्दलचा वाचकांचाच निर्णय अखेरचा मानला जाईल. आणि अशा वाचकांचीं नांवें त्यांच्या निर्णयासह मार्चच्या अंकांत प्रसिद्ध होतील, ज्यांचा निर्णय अचूक ठरेल अशा वाचकांना आणि यशस्वी लेखकांना दीपावलीतर्फे पारितोषिकें देण्यांत येतील.






अनुक्रमणिका

### डांगचा प्रश्न

या सर्व प्रकरणांत डांगच्या भवितव्याचा निकाल अजून लागावयाचा आहे. आजचे वारे तरी असे वाहात आहेत कीं डांग गुजरातलाच द्यावा लागणार. या संदर्भात अगोदरच आचार्य अत्र्यांनी जोराचा उठाव सुरू केला आहे. वास्तविक पाहतां डांग प्रकरणीं महाराष्ट्रीय फार उशीरा जागे झाले आहेत. खेर मोरारजींनी डांगची भाषा मराठी आहे असें जेव्हां जाहीर केलें तेव्हांपासून गुजराती कार्यकर्त्यांनी डांगचें गुजरातीकरण सुरू केलें. महाराष्ट्रांत आधींच विधायक कार्यकर्त्यांचा तुटवडा फार. प्रजासमाजवादी कार्यकर्ते शहरांतील देखण्या मुलींपुढें बौद्धिकें करण्यांत गर्क झाले तर कम्युनिस्ट कामगारांच्या संपांत मशगूल होते. कॉंग्रेसवाले खेड्यांतील राजकारण हातीं ठेवूं पाहात होते आणि त्यामुळें रानावनांत सेवावृत्तीनें राहून आदिवासींमध्यें काम करण्यासाठीं कोणीच पुढें येईना. डांगमधील मराठी शाळा बंद पडल्या; कारण मराठी शिक्षक जंगलांत यायला तयार होईनात. मात्र गुजरातमधून शेंकडों विधायक कार्यकर्त्यांचा डांगमध्यें पूर लोटला.

आज याचीं कटु फळें आपल्याला चाखणें भागच आहे. सीमा प्रश्नांबाबतहि आमची हीच उदासीन वृत्ति कारणीभूत झालेली आहे. पण याबाबतींत केंद्र सरकारला न्याय्य निर्णय घ्यायला लावण्याचें कार्य महाराष्ट्राच्या सरकारचें आहे. जनतेचें नव्हे. त्यामुळें आज मिळत आहे तें सर्व पदरांत घेऊन संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाल्यावर मग शांतपणें राहिलेल्या प्रश्नांचा आपल्याच सरकारमार्फत निकाल लावून घेणें शहाणपणाचें आहे.

• • •

कातकरी म्हणजे रानचे राजे. त्यांचें नांव कात या शब्दापासून पडलें असावें कारण खैरापासून कात काढण्याचा त्यांचा धंदा आहे. ते सह्याद्रीच्या खबदाडींत आणि कोंकणच्या दऱ्याखोऱ्यांत राहातात. त्यांच्या भाषेचा हा नमूना —

## भाषा मराठीच

**कातकरी भाषा—**

" दोन दोस एकेच वाटन संगत जाइंव. त्याना नदरमा एक आस्वल पडनेल. त्यामा एक विहीनी एका झाडावर चढनेल, आन झाडाच्या खांद्यामा आपना जीव जगवा दपना. बीसरा आपल्या एकल्याच्यान अस्वला समोरानी नीबाव लागार नाहा, आसा हेरानी जमिनीवर पडना आन मरनाना नीमीत लीदा. त्यान मरना ढोंग लीदाना कारन त्यान ऐकेल्या व्हाता, आस्वल मुरदाना सीवत नाहा. तो पडना आहा ती आस्वल त्याच्या डोयपा आनी आन त्याना काळीज कान आन नाक गंदवा पर त्या मानसान हालवेल नाहीं, दम धरी रहना, आन ती आस्वल तो मरीगई बे त्यानमा लीदा. ती आस्वल हेरी गई. तीं आस्वल दूर पडनी पीहीला मानूस झाडावरुन खाल उतरना आन विसऱ्याना आख्ना, " आस्वल तुज्या कानामां काय गुंदव हती. " तो आखा, " मी त्याना तोंड तुज्या कानापा हेरा. " त्याना दोसदार बोला, " त्यामा मोठासा दपाडा नाहा. त्यान वडाच आखा जा मानूस कासनीमा आहा ता आपल्या बचावाचा ईचार करवाहा आन आपल्या दोसदाराना फसवाहा ये लोकासी संगत करवा नाहीं. " '

## ऐकावें तें नवलच

सर्वसामान्य माणसाच्या दैनंदिन जीवनांत केव्हां केव्हां अतर्क्य घटना घडत असतात. अशा घटनांचें स्वरूप केव्हां केव्हां अद्‌भुतरम्य तर केव्हां केव्हां अत्यंत विनोदी असें असतें.

अशा कांहीं घटना आपल्याहि जीवनांत घडल्या असतील. तर त्यांतील एखादी अविस्मरणीय घटना अगर गंमतीदार प्रसंग ३००–४०० शब्दांत लिहून पाठवा.—भाषेची फिकीर करूं नका त्यावर योग्य तें संपादकीय संस्करण करूं.

सर्व लेखन साहित्याला मानधन दिलें जातें.





अनुक्रमणिका




# र स ना : १

**रा. वि. सो व नी, M. Sc.**

( मानवी शरीर ही एक अजब वस्तु आहे. त्याचें साग्रसंगीत वर्णन किती किती म्हणून करावें !— )

एखाद्याची प्रथमच ओळख झाली म्हणजे " तोंड ओळख " झाली असे समजतो. आपल्या स्वतःच्या शरीराच्या रम्य कथांची सुरुवात करतांना प्रथम " तोंड ओळख " होणे योग्य नाहीं कां ! पण ही ओळख मात्र वरवर घेऊन चालणार नाहीं. कारण ह्या ओळखीत अंतरंगातच शिरणे अवश्य आहे.

आतां मी तुम्हाला ओळख करून देतो. एक आरसा घ्या आणि आपल्या मुखाचे सौन्दर्य अवलोकन करावयास लागा. अर्थात् आरसा आणि तुम्ही ह्यांची मैत्री जुनी आहे. स्त्रियांच्या जिवाचा तर तो कलिजा आहे. पुरुष निदान दाढीसाठीं आणि टायची गांठ मारण्यासाठीं आरशांत पाहातात. पण नुसते स्वतःला पाहून नारसिंह बनूं नका. जरा तोंड उघडून आंत पहा ! खालच्या आणि वरच्या जबड्यांत ओळीने बसलेले शुभ्र ( ! ) दांत आणि त्यांच्यामध्यें सांपडलेली पण वळवळ करणारी जीभ.

ह्या जिभेची तुम्हाला माहिती आहे का ? आहे पण थोडीशीच. कारण दांताखाली ती जर चुकून सांपडली तर मग तिच्या अस्तित्वाची जाणीव तुम्हाला होते. हीं जीभ स्नायूंची बनविलेली आहे आणि म्हणूनच टिकली आहे. कारण ती हाडाची असती तर ती टिकणें कठीणच होते. मला ह्या जिभेचे फार कौतुक वाटते. कारण स्त्रियांच्या तावडीत सांपडून सुद्धां ही अजून तग धरून राहिली आहे.

जिभेचे उपयोग किती आहेत ते आपण रोज पाहातोच पण जिभेच्या चोखंदळ वृत्तीची तुम्हाला जाणीव आहे कां ? जिभेनें आपण रोज पदार्थांची चव घेतो. चव ही एक रासायनिक क्रिया आहे. पदार्थ तोंडांत विरघळतो आणि मग त्याची चव कळून येते. जिभेच्या सर्व भागांत सगळ्याच चवी समजतात असें मात्र नाहीं. जिभेवर निरनिराळ्या चवींचे वेगवेगळे भाग आहेत. मुख्यतः चार प्रकारच्या चवी मूलभूत समजल्या जातात. गोड, आंबट, खारट आणि कडू. त्यांतली आंबट आणि खारट ही चव जिभेच्या बाजूच्या भागाकडून समजते. तर जिभेचे टोंक गोड आणि मागचा भाग कडू संवेदनांची जाणीव देतो. हीं चव जिभेवर असणाऱ्या रुचि कलिकांमुळें मेंदूकडे पोंहोचविली जाते. जिभेच्या मध्यभागीं रूचिकलिका नसल्यामुळें त्या भागांतून कोणत्याच रुचिचे ज्ञान होत नाहीं. आणि म्हणून ह्या भागाला ' शांततेचा पट्टा ' असें म्हणतात. काय गंमत आहे पहा जगांत सर्वांत जास्त आवाज करणाऱ्या त्या जिभेवर ' शांततेचा पट्टा ' असावा.

रुचि ही संवेदना खरं म्हणजे स्वतंत्र संवेदना नाहीं. कारण ह्यांतच गंध ज्ञानाची संवेदना मिसळते आणि मगच खरें रुचिज्ञान होते. तुम्हांला पटणार नाहीं. पण तुमचा रोजचाच अनुभव पाहानां ! कांद्याचा एक तुकडा तुम्ही तोंडांत टाकला म्हणजे त्याचा स्वाद तुमच्या नाकांत प्रथम घुसतो आणि मगच त्याची खरी चव कळते. तोंच प्रकार गरम आणि गार पदार्थांबद्दल होता. सकाळी जेवणांत असलेली गरम भाजी संध्याकाळीं गरम न करता तोंडात घेतली तर तिला सकाळची चव लागत नाहीं. कारण ती भाजी गरम असतांना तिचा स्वादहि चवी बरोबर येत असल्यामुळें तिची चव वेगळी लागते. आणि पडसें येऊन नाक बंद झाल्यावरहि पदार्थांची चव बदलते हा अनुभव सगळ्यांचाच आहे. म्हणजेच चव आणि गंध ह्या दोघी सख्या आहेत.

कांहीं वेळा जीभ आपल्याला चवीत फसविते. उदाहरण द्यावयाचे झाल्यास आवळ्याचें देता येईल. आवळा खाल्ल्यास त्यांतील तुरट आणि आंबट अशा तीव्र पदार्थांमुळें जिभेच्या बाजूवरील रुचिकलिका गारद होतात. आणि मग त्यांच्यावरून पाणी गेलें म्हणजे त्या कलिकांमधून तुरट आणि आंबट संवेदनांऐवजीं गोड संवेदना मेंदूला दिल्या जातात व म्हणून ते पाणी गोड लागते.

आपली जीभ घशांत मागच्या बाजूला चिकटलेली असल्यामुळें तिचें पुढचें टोंक मोकळे राहाते. आणि ह्या टोंकाचा स्वैरसंचार कांहीं नव्यानें सांगावयास नको. तोंडांत जीभ आहे आणि ती पुढच्या बाजूला मोकळी आहे म्हणूनच आपण " शब्दसृष्टीचें ईश्वर " होऊं शकतों. घशांतील स्वरेंद्रियांकडून स्वर निर्माण केले जातात पण ह्या स्वरांना शब्दांचे निश्चित स्वरूप मुख्यतः जिभेमुळें येते. एवढ्यानेंच जिभेचे काम संपत नाहीं. पदार्थांचे स्पर्श जाणून ते घट्ट, पातळ, खडबडीत, सपाट, आहेत किंवा नाहीं, हे पाहावे लागते. शिवाय गरम आणि गार पदार्थांनांहि " तोंड " द्यावे लागते. दांतांत कण अडकल्यास तो हांकून देण्यासाठीं जीभ आपल्याकडून आटापिटा करीत असते. तर आजारी पडल्यावर डॉक्टर जिभेलाच बाहेर पडावयास सांगून रोगाची परीक्षा करतात.

म्हणजे आपली ही जिव्हा शरीराच्या द्वाराशीच बसून अनेक महत्वाची कार्ये पार पाडीत असते. आणि म्हणून म्हणावेसे वाटते कीं, " नरा तुझी जिव्हा अगाध आहे. " • •

## चुकीची दुरुस्ती

दीपावलीच्या गेल्या वार्षिक अंकांत पृ. १६० वर जाहिरातींत **हरिदास ईश्वरदास भाटिया** असें चुकीनें छापलें आहे त्याऐवजीं **मे. ईश्वरदास हरिदास भाटिया** असें वाचावें.









अनुक्रमणिका



# विधुर नीलकंठ

आतां त्यांचा संसार सुखानें चालला होता. दुःखाचा अनुभव मिळाल्यामुळें मैनेचा गर्व कमी झाला होता; पण नीलकंठाला भीति वाटे. आपल्या बडबडण्याला विटून मैनाराणी आतांच सोडून गेली तर ? सारेच आपला कंटाळा करतील.

—श्री. बा. रानडे

वसंताला नुकतीच सुरवात झाली होती. आगगाडीच्या बाजूच्या तारेच्या खांबावर एक नीलकंठ बसून राहिला होता. शेतांत किडे उडत होते. आळ्या सरपटत होत्या. सुरवंट झाडाचीं पानें कुरतडत होते. पण नीलकंठाचें लक्ष आज खाण्याकडे नव्हतें. आज नीलकंठ फार, फार उदास झाला होता. एकटा बसला होता. काय झालें होतें त्याला ?

तसें म्हटलें तर हा लग्नाचा मोसम. सगळ्या जातीचे पक्षी आपापल्या जोड्या ठरवीत होते, सुंदर सुंदर रंगीत पिसांचे पोशाख घालून नवरदेव मिरवीत होते, नाचत होते. कांहीं नरमादींच्या जोड्या तर बाळघरें बांधण्याच्या उद्योगाला सुद्धां लागल्या होत्या. मग जोडीदारीण मिळवायचें सोडून हा नीलकंठ निमूटपणें आभाळाकडे डोळे लावून स्वस्थ कां बसला होता ? कुणाला तो आवडत नव्हता का ?

छे, असें कसें होईल ? हालाहल विष पचविल्यानें गळा काळानिळा झाल्यावर शंकरानें आपल्या नीलकंठ पक्ष्याचें नांव स्वतःला घेतलें. नुसत्या शंकराचाच आवडता नव्हता तो. दुपारपासून पांच सहा नीलकंठ तरुणी आपले निळेशार पंख फडफडवीत, त्याच्या सभोंवतीं गिरक्या मारीत बडबडत निघून गेल्या. एक बाई तर त्याच्याजवळ बसून आपल्या फताड्या लाल चोंचींतला किडा त्याला देऊं लागली. सुंदर होती ती, आपल्या नीलकंठासारखी. इतर जातींत माद्या बहुतेक कुरूप असतात, तसें नाहीं नीलकंठांचे. कोकिळवर्गांतले हे पक्षी. पण कोकिळ-कोकिळा काळ्या ढुस्स. आणि नीलकंठ ? निळेभोर पंख, पाचूसारखे डोकें, पिंगट पिवळी छाती आणि पोट, शेंपूट आभाळापेक्षां समुद्रापेक्षां गर्द चमकदार निळें ! पण कां कुणास ठाऊक, जगापेक्षां वेगळ्या मनाच्या आपल्या नीलकंठाला आपल्यासारखी सुंदर, मोहक नीलकंठी मात्र आवडत नव्हती खास. आपल्याला गातां येत नाहीं, तिलाही येत नाहीं. आपण कधीं खूप बडबड करतों. कधीं एकदम मख्ख घुम्यासारखे बसतों. तशीच ही. नीलकंठाला गाण्याचें एवढें वेड होतें पण आपल्या भाऊबंदांचे कुहूकुहू गाणाऱ्या कोकिळेचे, पिऊ पिऊ म्हणणाऱ्या चातकाचे गोड पण पुन्हां तेच तेच घोळवलेले सूर कानाला रुचत नव्हते. फार काय लोकांच्या आवडत्या बुल्बुलाचे मधुर स्वर, आभाळांत भराऱ्या मारीत लकेरी सोडणारा चंडोल, कोणी कोणी कसे आवडेनासे झाले ? सुंदर नीलकंठी, कोकिळा, चातकी, चंडोली, कुणीच जोडीदारीण नको. मग हवें तरी कोण ?

नीलकंठाचा भाऊ तारेवर येऊन शेजारीं बसला. तो म्हणाला, दादा, त्या पहा दोन वहिणी वहिणी नीलकंठी येत आहेत. एक तुझी, एक माझी. चल आपण जोडीनें लग्नें लावूं. आज मुहूर्त आहे चांगला. उगीच वेळ घालवूं नकोस. वसंत संपायच्या आंत आपल्याला झाडाच्या ढोलींत घरें बांधलीं पाहिजेत. आपण कांहीं कोकिळांसारखीं दुसऱ्याच्या घरट्यांत अंडीं घालीत नाहीं. चल पसंत कर तुझी नवरी." आपला नीलकंठ स्वस्थ बसून राहिला.

घिरट्या घालीत एक नीलकंठी गात त्याला हाका मारीत होती. पण बिचारी शेवटीं निघून गेली. दुसऱ्या नीलकंठीची हांक ऐकतांच नीलकंठाच्या भावानें तिला साद घातली. दोघेंजण आनंदानें बरोबर उडून मोकळ्या रानांत शेजारीं शेजारीं बसून किती तरी वेळ एक-मेकांशीं ' चक् चक् ' आवाज काढीत, गुलुगुलू बोलत होते. मग एकदम त्या नीलकंठानें आपलें उडण्याचें कौशल्य दाखवायला सुरवात केली. उंच भरारी मारून खाली आल्यावर नीलकंठीनें वर मान करून ' चक् चक् ' म्हणायचें. एखाद्या वेळी तिनेही घिरट्या मारून यायचें. असें दहाबारावेळ केल्यावर भावानें एक सरळ उंच भरारी मारली. नीलकंठी त्याच्याकडे वर मान करून पहात होती. उन्हांत त्याचे पंख किती झळकत होते ! आभाळांत उंच उंच चढून मग एकदम खाली डोकें करून नीलकंठ सरळ सूर मारून मध्येंच कोलांटी मारून खाली नीलकंठीजवळ आला. नीलकंठी पंख पसरून फडफड करीत लाजत म्हणाली, ' छान छान, चक चक् ! ' शुभमंगल सावधान ' झालें आणि दोघेंजण जोडीनें घरटें शोधायला निघून गेले.

आपला नीलकंठ उघड्या डोळ्यांनीं पहात बसला होता. तो एकदम बडबडला, ' अहारे बायको ! नुसतें चक चक ! रूपाला काय चाटायचें आहे. जा बाबा. शुभमंगल, पंच अंडी सौभाग्यवती भव. मला नको अशी चक चक करणारी ! मंजुळ आवाज तर पाहिजेच पण बोलण्यांत कांहीं अर्थ तर हवा ! ' नीलकंठाला आंत बसावेंसे वाटेना. तो उडत शेतांतून माळावरून भटकूं लागला. एका बागेंत गवतांत दुमकत दुमकत चालणारी मैना त्याला दिसतांच नीलकंठ थबकला. आणि एका भुंड्या झाडाच्या शेंड्यावर बसून पाहूं लागला.

मैना आपल्याच नादांत होती. एकेक पाऊल उचलून मान वेळ-वीत कधीं एकदम तुरुतुरु छमछम करीत धांवत जाऊन गवतांत लपलेला नाकतोडा गटम् करी. पिवळे धमक पाय आणि पिवळी जर्द चोंच. होती गोंडस पण काळीसावळी ! खुलून दिसावें म्हणून डोळ्या-भोवतीं पिवळी हळद लावली होती. मानेवर मागें चंद्रकोरीसारखा सोनेरी दागिना होता. पंखांत मधून मधून पांढरीं पिसें खुलून दिसत होतीं. जसा कांहीं पट्टेदार काळा शालूच नेसली होती. मधून मधून एक भरारी मारून झाडावरचें फळ कुरतडून येई तर कधीं कधीं फुलांतला मध चाटून येई आणि पुन्हां नखऱ्यानें दुमकत आपल्याच नादांत चालत गायिकेसारखी एकादी तान भिरकावून देई. बोले सुद्धां लाडे लाडे ! सात बाया, यांच्यांत मुळीच मिसळत नव्हती. जशी कांहीं किलवरची काळी राणी !

मैनेला पाहून नीलकंठ मोहून गेला. " अहाहा काय गाणें, बायको असावी तर अशी ! ढगासारखी काळी पण स्वर्गांतले गाणारी ! " आनंदानें नीलकंठानें बडबड करायला आरंभ केला. मैनेनें चमकून वांकडी मान करून वर पाहिलें. नीलकंठाचें रूप पाहून ती चकित झाली. पण बडबड-सारखी बडबड तिला ऐकवेना. पण त्याला सोडून निघून जावेसेंही वाटेना.

नीलकंठ झेप मारून मैनेजवळ येऊन उभा राहिला. त्यानें भीत भीत विचारलें, " मैनाराणी, किती मंजुळवाणी गातेस ग ! अगदी शहाण्या प्रेमळ माणसासारखें गोड गोड बोलतेस. मैने, माझ्याशीं लग्न करशील, बायको होशील माझी निदान या वसंतापुरती ? चल, माझ्याशीं कर लग्न. उशीर नको आतां ! "

मैना मानेला झटका देऊन म्हणाली, ' नको ग बाई ! लग्न आणि तें तुझ्याशी. अरे त्या पोपटपंची राव्यांला मी नको म्हटलें काल. आणि तूं तर बडबड्या नीलकंठ ! वाचासुंदर तुम्ही. सारावेळ बडबड चालणार तुझी. डोकें उठेल. कांहीं सुचायचें नाहीं मला ! "

जवळच्या ढोलींत एक घुबड झोपेंतून क्षणभर जागें होऊन म्हणालें, " हूट् हूट् घू घू ! डोकें उठेल ? हट् असेल तर उठेल. घू घू ! "

मैना त्याच्याकडे तोंड वळवून खेसकली, " तोंड काळें कर, बटबटीत डोळ्या ! अजून अंधार नाहीं पडला, उगीच का लोकांच्या गोष्टींत नाक खुपसतोस. नीज मुकाट्यानें. आम्हीं भांडूं नाहींतर गळ्यांत गळा घालूं. तूं रे चोंबड्या कां पाहतोस ! "

मग नीलकंठाकडे वळून मंजुळ आवाजांत ती म्हणाली, " हे पहा बडबड थांबवायला शिकलात तर करीन विचार. पण वचन बिचन कांहीं देत नाहीं हं ! उगीच बडबडायचें म्हणजे काय ? "

नीलकंठ बिचारा एवढा वेळ कसा तरी चोच आवळून मुकाट्यानें उभा होता. आतां त्याला राहवेना. तो आवेशानें म्हणाला, " बडबडूं नको, बोलूं नको, कांहीं सांगू नको तर करूं तरी काय ? किती किती दिसतें आहे तें सांगितल्याशिवाय राहवतच नाहीं ग मला ! कसें छान सोनेरी ऊन झळकतें आहे, आभाळ निळें गडद आहे. झाडावर फळें लटकलीं आहेत, फुलांचे गेंद डुलत आहेत, माझा ऊर कसा भरून येतो आणि सारखें सांगावें, बडबडावेंसें वाटतें ग ! ओढा खळखळ गातो आहे, आभाळांत पांढरे चिमुकले ढग कोकरांसारखे बागडताहेत. किती सुंदर आहे हें जग. ह्या जगांत जगण्यांत किती मजा वाटते. तुला नाहीं वाटत ? आणि हें सगळें वाटणें बोलून दाखवावेंसें वाटतें. मुका कसा राहूं ? दगड मुका राहील. बडबडू नको तर काय करूं. माझा जन्मस्वभावच आहे हा. आणि तुला मुका प्राणी आवडतो म्हणजे म्हणणें तरी किती विचित्र तुझें ! "

बोलतां बोलतां दम लागला म्हणून नीलकंठ थांबला. तेवढ्यांत घाई घाईनें मैनेनें आपलें म्हणणें पुन्हां सांगून टाकलें. " माझ्या-सारखा बोलका असतास तर मला मैनोबाचा कंटाळा का येतो



अनुक्रमणिका

आणि मुकाच आवडतो तें कळलें असतें. तुला गाणारी हवी, मला आवाज सुद्धां न काढणारा मुका नवरा हवा. मग बोलवेवढा मैनोबा नसता का पसंत केला मी ? तुला बोलणारी, गाणारी मैना हवी. मलाही निराळें हवे, तूं सुंदर आहेस. चालेल, पण बडबड नको ग बाई. माझें ठरलें. तुझें तूं ठरव. पण वचन बिचन नाहीं हं! वाट पाहायला कुठें वेळ आहे. पावसाच्या आंत उरकून घेतलेंच पाहिजे." उत्तराची वाट न पाहतां मागें पहात पहात मंजूळ लकेऱ्या घेत मैना उडाली ती झुडुपांत दिसेनाशी झाली.

नीलकंठ दुःखानें कष्टी झाला. त्याचा गळा भरून आला. शब्दच फुटेना. त्यानें मनाशीं ठाम ठरवून टाकलें. मैनेशिवाय कोणी नाहीं. बस्स. आज पासून—आतांपासूनच बडबडायचें नाहीं. मुळी बोलायचेंच नाहीं. मैनेला आवडतोना. मग आता मुकाच व्हायचे ! तो मुंड्या पिंपळावरून उडाला आणि जंगलाकडे वळला.

शंभर वेळां पंखांची फडफड झाली असेल तोंच त्याच्या मनांत एक कल्पना चमकून गेली. मनांत आलेलें, तोंडांतून बाहेर पडलें नाहीं तर तो जातीचा नीलकंठ कसला ! तो बडबडला, ' चोचींत कांहीं तरी घट्ट धरून ठेवलें तर तोंड आपोआप बंद होईल. ठीक, असेंच करावे. चोचींत एक अंडे धरावे. तोंड उघडलें तर अंडे पडून फुटेल ही सारखी भीति राहील. ठरलें !"

पण अंडें कुठून मिळवायचें ? पुष्कळ आयाबायांना विचारलें. पण कोणी तयार होईना. सगळ्या म्हणत, ' वारे वा ! असल्या वाचाळ बडबड्याच्या ' तोंडांत संभाळायला कोण अंडें देणार ? नवऱ्याना सुद्धा नाहीं नीट संभाळता येत. आमचीं अंडीं वाटेवर नाहीं पडली आपल्या बायकोला माग. घालील एक अंडें जास्त ! आम्हाला कां त्रास. घरचें झाले थोडे—

नीलकंठ किंचाळला, ' खासा कारभार, म्हणे बायकोला माग. अहो मनासारखी बायको मिळवण्यासाठीं तर हा सारा खटाटोप ! नाहीं तर होतीच कीं तुमच्या पैकीं. आपल्या मानासारखें कांहीं होत नाहीं. मैना आतां आपल्या पंखांत सांपडत नाहीं या विचारानें त्याला इतके वाईट वाटले, इतकें मनाला लागलें कीं अर्धा तास त्याच्या तोंडांतून शब्द फुटेना.

मग त्याच्या लक्षांत आलें, " होरे हो, वाईट वाटलें म्हणजे गळा दाटून येतो, आवाजच फुटत नाहीं मग बडबडणें कुठलें ! काय बिनतोड युक्ति सांपडली पण ! बस्स वाईट वाटून घेतलें पाहिजे. चला मैनेच्या कानांवर घालूं. आनंदाच्या भरांत तो उडत बडबडतच तीरासारखा जंगलांतून निघाला. वाटेंत एका झाडाखालीं एका तिरक्या टोपलीपुढें पांढऱ्या शुभ्र तांदुळांचा ढीग दिसला. तो थबकला. ' चला आज तोंडपालट म्हणून चार तांदूळ तोंडात टाकूं.' खालीं उतरून त्यानें भराभर तांदूळ टिपायला आरंभ केला.

या अपूर्व खाण्यानें त्याचें हृदय आनंदानें भरून आलें. किती तरी वेळ तांदूळ खात तो बडबडत होता. मग एकदम गप्प झाला. ' अरे, आपण बडबडायला तोंड उघडलेंच शेवटीं. कांहींच उपाय चालत नाहीं. सुंदर दिसलें, मिळालें कीं बडबडावेसे वाटतेंच. मी तरी काय करूं. वाईट कशानें वाटणार आतां. आतां कसची मैना मिळते आपल्याला."



## ये रे घना—

| | |
|---|---|
| ये रे घना | गंध गेला |
| ये रे घना | रानावना... |
| न्हावूं घाल | ये रे घना |
| माझ्या मना.... | ये रे घना |
| फुलें माझीं | मंद उन्हें |
| अळु-माळू | माळतांना |
| वारा वघे | न्हावूं घाल |
| चुरगळूं | माझ्या मना |
| नको नको | ये रे ये रे |
| म्हणतांना | शामघना...... |

—— आरती प्रभू

एवढे विचार संपण्यापूर्वीच टोपलें डोक्यावर पडले. आटोपला कारभार. फासेपारध्याच्या जाळ्यांत नीळकंठ अडकला. फासेपारध्यानें नीलकंठाला घरीं नेऊन एका पिंजऱ्यांत ठेवले आणि लागलीच शहरांतल्या एका पक्षीविक्याला विकलें. पकडल्याबरोबर नीलकंठाची वाचाच बसली. उजव्या पंखांत चोच खुपसून तो स्वस्थ बसून राहिला. पक्षीविक्याला आश्चर्य वाटे. " दुकानांतले इतर अनेक जातींचे लहानमोठे पक्षी आनंदानें आवाज करीत पिंजऱ्यांत उड्या मारीत आणि हा सुंदर पक्षी असा अबोल कसा ? " इतर पक्षीही नवलानें चमत्कारिक आवाज काढीत एकमेकांना खुणावीत. फारच भूक लागली तर एखादा वाटींतला किडा खावा, चोचभर पाणी प्यावे पण दिवसरात्र मरगळून पडून राहावे असे पंधरा दिवस गेले. एक दिवस त्याच्या मनांत आलें. ' काय नशीब आहे पहा. इतके दिवस मी मुळींच बडबडलों नाहीं. मोकळा असतो तर मैना माझी झाली असती आज. आमची मुलें नीलकंठासारखी सुंदर आणि मैनेसारखीं मंजुळ गाणारीं झाली असतीं. कुठें नाहीं तें आम्हीं करून दाखविलें असतें. पण मी असा पिंजऱ्यांत बंदिवान. वसंत भरांत आला आहे आणि मैना तिकडे मारे आभाळांत गिरक्या मारीत तानेच्या भिंगऱ्या फिरवीत असेल. अरेरे ! ' एक लांब सुस्कारा सोडून नील-कंठानें पुन्हां चोंच पंखांत खुपसली.

इतक्यांत जवळ एक मंजुळपण गदगदलेला आवाज निघाला.

" वाचासुंदर, नीलकंठ ! बडबडाहो. मला अगदीं करमत नाहीं हो ! "

जवळच्या पिंजऱ्यांत त्याची मैना अस्वस्थ मनानें पंख फडफडवीत पिंजऱ्याच्या गजांना धक्के मारीत होती. आपली जीव कीं प्राण अशी मैना आपल्यासारखीच कैदी झालेली पाहून नीलकंठाचे हृदय

अनुक्रमणिका




दुभंगलें. दुःखानें त्याच्या तोंडाला कुलुपच लागलें. मैना विव्हळत म्हणाली, 'एकदां तरी बोला हो, सांगा हो मला. आमराई, कुरणें, फुलें, फळें, उन्हाचे कवडसे, निळें आभाळ, सगळें सुंदर सांगा हो मला !''

नीलकंठानें एक आवंढा गिळून बडबडण्यासाठीं चोंच उघडली. पण दुःखाच्याभरानें त्याच्या गळ्यांत आवाज गुदमरून गेला होता. पण पूर्वींच्या स्वातंत्र्याच्या सुखी दिवसांचें चित्र जसजसें त्याच्या डोळ्यापुढें तरळूं लागलें तसतसा त्याला आवेश चढला. झुळझुळते झरे, शेवाळलेले खडक, रंगीत फुलें आणि आनंदी फुलपांखरें यांच्या गोष्टी तो अर्धा तास बडबडत सुटला. तरी मैनेचा चेहरा खुलेना. ती खाली मान घालून पिंजऱ्याच्या कोपऱ्यांत पाठमोरी उभी राहिली. तेव्हां नीलकंठानें दुप्पट आवेशानें किती तरी नवीन नवीन वर्णनें काव्यमय भाषेनें सांगायला आरंभ केला. त्याचें बडबडणें ऐकतांना साऱ्या गोष्टी, ढगांचे, पाना-फुलांचे रंग डोळ्यापुढें उभे राहिले. वाऱ्याची झुळूक, पानांचें हंसणें, मधमाशांचा गुंजारव ऐकूं आला. फुलांचा सुगंध दरवळला, फळांचा स्वाद जिभेला कळला, कुणी तरी प्रेमानें गोंजारीत पिसे कुरवाळीत आहे असा भास झाला. पिंजऱ्याच्या कोंदट वातावरणांतून सुटून आपण जोडीनें उंच आभाळांत मोकळ्या मनानें स्वच्छंद गिरक्या मारीत आहोत असा भास झाला. अशी अर्धा तास वटवट केल्यावर नीलकंठाचा आवाज घोगरा झाला, साफ बसला.

मैना तोंड वळवून त्याच्याकडे फुललेल्या चेहऱ्यानें म्हणाली, 'सख्या नीलकंठा, मला आतां किती बरें वाटतें आहे म्हणून सांगूं? आपण दोघे दोन वेगळ्या पिंजऱ्यांत आहोत हें सुद्धां मी आतां विसरलें बघ ! तुझ्या बडबडण्यानें माझ्या जिवांत जीव आला. आणि मी वेडी तुला न बडबडण्याची अट घातली होती. थांब हं, मीच तुला गाणें म्हणून दाखवते.''

आणि मैनेनें चोंच उघडून गाण्याची मैफलच उभी केली. सारी बंदिवान पांखरे मुक्यानें ऐकूं लागलीं. पिंजऱ्यांतल्या सारिकेच्या-साळुंकीच्या–मैनेच्या मंजुळ स्वरांत जगांतल्या सर्व दुःखाची टोचणी होती. जोडीदार मिळाल्याचा आनंद पण त्याच्यापासून दूर रहावे लागत असल्याचे दुःख यांचे मिश्रण होतें. मोकळ्या जगाचा भव्य देखावा मनाला उंच नेत होता आणि दुकानांतील साऱ्या पांखरांची केविलवाणी स्थिती करुण सुरांत पाझरत होती. तिचें गाणें ऐकून वाटेनें जाणारी माणसें थबकून उभी राहिली. त्या घोळक्यांत जख्ख एक म्हातारा उभा होता. तो कळवळून म्हणाला, 'अरेरे, गुणी पोर पिंजऱ्यांत डांबली आहे. तिच्या गाण्याचें चीज तुम्ही आम्ही करायचें नाहीं. तिचा बोलविता धनी माणूस नाहीं. तिचें गाणें तुमच्या माझ्यासाठीं नाहींच नाहीं. तिचें गाणें मोकळ्या आंबराईंत जसें खुलेल तसें येथें नाहीं.'' दुकानांत जाऊन वाजवीपेक्षां जास्त किंमत शंभर रुपये देऊन पिंजरा बाहेर आणला. मैनेला बाहेर काढून डाव्या हातांत घेतली आणि उजव्या हातांतल्या सोट्यानें पिंजऱ्याचे शंभर तुकडे करून टाकले. मैनेला तळहातावर बसवून डोळ्यांत आंसवें आणून तिला गोंजारीत तो म्हणाला, 'बेटा मैने ! आमच्या नशीबीं नाहीं पण तूं आतां मोकळी झालीस. दाही दिशा तुला मोकळ्या आहेत. जा खुशाल वाटेल तिकडे !''

आकस्मिक सुटकेमुळें बावरलेल्या मैनेनें आभाळांत उंच भरारी मारून दोन चार गिरक्या घेतल्या. आंबराईवरून एक चक्कर मारलें. मोकळ्या हवेंत श्वास घेतल्यावर आनंदानें तिनें गाणें म्हटले. म्हाताऱ्याचे आभार मानले आणि दयाळू देवाची स्तुती केली. इतक्यांत तिला नीलकंठाची आठवण झाली. त्याबरोबर ती दुकानाकडे वळली आणि झरकन् खाली उतरली आणि छपराच्या वळचणीखालीं बसून खिन्न मनानें नीलकंठाच्या पिंजऱ्याकडे टक लावून पाहत बसली.

इकडे नीलकंठाचा आनंद त्याचा इवलासा छातीचा पिंजरा फोडून बाहेर येऊं पहात होता. आपली जिवलग मैना संकटांतून सुटली. तिला मोकळें जीवन जगायला मिळणार या कल्पनेनेंच त्या प्रेमळ पाखराचें मन थरारून गेले आणि त्या भरांत तो मोटमोठ्यानें जलद बडबडूं लागला. पण त्याच्या बसक्या घोगऱ्या नरड्यांतून कर्कश बदसूर निघालेले ऐकतांच घोळक्याची पांगापांग झाली. पिंजऱ्यांतली चिटपाखरेंसुद्धां पंखांत मुंड्या खुपसूं लागलीं. पक्षी-विक्याचे कान किटून गेले. हातांतली रुपयांची थैली कोपऱ्यांत फेकून रागारागानें तो बाहेर आला आणि पिंजऱ्याचें दार सताड उघडून नीलकंठाचे मानगूट धरून तो म्हणाला. "जास्त ओरड-शील तर गळा दाबीन. सुंदर असलास तरी असला बेसूर वटवट्या पक्षी कुणाला आवडणार ? कोण विकत घेणार ? खायला काळ.'' त्याला दूर भिरकावून देतांच बिचारा नीलकंठ नाल्यांत जाऊन पडला.

पक्षीविक्याची बायको म्हणाली, 'अहो पण विकला असता तर दोन रुपये तरी मिळाले असते.

पक्षीविक्या बेपर्वाईनें म्हणाला, 'सोड दोन रुपड्यांची बात. कोण विचारतो मरतुकड्या भुकेनें खंगलेल्या बदसूर पाखराला. पेंढा भरून ठेवायचा म्हटलें तर पांच रुपयाला चाट बसायची. तुझा बोकासुद्धां तोंड लावणार नाहीं त्याला. चल, त्या मैनेच्या सौद्यांत चांगला नफा मारला आहे. मूर्खच होता म्हातारा.'

नीलकंठ शरमेनें अर्धमेला झाला होता, सुटकेचा आनंदसुद्धा अजून मनाला जाणवला नव्हता. मैनेनें खालीं उतरून त्याच्या चोचींत चोंच घालून त्याला सावध केलें. अंगांत गरुडाचें बळ संचारून नीलकंठानें उंच भरारी मारली. आणि मैनेभोंवतीं गिरक्या मारीत तो तिला घेऊन गर्द आमराईत दिसेनासा झाला.

आतां त्यांचा संसार सुखानें चालला होता. दुःखाचा अनुभव मिळाल्यामुळें मैनेचा गर्व कमी झाला होता. पण आनंदी नील-कंठाची बडबड सुखामुळें जास्तच वाढली होती. ढोलींतल्या भोकांतल्या, गवत, कापसाच्या पाळण्यांत पांच अंडीं उबवण्यांत मैना गुंतली होती. आपलीं बाळें आपल्याप्रमाणें गाणारी पण नीलकंठाप्रमाणें सुंदर होणार या स्वप्नांत ती दंग होती. नीलकंठाच्या बडबडीकडे तिचें कुठें लक्ष होतें !

पण नीलकंठाला भीति वाटे. आपल्या बडबडण्याला विटून मैना-राणी आतांच सोडून गेली तर ? हो आणि बाळें तिच्यासारखी गाणारी निघाली तर सारेच आपला कंटाळा करतील. या विचारानें शरमून नीलकंठ दूर कुठें तरी जाई आणि आपलें मन मोकळें करीत एकटाच खूप बडबड करी. घोगरा होऊन आवाज अगदीं बसला म्हणजे मग निःशंक मनानें हलकेच घरीं येई. बिचारा नीलकंठ.

• • •







एक पानी कथा

# पानिपत

शिवाजीपार्कवरील आमच्या क्लबमध्यें नेहमीप्रमाणें आमच्या गप्पा रंगांत आल्या होत्या. बोलतां बोलतां ॲटमबॉंबपर्यंत आमचं बोलणं येऊन ठेपलं. ॲटमबॉंबवर सुद्धां आमची चर्चा जोराजोरांत चालू होती.

या वाग्युद्धांत भाग न घेतलेली अशी एकच व्यक्ति होती. ती म्हणजे बंड्या नाडकर्णी. तो शांतपणें खिडकीकडे बसून सिगरेटस् ओढीत होता व खिडकीबाहेरील 'शोभा' पहात होता. बोलतां बोलतां एकजण म्हणाला, "ॲटमबॉंबचा मोठा फायदा म्हणजे झटपट, त्रास न होतां मरण येतं. शिवाय ॲटमबॉम्ब टाकणंहि कांहीं त्रासाचं नसतं. बॉंबवाहू विमान शहराच्या वर न्यायचं व विमानांतला बॉंब खालीं सोडायचा. बास्. काम खलास."

आणि हें ऐकतांच बंड्यानें खिडकींतील आपली मान वळविली व चालू संभाषणांत भाग घेण्याच्या उद्देशानं तो म्हणाला—

"सुरा घेऊन समोरासमोर युद्ध करणं जितकं कठीण आणि कौशल्याचं आहे, तितकं कठीण दुसरं कांहींच नाहीं."

"असं ! पण तुला त्याचा कांहीं प्रत्यक्ष अनुभव आहे का ?" आमच्यापैकीं एकानं विचारलं.

"आहे. जरूर अनुभव आहे. एकवेळ-चाच अनुभव आहे पण तो भरपूर आहे—" बंड्या असं म्हणाला व विजयी मुद्रेनें आम्हां सर्वांकडे पाहूं लागला.

"एके रात्रीं मी हॉटेलमधील माझ्या खोलींत बसलों होतों–'एप्रिल आणि बेकर' कंपनीचा मी त्यावेळीं फिरता एजंट होतों. व माझ्या कामासाठीं मला लहानमोठ्या गांवीं नेहमीं जावें लागत असे. अशाच एका तालुक्याचं तें ठिकाण होतं, मुंबईपासून जवळ. नांव नाहीं सांगत रात्रीचे दहा–साडेदहा झाले होते. पुस्तक बाजूला ठेवून मी झोपण्याचा विचार करीत होतों. एवढ्यांत एक मनुष्य माझ्या दारांत उभा राहिला. त्याच्या हातांत उघडा सुरा होता !

"तुझ्याकडे काय असेल तें झटपट काढ, नाहीं तर नाहक प्राणास मुकशील !" त्यानें एका दमांत मला दरडावून सांगितलें.

चेहऱ्यावरून क्रूर दिसणारा तो मनुष्य बोलल्या प्रमाणें करावयास मागें पुणें पहाणार नाहीं या विषयीं माझी खात्री झाली. आणि शांतपणें मी माझ्या टेबलचं ड्रॉवर उघडा-यला सुरवात केली. ड्रावरच्या आंत त्या दिवशीं सकाळींच विकत घेतलेला एक खरी सुरा होता. त्या खऱ्या सुऱ्याचा आकार सुऱ्यासारखाच होता व रंगही शोभेसाच होता. मजेखातर त्या सुऱ्यावर मी तांबड्या शाईनं डाग पाडले होते. रक्ताच्या डागांचा आभास निर्माण करण्यासाठीं. तो सुरा दृष्टीस पडतांच माझा विचार बदलला. मी तो हातांत घेऊन त्या सुरेवाल्या समोर सामना करण्यासाठीं उभा राहिलों. मी सुरा घेऊन त्याच्यावर हल्ला करावयास येईन याची त्याला कल्पना नव्हती. तरीहि आत्मसंरक्षणासाठीं तो दोन पावलं मागें सरकला. आम्ही हातांत सुरे घेतलेले दोघे समोरासमोर उभे होतों. एकमेकांवर तुटून पडण्य साठीं उतावीळ झालों होतों. मात्र माझ्या शत्रूपेक्षां मला आणखी एक सावध-गिरी घ्यावयाची होती. शत्रूचा सुऱ्याचा वार तर चुकवायचाच व शिवाय माझ्या सुऱ्याचा त्याला स्पर्श होणार नाहीं याची दक्षता घ्यायची कारण—

मी मोठ्या कौशल्याने लढत होतों. माझी छोटी खोलीं हें आमचं पानपत होतं. गुद्याला गुद्दा, ठोशाला ठोशा, धडकीला धडकी अशा तऱ्हेनें आमचे द्वंद्व चाललं होतं. मी ज्याप्रमाणें त्याच्यावर सुरा मारीत नव्हतों पण सुरा मारल्याचा यशस्वी अभिनय करीत होतों त्याचप्रमाणें त्याचा सुरा माझ्या शरीराला स्पर्श करणार नाहीं याची दक्षता घेत होतों.

**श्रीकृष्ण ठाकूर**

आमच्या या युद्धांत थोडावेळ माझा जय झाल्यासारखा वाटे थोडावेळ त्याचीं सरशी झाल्यासारखी वाटे. पण निश्चित निर्णय लागत नव्हता. ह्या अनिश्चित् अवस्थेचा शेवट केव्हां होणार ? कसा होणार ?...मी त्याचा सुरा असलेला हात चपळाईनें पकडला व पिरगळला. 'आईग !' त्याच्या तोंडून शब्द निघालाच. तत्क्षणीं त्याच्या हातांतील सुरा खालीं पडला. आणि काय आश्चर्य ! खालीं लादीवर पडलेल्या त्या सुऱ्याचा आवाज झालाच नाहीं. कां ? मी तो पायानं चाचपला.

मित्रहो तो सुराहि माझ्या सुऱ्याप्रमाणें खरी होता.

"आपण दोघेहि एकमेकांना फसविण्याचा प्रयत्न करीत होतों—" तो म्हणाला.

"खरं आहे." मी म्हणालों "पण तूं आतां एथून काळें करशील तर बरं" आणि मी माझ्या जागेवर बसलों.

"ठीक आहे–" असें म्हणत त्यानें आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांत हात घातला व त्यांतून पिस्तूल बाहेर काढून तें माझ्यावर रोखून तो म्हणाला—

"महाशय, आतां तरी आहे तें मुका-ट्यानें देतां कीं—"

ही अनपेक्षीत कलाटणी पहातांच मी घाबरलो व माझे दोन्ही हात वर केले.

"तुझं तें रिस्टवॉच, ती सोन्याचीं बटणं नि खिशांतील पैसे मला दे कीं मी चाललों."

मी अगतीकपणें त्याला सारे दिले—"

एवढं बोलून बंड्या नाडकर्णी गप्प बसला.

"पण काय रे बंडू" मी विचारलं, "नाहीं म्हटलं तरी तुझं अडीच-तीनशेंचं नुकसान झालं नाहीं ?"

"होय." शांतपणें बंडू म्हणाला. "पण त्या नुकसानीपेक्षांही पुढें जे घडलं तें फारच वाईट. "त्या वस्तू घेऊन तो निघाला" बंडू म्हणाला, "व दारांत उभं राहून त्यानें मला 'गुड नाइट' केलं आणि—"

"आणि काय ?

"त्यानं तें पिस्तुल माझ्या तोंडावर फेकलं व दार बंद करून तो चालता झाला."

"तुम्हांला लागलं का ?" आम्ही चक्-चक् करीत विचारलं.

"होय" बंडू

"कुठं ?" आम्ही.

"इथं" छातीवर बोट ठेवून बंडू म्हणाला.

"मित्रानो काय सांगूं–तें–तें पिस्तूलहि खरीच होतं—" आणि बंडू बैठकींतून उठून निघून गेला.

• • •






अनुक्रमणिका

मराठी भाषेंत इंग्रजी शब्द विनाकारण घुसले आहेत अशी फार दिवसाची भाषाशुद्धिवाल्यांचीं हांकाटी! पण इंग्रजी भाषेनेंहि भारतीय शब्द कसे आत्मसात केले आहेत यांचें हें मार्मिक विवेचन आमच्या भाषाशुद्धीवाद्यांना जणूं परस्पर उत्तरच आहे—!



# भारतीय भाषेंचा इंग्रजी अवतार

— श्री. बा. जोशी, एम्. ए.

प्रत्येक प्रचलित भाषेंत नित्य नव्या शब्दांची भर पडत असते ही आपल्या अनुभवाची बाब आहे. आपल्या मराठी भाषेंतहि इंग्रजी, पर्शियन, पोर्तुगीज, कानडी, तेलगू वगैरे भाषांतून शब्द आले आहेत. पण इंग्रजी भाषेनें ज्या प्रमाणावर परभाषांकडून उसनवारी केली त्याला तोड नाहीं. त्यामुळेंच आज इंग्रजी भाषा अतिशय समृद्ध बनली आहे. त्या भाषेच्या भांडारांतील भारतीय शब्दरत्नांची पारख देशी-परदेशी भाषाशास्त्रज्ञांनीं वारंवार केली आहे. हा विषय जेवढा महत्वाचा आहे तेवढाच मनोरंजकहि आहे.

कोणत्याही भाषेंत देशकालपरिस्थितिनुसार सतत बदल होत असतात. जिवंत राष्ट्रांची भाषासुद्धां जिवंतपणें वाढत असते. वंश, हवामान, व्यवसाय, वागिंद्रियांची रचना व्यक्तिगत उच्चारभिन्नता, ऐतिहासिक आणि सांस्कृतिक परिस्थिती, उच्चारसुलभतेकडे प्रवृत्ति, अनुकरणप्रियता, आनुवांशिक संस्कार, नव्याचा हव्यास, जुन्याचा कंटाळा परकीयांचा संसर्ग अशा एक ना दोन अनेक गोष्टीमुळें भाषेच्या स्वरूपावर परिणाम होत असतात.

दोन भिन्न भाषांचा संनिकर्ष अनेक प्रकारानें होणें शक्य असतें. या संबंधाच्या कमी अधिक तीव्रतेवर शब्दांच्या देवघेवीची तेजीमंदी अवलंबून असते. जेव्हां सबंध देश एखादी परकी भाषा शिकत असतो तेव्हां त्या परभाषेचा एतद्देशीय भाषेवर परिणाम होणें अपरिहार्य असतें. कारण परकीय भाषा बोलत असतांना आपल्या भाषेंतील शब्द त्यांत न येतील याबद्दल आपण जागरूक राहतो. पण मातृभाषेंत बोलतांना अशी बंधनें नसतात, आपण अधिक मोकळे पणानें बोलत असतो. सहज परभाषेंतील शब्द आले तरी त्यांची पर्वा बाळगीत नाहीं एवढेंच नव्हे तर शिष्ठ आणि भारदस्त वाटावें म्हणून अशा परकीय शब्दांचा वापर मुद्दाम मोठ्या डौलानें करतो.

शब्दांच्या आदान–प्रदानासाठीं राजकीय वर्चस्वाची जरूर असतेच असें नाहीं. पण जेथें असें वर्चस्व वाढत असते तेथें ही देवाणघेवाण अधिक प्रकर्षानें होत असते. परभाषेंतील नव्या कल्पना नव्या वस्तु यांचा निर्देश करणारे शब्द जसेच्या तसे आपलेसे करण्याकडे प्रवृत्ति असते. 'शर्करा' हा मूळ संस्कृत शब्द थोड्याफार फरकानें सर्वत्र आढळतो. उदा० शक्कर (फारशी), सकर (ग्रीक), सॅकार (लॅटीन), झुकेर (इटालियन), त्सुकर (जर्मन), सुकर (फ्रेंच), शुगर (इंग्रजी) इत्यादि.

उच्च दर्जाच्या संस्कृतींतील नवे विचार व्यक्तविणारे शब्द जसेच्या तसे कनिष्ठ संस्कृतीकडून स्वीकारले जातात. इस्राएली, ख्रिश्चन आणि मुसलमान यांचें धार्मिक आणि सांस्कृतिक वाङ्मय पाहिलें तर याची सत्यता चटकन् पटते. (डेविड, अब्राहाम, इश्माएल, जोसेफ यासारख्या इस्राएली नांवांचें दाऊद, इब्राहिम, इस्माईल, युसुफ असें इस्मालीकरण झाल्याचें आपण पाहतोंच.) प्रदेश जिंकल्यामुळें, वसाहतीव्यापार वाढल्यामुळें, किंवा श्रेष्ठ साहित्याचा प्रभावी प्रसार झाल्यामुळेंसुद्धां नवीन शब्द भाषेंत येतात.

इतर कोणत्याहि पुढारलेल्या भाषांच्या मानानें इंग्रजी भाषा नवीन शब्दांना आत्मसात् करण्यास विशेष उत्सुक आढळते. जेथें जेथें इंग्रज गेले तेथें तेथें त्यांनी अर्थ संचयाबरोबर शब्द संचयहि अमाप केला. रोमन साम्राज्यांत ब्रिटन होतें त्या काळापासून अँग्लो–सॅक्सन भाषेंत शब्दांची आयात अविरत चालू आहे. त्यामुळें आजमितीस ती भाषा जगांतील वरिष्ठ भाषांच्या श्रेणींत मोडते. युरोपीय भाषांपैकीं स्कॅंडिनेव्हिअन, फ्रेंच आणि लॅटिन या भाषांनी इंग्रजीची सर्वांत अधिक धन केली. सन १६५० पासून हा व्यापार तेजींत आला. यावेळीं इतर देशांच्या उदाहरणानें उत्तेजित होऊन ब्रिटिशांनीं भारताच्या किनाऱ्यावर वखारी घातल्या. कांहीं वर्षांनीं व्यवहार-व्यापार भरभराटला. बारा बंदरांचें पाणी पिऊन लोक विलायतेंत परत येऊं लागले. त्यांनीं जगाच्या इतर भागांबद्दल आपल्या देशबांधवांत विलक्षण कुतूहल निर्माण केलें. या सर्व उलाढालींत भाषा झपाट्यानें वाढीस लागली होती. पोर्तुगीज, डच, फ्रेंच या प्रतिस्पर्ध्यांकडूनसुद्धां इंग्रजांनी शब्द उचलले.

आशियाई भाषांपैकीं अरबी भाषेनें सर्वांत जास्त शब्द इंग्रजीला पुरविले. एके काळीं बैझन्टाअिन् अरबांनीं स्पेनपासून मध्य-आशियापर्यंत साम्राज्य गाजविलें. युरोपीय संस्कृतीच्या निळ्या प्रवाहांत इस्लामी



अनुक्रमणिका

संस्कृतीची हिरवी धारा मिसळली. सरंजामशाहीच्या आणि भिक्षुकशाहीच्या दडपणाखालीं अंधारांत पिचत पडलेल्या युरोपांत यानंतर अनेक ठिकाणीं ज्ञानदीप तेवूं लागले. या काळांत सहस्त्रावधि अरबी शब्दांनीं युरोपीय भाषांत शिरकाव केला. इटली, स्पेन, फ्रान्स असा प्रवास करीत ते इंग्लंडलाहि पोंचले. त्यांचीं उदाहरणें असंख्य सांगतां येतील. 'अल्' या उपसर्गानें सुरुवात होणारे बरेचसे इंग्रजी शब्द अरबी खानदानीचे आहेत. Elixir (अमृत) हा शब्द 'अल्-अक्सीर' या शब्दावरून आलेला. आपणही 'रामबाण औषध' या अर्थीं हिंदीमध्यें 'अक्सीर दवा' असा वाक्प्रचार वापरतो. 'Alchemy' हा शब्द 'अल-किमया' या शब्दावरून साधलेला. 'किमया' शब्द आपल्या परिचयाचा आहेच. 'Alembic' हा शब्द 'अल्-इम्बिक्' (औषधें गाळण्याची भट्टी) यावरून आला. 'Alcove' हा शब्द 'अल्-काब्बा' (तंबू) वरून, तर 'Mat,' 'Matress' हे शब्द 'अल-मत्राह' (चटई) यावरून आले. 'Syrup' शब्द 'शराब' वरून आला. अल्कोहोल, अल्जिब्रा, अल्मायरा असे अरबी जातकुळीचे अनेक शब्द कोशच घेऊन बसले म्हणजे सांपडतील. Tamarind म्हणजे चिंच. शब्दांत इतिहास कसा सांपडतो याचें हें साधें उदाहरण. चिंच अरबी प्रवाश्यांनीं प्रथम भारतांत चाखली. दिसायला गाभुळलेली चिंच त्यांच्या आवडत्या खजुरासारखी भासली तरी चवीमध्यें जमीन-अस्मानाचा फरक! तेव्हां त्यांनीं तिला 'तमर-इ-हिंद' (भारतांतील खजूर) असें नांव दिलें. आज इंग्रजीं चिंच म्हणजे Tamarind असें समीकरण रूढ झालें आहे. Elephant हा असाच शब्द. याच्या व्युत्पत्तिबद्दल भाषाशास्त्रज्ञांत अनेक वाद झाले. अरबी भाषेनुसार त्याची व्युत्पत्ति 'अलेफ्-इ-हिंद' म्हणजे 'भारतांतील बैल' अशी असल्याचा दावाहि सांगितला जातो. Alpha म्हणजे बैल. रोमन वर्णमालेतील प्रथम अक्षर Alepa हें प्राचीन चित्रलिपीच्या काळांतील नंदीमुखाकार प्रतिमेवरून आले. 'आल्फा' म्हणजे बैलच—



या क्रमानें लिपिशास्त्रज्ञ त्याची व्युत्पत्ति दाखवितात. उर्दू 'आलिफ्' 'बे' 'पे' मधील प्रथम अक्षरांतही हा 'आल्फा' आहेच. अर्थात् याचे धागे प्राचीन मिसरी वर्णमालेपर्यंत पोंचतात.

आजच्या घटकेला इंग्रजी भाषेंत सुमारें ९०० मौलिक (basic) भारतीय शब्द सर्रास वापरले जातात व त्यापासून साधलेले सहस्त्रावधि शब्दहि इंग्रजी म्हणून ओळखले जातात. ही संख्या साहजिकच परिस्थितिनुरूप कमीअधिक होत राहील. विल्सनच्या कोशांत तत्कालिन इंग्रजींत आढळणाऱ्या २६००० भारतीय शब्दांची नोंद झाली आहे! आतां या भारतीय शब्दांचा समाचार घेऊं.

सन १६०० मध्यें पहिल्या एलिझाबेथच्या कारकीर्दीत ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली. आणि 'ताम्रमुखी' माणसांनीं आपली जहाजें सुवर्णभूमीच्या दिशेनें हांकारली. पण असा साक्षात् संबंध येण्याअगोदरहि कांहीं भारतीय शब्द सातासमुद्रापार पोंचले होते. ते गेले होते ग्रीकांच्या, फिनिशियनांच्या आणि अरबांच्या जहाजांतून. यांचा साकल्यानें विचार केला कीं ते मुद्दां इतिहासाच्या खुणा सांगतात. Sugar, Camphor, Sandal, Pepper (पिप्पली), Ginger (मल्याळी मधील 'इन्जियर') Lac (लाक्षा), हें कांहीं आघाडीचे दूत. Rice हा शब्द मूळ भारतीयच. भाषाशास्त्रज्ञ संस्कृत 'व्रीही' मध्यें त्याचें बीज सांगतात. पश्तु व बलुची या आर्यकुलांतील भाषांमध्यें आजही तांदुळाला 'वरीसी' व 'वरीझी' अशी नांवें आहेत. शिकंदराच्या स्वारीच्या वृत्तांतांत तांदुळाचा पाश्चात्य वाङ्मयांतील प्रथम स्पष्ट उल्लेख सांपडतो. हा ग्रीक शब्द 'oryza' असा आहे. त्यावरूनच पुढें Rice तयार झाला. अशा ज्या चिजा भारतांतून पश्चिमेकडे गेल्या त्याचीं नांवें पण अपभ्रष्ट स्वरूपांत कां होईना आज तिकडील भाषांत टिपतां येतात. इंग्रजांआधीं बस्तान मांडून बसलेल्या पोर्तुगीजांकडून इंग्रजांनीं Caste, Padre, Maistry, Ayah, Cobra, Mosquito, Cameez (खमीस) यांसारखे अनेक शब्द घेतले. हे शब्द पोर्तुगीजांनीं प्रथम भारतांत त्यांना नव्यानें आढळलेल्या गोष्टींसाठीं वापरले होते. याशिवाय कांहीं भारतीय शब्द भ्रष्ट स्वरूपांत पोर्तुगीज वापरीत असत तेहि इंग्रजींत गेले. Mango, Jack, Curry, Coir, Betel, Areca, Copra, हे त्या पैकींच. या सर्व व्यवहारांत किनाऱ्यालगतच्या भारतीय भाषांनींसुद्धां आपल्या शब्दभांडारांत भर घातली. गोवेंकरांकडून आपण चावी, बादली, लिलांव, बटाटा, साबण असे कितीएक शब्द उचलून अस्सावधींत त्यांना 'घरेलू' केलें.

सुरुवातीसुरुवातीस इंग्रज अधिकाऱ्यांनीं आपल्या खलित्यांमध्यें भारतीय शब्दांचा मनमुराद वापर केला. 'कुंपणी' सरकारचे हे अधिकारी विलायतेंतील आपल्या वरिष्ठांवर वजन पडावें म्हणून एतद्देशीय भाषेचें ज्ञान पत्रव्यवहारांत अशा तऱ्हेनें मिरवीत असत. प्रारंभीची दीडशें वर्षे हा खाक्या चालू होता म्हटलें तरी चालेल. पुढें कंपनीच्या लंडनमधील सूत्रधारांनीं हताश होऊन हुकूम सोडला कीं निरुपाय असेल तरच नेटिव्ह शब्द वापरावेत.! जित जनांकडून होणारी ही शाब्दिक कुरघोडी या मंडळींना मानवेना त्यामुळेंपण बरेच शब्द बाहेर पिटाळण्यांत आले.

इंग्रजींतील भारतीय शब्दांचा दोन दृष्टिकोनांतून विचार केला पाहिजे; (१) हे शब्द इंग्रजींत कितपत सामावले गेले. आणि (२) त्यांचा उपयोग त्या भाषेंत कोणत्या प्रमाणावर केला जातो. Oxford English Dictionary नें या परकीय शब्दांचे तीन वर्ग कल्पिले आहेत. (१) पहिला वर्ग 'naturals'चा. आपण त्यांना 'घरजांवई' म्हणूं. हे शब्द इंग्रजीशीं एकरूप झाले. भारतीयांखेरीज अन्य लोकांना तर मुद्दाम सांगितल्याशिवाय ते भारतीय शब्द आहेत असे कळणारच नाहीं, पण काही वेळां आपणांसहि भ्रांत पडते कीं हा शब्द इंग्रजींतून तर नाहीं मराठींत आला! उदा० Lac, Loot, Dacoit, Jungle, Bazar, Bunglow इ. (२) दुसरा वर्ग Aliens किंवा Deoizens चा. हे 'अतिथि' शब्द. ते इंग्रजींत वापरले गेले तरी त्यांचा भिन्न तोंडवळा अजून लक्षांत असल्यानें त्यांना पूर्ण इंग्रजीचा दर्जा मिळाला नाहीं. सतत आणि सहजपणें वापरांत राहिले तर

ते पहिल्या वर्गात चढतील, मागसले तर तिसऱ्या वर्गात ढकलले जातील. Buksheesh, Seapoy असे शब्द अजून याच इयत्तेत आहेत. (३) तिसरा वर्ग 'Casuals'चा. हे उपरे किंवा आगंतुक शब्द. प्रवास-पर्यटनांच्या हकीकती, तत्त्वज्ञानावरील ग्रंथ, इतिहास, समाजशास्त्र यांतून आढळणारे एतद्देशीय शब्द. हे सर्वसाधारण वाचकांना समजावून सांगितल्याशिवाय समजण्यास कठिण असतात. आज आहेत, उद्या असतील किंवा नसतीलहि अशी स्थिती असणारे हे शब्द. भाषा प्रवाहाच्या पृष्ठभागावर हे शब्द सारखे तरंगत असतात. त्यापैकीं कांहीं शब्दच त्या प्रवाहाशीं समरसून जातात.

या सर्व शब्दांचा उपयोग इंग्रजींत कितपत केला जातो याची तपासणी केली म्हणजे असें आढळतें कीं कांहीं मोजक्या लेखकांनींच मुद्दाम, हेतुपूर्वक - व समजून घेऊन हिंदी शब्द वापरले आहेत. बऱ्याच जणांच्या लिखाणांत ते नकळतच आले आहेत. चॉसर मॉलॉ किंवा शेक्सपीयर यांनी Bery! Camphor, Candy, Musk, Malabathrum, Panther असे शब्द चपखलपणें वापरले आहेत. हॉकिन्स, रो, फिंच, फ्रायर, हॅमिल्टन इत्यादि प्रवाशांच्या लिखाणांत असे अनेक शब्द स्वकीय शब्दांएवढ्याच सहजतेनें वापरलेले आडळतात. विशेषतः डॉ. जॉन फ्रायरच्या A New Account of India and Persia या ग्रंथांत हिंदी शब्दांची खैरात झाली होती. Bohra, Chitti, Dubashi, Ghary, Maharajah, Mongoose, Moosul, Naik, Sarposh, Tandel असे कित्येक शब्द त्यानें लोकप्रिय केले. या पुस्तकावरूनच पुष्कळ इंग्रजांनीं त्याकाळीं हिंदुस्थानची ओळख करून घेतल्यामुळें ते शब्द लोकांपुढें सतत राहिले व रूढ होऊं लागले. मिल्टन, ड्रायडन प्रभृती कवींनीं भारतीय संदर्भात भारतीय शब्दच हौसेनें वापरले व ते रूढ झाले.

अठराव्या शतकांत रॉबर्ट ऑर्म आणि एडमंड बर्क हे हिंदी शब्दांचा मोठ्या प्रमाणांवर वापर करून गेले. त्यावेळीं अर्काटच्या वेढा, अंधारकोठडी प्रकरण, प्लासीची लढाई आणि हेस्टिंग्सवरील खटला या गोष्टींमुळें भारतीय घडामोडींविषयीं उत्सुकता शिगेला पोहोंचली. अतिरंजित लिखाणास ऊत आला. यामुळें नव्या हिंदी शब्दांचा इंग्रजी लोकांना परिचय झाला. बर्कनें अर्जी, कबुलायत, दस्तक, अम्मल, जहागीर, नबाब, सुभा, दरबार, वकील, नजराणा, चौकी वगैरे शब्द पुनः पुनः वापरले. डॅनियल डीफो, ॲडिसन, गिब्बन, होरेस वालपोल, लॉरेन्स स्टर्न यांच्या वाङ्मयांतही असे शब्द मिळतात. यानंतर सर विल्यम जोन्स, हेन्री कोलब्रुक यांच्यासारखे विद्वान् संस्कृतचा अभ्यास करूं लागले. त्यावेळीं हिंदी शब्द हे इंग्रजींत अतिशय भोंगळपणें लिहिले जात असत. 'महाल' हा शब्द Mal, Maal, Mahl, Mehal, Mehaal, Mehaul, Mhal व Mohaul एवढ्या तऱ्हांनीं लिहिलेला आढळतो. ही अनागोंदी सुधारण्यासाठीं सर चार्लस् विल्किन्स, हाल्हेड वगैरे पंडितांनी शब्दांचे योग्य उच्चार दाखविण्यासाठीं कांहीं खुणा वापरण्यास सुरवात केली. सर विल्यम जोन्सनें वापरलेली उच्चारनिदर्शक चिन्हांची पद्धत पुढें रूढ झाली आणि थोड्या फार फरकासह आज तीच रूढ आहे. या नियमनामुळें मूळ भाषेतील उच्चारांबरहुकूम इंग्रजींत 'स्पेलिंग' करणें सोपें झालें.

१९ व्या शतकांत सर वॉल्टर स्कॉटनें 'The Surgeon's Daughter' ही भारतीय पार्श्वभूमीवरील कादंबरी लिहिली. स्कॉटनें भारतीय शब्द सढळपणें वापरले. उत्तरायुष्यांत त्याचें लक्ष इकडे वळलें. त्या अभ्यासानें तो भारतावर इतका लुब्ध झाला कीं 'India is the true place For a Scott to thrive in' असे मजेदार वाक्य त्यानें या कादंबरीच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे! राजपूत, पेटा, काफिला दिवाण, सरदार, वकील, किल्लेदार, स्वार, सिपाही, नगारा, हौदा, चबुतरा, चवरी अशा शब्दांची त्यांत रेलचेल आहे. अधिक वास्तवतेच्या भरीस पडून त्यानें वाक्प्रचारहि आपल्याकडील वापरले. उदा० या कादंबरींतील रिचर्ड मिडल्मस् आपल्या प्रेयसीला उद्देशून My Juliet असें न म्हणतां 'My

Nourgehan, my Moti Mahal असें बोलतांना दाखविला आहे ! राबर्ट साउदेनें ‘ The curse of kebama ’ म्हणून एक मोठें काव्य रचलें. त्याची पार्श्वभूमी व विषय भारतीय आहेत. यांत स्वर्ग, देवता, सुर, असुर, अमृत, जंगल, पंदल, योगी असे शब्द आले आहेत. परकीय शब्दांना मोडून-मुरडून इंग्रजी धाटणीचे करण्याची साउदेला संवय होती. ‘ गंधर्व ’ हा शब्द त्यानें ‘ Glendo-veers ’ असा बदलला ! लॉर्ड बायरनच्या काव्यांत इतर भारतीय शब्दांसमवेत अत्तर, बिस्मिल्ला, बुलबुल, गुल, होरी, पिलाव्, सलाम, सुलतान असे शब्द नव्यानें आले. कलकत्त्यांत जन्मलेल्या थॅकरेनें आपल्या सर्व कादंबऱ्यांतून अक्षरशः शेंकडों हिंदी शब्द वापरले आहेत. कांहीं वेळां हे शब्द त्यानें मिस्किलपणें वापरले आहेत. त्याच्या कांहीं पात्रांची नांवें मि. चटनी, जनरल सर राईस करी, मिस् ताडी, लेडी मेरी मँगो, मिस् बुलबुल, कॅ. बॅंगल्स, कर्नल गोल्डमोहोर अशी आहेत ! भारतांत जन्मला असला तरी त्याचें भारताविषयींचें ज्ञान स्नेह्यासोबत्यांकडून आणि पुस्तकांतून मिळविलेलें होतें. याउलट नोबलपारितोषिक पटकाविणारा रुडयार्ड किपलिंग लहानपणापासून इथें वाढलेला. लहानपणीं त्याला स्वप्नेंसुद्धां हिंदींत पडत असत ! १८८२ मध्यें पुन्हां भारतांत आल्यावर त्यानें इथल्या जीवनाचें निरीक्षण केलें. त्यानें जेवढ्या सहजतेनें आणि समर्पक रीतीनें हिंदी शब्द वापरले तेवढे अन्य लेखकांनी क्वचितच वापरले असतील. त्यानें नवे शब्द प्रचारांत आणलेच पण जुन्या शब्दांना सुद्धां त्याच्या लिखाणांत नवा रंग नवी डूब मिळाली. उत्तर भारतीय शब्दांवर त्याचें प्रेम फार होतें. आणि निदान कादंबरींतील एका पात्राकरवीं तरी त्यानें दक्षिण भारतीय शब्दांबद्दल नापसंती व्यक्तविली आहे. त्याच्या सर्वच शब्दांना इंग्रजींत जीवदान मिळालें असें मात्र नाहीं. शाबाश, कैदी, एकदम, जलदी, जादू, इज्जत हे त्यानें अनेक वेळां वापरलेले शब्द आज इंग्रजींत वापरत नाहींत. हिन्दी जाणणाराला त्याच्या कविता त्यांतील शब्दांच्या खिचडीमुळें चटकदार वाटत असतात.

किपलिंग नंतर फॉर्स्टर व थॉम्पसन यांनीं भारतीय जीवनावर लिहिलें. फॉर्स्टरची A Passage to India ही कादंबरी गाजली. ‘ Fielding wasn’t pucca ’ किंवा ‘ increasing the izzat ’ असे शब्दप्रयोग त्यानें वापरले. थॉम्पसनच्या ‘ An Indian Day ’ मध्यें अँग्लो-इंडियन समाजांतील कांहीं मिश्र वाक्प्रचार आढळतात. उदा० ‘ Jao jaldily ’ ‘ be choop about it ’ इ. ललित लेखकांप्रमाणेंच मोनियर विल्यम्स, विल्सन, मॅक्समुल्लर, ग्रँट डफ, एल्फिन्स्टन्, टॉड वगैरेंच्या लिखाणांतूनहि भारतीय शब्द लोकांसमोर येत होते. राजेमहाराजे आणि अमीरउमरावांचे जग, शिकारी, नाचतमाशे, पोलोसारखे खेळ, गिर्यारोहण वगैरे गोष्टींशीं पण इंग्रजांचा संबंध अधिक आला व त्यांतील खास शब्द इंग्रजीस चिकटले.

पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धांत कांहीं चांगल्या इंग्रजी लेखकांचा भारतीय सैन्याशीं आणि जीवनाशीं संबंध आला. डेनिस ग्रे स्टोल किंवा सेसिलि लेस्ली यांच्या कादंबऱ्यांत तत्कालिन प्रचलित शब्द आढळतात. स्वातंत्र्यानंतर तर भारतीय जीवनाविषयीं कुतुहल अपार वाढलें आणि तद्विषयक कविता त्यांतील शब्दांच्या खिचडीमुळें चटकदार वाटत असत. पुस्तकांचें पेंवच फुटलें. ॲलन मूरहेड, फिलिप वुड्रूफ, जॉन मास्टर्स, इलियट, हक्स्ले, फिशर असे अनेक लेखक हिंदी शब्द वापरीत आहेत। १८५७ च्या स्वातंत्र्य समराच्या शताब्दिनिमित्त इंग्रजींत ५१६ कादंबऱ्या व अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले; त्यांत हिंदी शब्द आले. याशिवाय नेपाळ, तिबेट, भूतान या प्रदेशांवर इंग्रजींत बरींच पुस्तकें झाली. त्यांतही कांही भारतीय शब्द येत गेले. या इंग्रज लेखकांबरोबरच २० व्या शतकांत रविंद्रनाथ टागोर, राधाकृष्णन्, सरोजिनी नायडू, गांधीजी, जवाहरलाल, मुल्कराज आनंद, आर्. के. नारायण, कमला मार्कन्डेय, ऑब्रे मेनन, खुशवंतसिंग, शान्ता रामराव, आर्थर लाल असे कितीतरी लहानमोठे लेखक इंग्रजींत लिहूं लागले. यांच्याप्रमाणेंच भारतांतील सर्व प्रदेशांत वृत्तपत्रव्यवसायांतही इंग्रजी वृत्तपत्रांनीं मोठी कामगिरी केली. त्यामुळें नवे नवे शब्द इंग्रजीस मिळत गेले. आजकाल तर भारताविषयीं जगांत सर्वत्र विलक्षण कुतूहल आहे. प्रत्यहीं नवी पुस्तकें लिहीलीं जात असून त्यांतून नवे शब्द प्रसृत होत आहेत. भूदान आंदोलनाचीच गोष्ट घ्या. ‘ भूदान, ’ ‘ सर्वोदय, ’ ‘ ग्रामदान ’ हे शब्द परदेशांत पोंचले सुद्धां ! या आंदोलनाच्या स्थैर्यावर त्या शब्दांची शाश्वती अवलंबून राहील. येथवर थोडे वांकडे वळण घेऊन इंग्रजी साहित्यांतील भारतीय शब्दांचा हा आजतागायत पण धांवता आढावा घेतला. पुढील लेखांत कोणत्या काळांत कोणते शब्द तिकडे गेले यांतील संगति शोधण्याचा प्रयत्न करूं.

(उत्तरार्ध पुढील अंकीं)

• • •



हा कोण मस्त कोपऱ्यात पहुडलेला—
नांव तर ‘ सूकर ’ दिसतें
पण दिसतो डुकरासारखा—
होय, तोच तो सूकर रानडुक्कर—
थुलथुलित पोटाचा जणुं इराणी
पावडरच्या चहावर आणि
शेंगदाण्याच्या लोण्यावर माजलेला.






आरं हीं कां येनार हायत व्हय ! चार पांच येळ पोलिस पाठवून खुद सरकारनं अपेश घेतलेलं कां गावाला ठावं न्हाई ? म्हने कब्जा घ्याया गांव येनार हाय !



म. गो. पाठक

चांदणं टिप्पूर पडलं होतं. अर्धी रात्र उलटून गेली होती. टेकाडापलीकडच्या नांदगांवांत कसलीहि हालचाल दिसत नव्हती. वारा पडला होता. झाडाचं पानसुद्धां हलत नव्हतं. प्रत्येक वस्तु जागच्याजागीं स्थिरावली होती. जणूं साऱ्या चराचराला त्या गूढ चांदण्यानं मोहनिद्रेंत टाकलं होतं.

पण टेकाडावरल्या भिमू सुताराच्या माळींत अजून दिवा तेवत होता. भिमूची कारभारीण कंदिल पुढ्यांत ठेवून सोप्याला बसली होती. अंगाचा पसारा आवरून मधनंच ती चौंडयावर येई आणि मान उंचावून नांदगांवाकडं बघे. पण माळीपासनं कासऱ्यावर असलेला दगडी वरवंटा आडवा येत होता. तिला गांव नीट दिसत नव्हता. वरवंट्यापर्यंत जाऊन गांवाकडनं येणाऱ्या गाडीवाटेवर तिला एकवार नजर टाकायची होती. पण माळी उतरायची देखील तिला छाती होत नव्हती. सोप्यांतनच जेवढं दिसेल तेवढं ती पाहात होती. मोठ्या धाष्टर्यानं तळखडयावर पाय देऊन खांबाच्या आधारानं गांवाकडं एकदा बघावं असं तिला वाटत होतं पण तिचे पाय पुनः पुन्हां जाग्यावरच खिळत होते.

भिमू सुतार आणि त्याची तीन आडमाप पोरं त्या दगडी वरवंट्यावर गांवांकडं तोंड करून बसली होती. उघडयाबंब भिमूच्या मांडीवर वीत सव्वावीत पात्याची फरशी कुऱ्हाड आडवी पडली होती. भिमूचे लोखंडी हात दांडयाशीं चाळा करीत होते आणि फरशीचे कहारी पातें चांदण्यांत लखलखत होतें. भिमूपासून दोन हातावर त्याचा थोरला पोरगा रंगा पाय खालीं सोडून बसला








होता. त्याच्या पुढ्यांत वचकत मावतील एवढ्या दगडी गोट्यांचा चांगला कंबरंइतका ढीग रचला होता. शिसवीवर पडलेल्या नेवळ्या धमक नागिणीसारखी आटपदरी गोफण रंगाच्या गिरेबाज गर्दनीभंवती सुस्तपणें रुळत होती. रंगाच्या पलीकडं गोपाळा बसला होता. कानाइतक्या उंचीच्या एका लोखंडी कांबेवर दोन्ही हात ठेवून तो जरा पुढं झुकला होता. दोन्ही अंगठ्याच्या मधोमध आपली हनुवटी ठेवून तो नांदगांव आणि टेकाड यांना जोडणाऱ्या गाडीवाटेकडं एकटक बघत होता. मधनंच त्याला काय लहर यायची कुणास ठाऊक. मान उचलून तो कांब उलटी सुलटी करायचा. भुईत रुतलेल्या टोकाची माती झटकून दुसरे टोंक भुईंत रुतवायचा. तसं करतांना त्याच्या दंडाचे गोळे कोपरापासनं खांद्यापर्यंत विजे-सारखे पळायचे. सगळ्यांत धाकटा रामू गोपाळापासनं दोन चार हातावर बसला होता. तो मोकळाच होता. चौड्यावर बसून नुकत्याच फुटलेल्या मिसुडाशीं डाव्या हातानं चाळा करत होता. रामूच्या पुढ्यांतच भिमूची दोन कुत्रीं बसली होती. मधनंच ती एकमेकाच्या नाकाला नाक लावून सल्लामसलत करत आणि कान टवकारून गांवाकडं बघत.

दहा वर्षांमागं तीन पोरांना आणि बायकोला घेऊन नांदगांवांत जगायला म्हणून आलेला हा भिमू सुतार अंगच्या ताकदीनं आणि मुजोरीनं आज अख्या गांवाला भारी झाला होता. शांता गुरविणीचा टेकाडालगतचा मळा त्यानं आठ वर्षांमागं वाट्यानं म्हणून केला आणि एका सालाच्या आंत घशांत घातला. पुनः त्या गुरविणीला त्यानं मळ्यांत पाऊल म्हणून टाकूं दिलं नाहीं कां दाण्याचा एक पसा तिच्या पदरांत टाकला नाहीं. भिमूची तिन्ही पोरं त्याच्याच मुजोर तालमींत तयार झाली. एकाचढ एक खवीस. तरण्याताठ्या पोरींनीं टेकाडाच्या बाजूला एकटं दुकटं फिरकायची सोयच नव्हती. अनेक कागाळ्या, तक्रारी झाल्या पण भिमूच्या औलादीनं आणि भिमूनं कुणालाच धूप घातला नाही. होतं नव्हतं ते किडूक मिडूक मोडून रंडक्या गुरवीणीनं भिमूवर दावा केला. मिशीवर ताव देत, छद्मीपणानें हंसत भिमूनं तो दावा चार वर्षं खेळवला. अखेर निकाल त्याच्या विरुद्ध लागला तरी भिमूच्या चेहऱ्यावरचा निगर-गट्टपणा एवढासुद्धां ढळला नाहीं. कोर्टाच्या बाहेर आल्या आल्या तो गुरविणीवर आपल्या डोळ्याचे इंगळ रोखून म्हणाला होता—

'कबजा घ्यायला येशील तवा मागला म्होरला समदा इचार करून मगच ये. घाई करूं नगस.'

दाव्याचा निकाल गुरविणीसारखा लागून आज साल उलटलं होतं...पोलिस, बेलिफ सगळं झालं. पण भिमूनं आपल्या हिकमती टाळक्यानं सगळ्यांना माघारी पिटाळलं. गुरविणीची अवस्था दिवसें-दिवस केविलवाणी होऊं लागली. दोन वेळचे वांधे येऊं लागले. चार भिंतीच्या आंत ती उपास तापास काढूं लागली...टाचा घासून दिसामासानं झिजूं लागली...

धापशिरी दगड पडला आणि वरवंड्यावर बसलेले भिमू, रंगा गोपाळा ताडकन उभे झाले. टका टका आजूबाजूला, गांव वाटेकडं, मागं–पुढं बघूं लागले. दोन्ही कुत्रीं सरा सरा मागं सरली आणि वरवंड्याला शेपट्या घाशीत जोरजोरानं भुंकूं लागली. रामू मात्र खाली मान घालून ओशाळल्या सारखा उभा राहिला. त्याच्या चौड्याखालचा दगड निसटला होता. बाकी कांहीं म्हणावं असं घडलं नव्हतं. दगड उचलून वरवंड्यावर ठेवत रामू कांहीं बोलणार एवढ्यांत रंगाच्या गोफणीचा सणसणीत फटका फाडकन् त्याच्या उघड्या दंडावर वाजला...

'च्यायला तुझ्या...गप जाऊन झोंप म्हणलं तर!'

दुसऱ्या हातानं दंड दाबीत रामू निमूट माळीकडं वळला. भिमू, रंगा आणि गोपाळा पुनः वरवंड्यावर बसले. रंगानं चांगली बचकभर तंबाकू मळली, बाबाला अन् भावाला दिली. तंबाखू दाढेला धरून मग ती तिघं पुनः गांवाकडं एकटक बघूं लागली.

रामू माळींत आला. त्याच्या कोंवळ्या दंडावर चांगल्या बोटभर रुंदीच्या वळाचा वेढा पडला होता. 'अग बाई...केवढा रं वळ उठला' हलक्या आवाजांत म्हणत रखमा त्याच्याजवळ आली. पण रामूला ती आईची माया सोसली नाहीं. हात उगारून ते बालक आपल्या मातेवर खेसकलं...'गप...आवाज करूं नगस.. दीन ठिवून एक –' रखमा मागं हटली. तिच्या पोटातनंच निघालेल्या त्या तरसाच्या पोराला ती बाचकली. रामू उगीच हातवारे करत माळी उतरला. मागच्या अंगाला गेला. अगदि मांजराच्या पावलानीं माळीवर चढला. माळीवर गेल्याबरोबर त्याचा चेहरा खुलालला. आख्खा गांव आणि टेकाडाकडं येणारी गाडीवाट झकास दिसत होती.

लांब कुठंतरी कुत्री भुंकल्याचा आवाज आला आणि ती तिघं ताटशिरी उभी झाली. भिमूची दोन्ही कुत्री भुंकत झरझर टेकाडा-खाली गेली आणि एका भल्या थोरल्या धोंड्यावर उभं राहून लांबता आवाज काढून भुंकूं लागली. दांड्याला फरशी पक्की बसलीय कां नाहीं हें चाचपत भिमू पुढं सरसावला. कुत्री भुंकत होती त्या दिशेनं लांबवर त्यानं नजर टाकली. गोपाळानं ती लोखंडी कांब वरच्यावर फेंकून एकदोनदा झेलली. रंग्यान गोफणीची मादी उजव्या हातांत गुंतवली. समोरच्या ढिगा-ऱ्यांतला एक गरगरीत गोटा डाव्या हातानं उचलून तो भिमूजवळ गेला. गांववाटेकडं नजरा लावून ते तिघंहि महाकाय पवित्र्यांत उभे राहिले. त्या निळसर पांढऱ्या चांदण्यांत त्यांची ती अवीट अंगं पंचधातूंनीं बनवल्यासारखी लखलखूं लागली. पण गांवाकडं कसलीच हालचाल दिसली नाहीं. भुंकत खाली गेलेलीं कुत्रीं पुनः परत टेकाडावर आली. चार दोनदां अंगाभंवती फिरून त्यांनीं अन्नदात्यासमोर बसकण मारली. काम बजावल्याच्या नजरेनें धांपा टाकीत आळीपाळीनं त्या तिघांच्या चेहऱ्याकडं बघूं लागलीं. भिमूनं मान उंचावून पुनः एकदां गांवाकडं बघितलं आणि तंबाकूची गुळणी टाकत तो घोगऱ्या आवाजांत बोलला,...

'च्यायला...फुकाफुकी जाग्रान. आरं ही कां येनार हायत व्हय! चार पांच येळ पोलिस पाठवून खुद सरकारनं अपेश घेतलेलं कां गांवाला ठावं न्हाई? म्हने कबजा घ्याया गांव येनार हाय! कच्या मुकाळीच्यानं तुला सांगितलं रं गोप्यां?'





अनुक्रमणिका

• गोपानं अगर रंगानं बापाला जबाब दिला नाहीं कां दोघंहि जागची हलली नाहींत.. गोपानं कंबरेची पिशवी काढून तंबाकू मळली आणि भिमूला अन् रंगाला दिली. दाढेला तंबाकू धरून भिमू पुनः वरवंड्यावर जाऊन बसला. बाप जरा अंतरावर आहे असं बघून भाऊ भाऊ एकमेकाच्या कानाला लागले. कांहींबाहीं कुच-कुचले आणि परत वरवंड्यावर येऊन बसले. गांववाटेकडं नजरा लावून मग ती तिघं अगदि निश्चल पुतळ्यासारखी बसून राहिली. चांगला घंटा अर्धा घंटा कुणीच कुणाशीं बोललं नाहीं.

'दादा ते बघ ते बघ दादा' माळवदावर बसलेला रामू एका-एकीं ओरडला. भिमू, रंगा आणि गोपा ताटशिरी उभे झाले. रखा रखा रखा त्यांनीं गांव आणि गांववाटेकडं बघितलं. पण कसलीच हालचाल नव्हती... चिटपांखरूं सुद्धां दिसत नव्हतं. तेव्हां भिमू उसळून म्हणाला—

'का रं भडव्या...का इच्चु चावला काय तुला ?'

'ते बघ गाड्या दिसल्यात...पाच...सहा...आठ...बारा ..'

क्षणभर गप्प उभं राहून त्या तिघांनीं सांवट घेतली. लांबवर गाड्यांच्या धावांचा आवाज खरंच ऐकूं येत होता. पण तो गांवाच्या दिशेनं नव्हता.

'थे...थे...थे बग ह्या अंगानं येल्यात गाड्या...' रामू टेकाडाच्या मागच्या अंगाकडं हातवारे करत माळवदावरनं ओरडला.

भिमू, गोपा अन् रंगा टांगा टाकीत उड्या हाणीत माळवदावर गेले. डोळे बारीक करून त्यांनीं रामापुरवाटेकडं नजर लावली. खरंच गाड्यांची एक रांगच्या रांग रामापुर नांदगांव वाटेनं पुढं सरकत होती. वाटेच्या दुतर्फा असलेल्या झाडींनं गाड्या किती होत्या अन् गाडींत माणसं आहेत कां माल आहे हे नीटसं दिसत नव्हतं.

'रामापुराकडनं सुटल्यान ह्या गाड्या. गांवच्या न्हवंत.'

'तें एवढ्यांत कां सांगतां येतंय...बायली ह्या झाडीनं एक घोटाळा केलाय.'

'आन् सडक सोडून आपल्या मळ्याकडं वळल्या तर ?'

'ए राम्या...गोप्या ती धोंडं आना माळवदावर.'

'गांवकरी बी हुशार झालं म्हणायचं. बायली सरळ वाट सोडून रामापुराकडनं आली जात.'

'गांवकरीच असलं तर ह्या फाट्यावरनं वळत्याल. वळल्या वळल्याच गोफणीचा मारा सुरूं करूं. मादीची गोफण आण रं रामा—, भिमू कुंबीवर पाय देत बोलला.

रामा, गोपा, रंगा खाली धांवले. त्यांनीं खालनंच भरारा माळ-वदावर गोटे फेंकायला सुरवात केली. बघतां बघतां कंबरएवढा गोट्यांचा ढिगारा माळवदावर गेला. कानावर हात ठेवून रखमा सोप्याला तशीच गच बसून राहिली होती. उघड्या डोळ्यांनी आपल्या पिसारी नवऱ्याची आणि तिरसट कार्ट्यांची लीला बघत होती.

रामपूर नांदगांव वाटेनें बैलगाड्यांची रांगच्या रांग पुढं सरकत होती. झाडीमुळं गाड्या किती होत्या हें सांगणं कठिण होतं पण



## मूर्ति लहान.. कीर्ति

# सा य क ल

(आपल्या दैनंदिन जीवनांत ज्यांच्यावाचून आपलं क्षणोक्षणीं अडतं अशा अनेक वस्तु असतात. दिसायला क्षुद्र दिसणाऱ्या या वस्तूंना किती गमतीदार इतिहास असतो हें आपल्यापैकीं किल्येकांना ठाऊक नसतं. या सदरांत अशाच छोट्या वस्तूंची नोंदी कहाणी आम्ही देणार आहोंत. दीपावलीच्या वाचकांपैकीं कुणाच्या वाचनांत अशी कांहीं गमतीदार माहिती आली तर ती अवश्य पाठवा, त्याला योग्य ती प्रसिद्धि आणि मोबदला मिळेल. !)

दुचाकी सायकल ही आतां आमच्या मध्यमवर्गीय जीवनाशीं एकरूप झाली आहे. पुण्यासारख्या शहरांतील सायकल आणि सायकलस्वार या अजब वस्तु आहेत. गल्ली बोळांतून चालत असतांना सायलस्वार कुठून आणि कसा येईल आणि कशा शिताफीनें त्या गर्दींतून वाट काढील कीं पादचाऱ्यांची मति गुंग व्हावी. पुणे-कराचा बाजारहाट, कचेरीची जा ये, पेशेपेशांतील सायंफेरी सायकल वरूनच होत असते. दोन आंबटशोकी मित्र आपापल्या सायकली सांभाळीत फूटपाथच्या मध्यभागीं उभे राहून राजकारणाची तावातावानें चर्चा करतांनाचें दृश्य लक्ष्मीरोडवर हटकून दिसायचें. सायकल हें पुणेकरांचे सौभाग्य आहे, आणि त्यामुळें या सायकल-वरून बुधवारांतून शनवारांत आणि शनवारांतून सदाशिवपेठेंत चकरा मारणारा पुणेकर साऱ्या जगाला त्या क्षणींतरी तुच्छ मानीत असतो.

पण सायकल हें वाहन फार प्राचीन असावें असा संशोधकांचा दावा आहे. इजिप्त आणि बाबिलोनच्या संस्कृतींत दुचाकी वाहनाचे उल्लेख सांपडतात. पॉम्पेच्या उध्वस्त अवशेषांतहि दुचाकी सांपडलीय. २७ जुलै १७७९ रोजी प्रसिद्ध झालेल्या 'जर्नल डी पॅरिस' या नियतकालिकांत ब्लॅंचर्ड मॉग्नीअर यानें शोधून काढलेल्या दुचाकीचा उल्लेख आहे.

आणि दुचाकीची कल्पना ही मूळ फ्रेंच माणसाचीच. १६९० मध्यें डी सिवॅरॅक या फ्रेंच माणसानें दुचाकीची कल्पना प्रत्यक्ष अमलांत आणली. एक लाकडी दांडा त्याला दोन चाकें आणि गति मात्र पायानें द्यायची. पण ही लाकडी सायकल फारशी लोकप्रिय झाली नाहीं.

आज वापरांत असलेल्या आधुनिक सायकलचा ओबडधोबड अवतार १८१७ सालीं न्यूरेंबर्ग येथें वार्ल ड्रेस या जर्मन माणसानें शोधून काढला. या सायकलीला व्हेलोसिपेड बायव्हेक्टर, बायसिपेड अशीं अनेक नांवें पडली. ही सायकल वापरणारा पहिला धाडशी माणूस म्हणजे जे. एन. निप्से. या नव्या वाहनावरून तो पॅरिस शहर

(पान ३२ वर पुढें चालू)







न आवरणाऱ्या लयींत;. पण गुलाम अह्लींचं सगळेंच कांहीं और होतें. टाळ्यांच्या गजरांत त्यांनीं मारवा संपवला. आणि गजर विरतो न विरतो तोंच त्यांनीं पूरियाला हात घातला.

तन्नांत कुजबुज सुरू झाली. मारव्यावर पूरिया गायचा ? जें मी मी म्हणणाऱ्यांना पेलत नाहीं, ती गोष्ट व्हायची कशी ? आतांपर्यंतच्या रंगतीवर हा खास पाणी ओतणार; परंतु तसं झालं नाहीं. मारव्याप्रमाणेंच ते पूरियाही तितक्याच जोमदारपणें आणि मर्यादा राखून गायले. मैफल संपली आणि बाहेर पडणाऱ्या प्रत्येक श्रोत्याच्या ओठावर हेच शब्द घोळत होते, "असा मारवा ऐकला नाहीं, असा पूरिया ऐकायला मिळायचा नाहीं.

यानंतर खाँसाहेबांचीं मीं अनेक गाणीं ऐकलीं. मारवाडी विद्यालयांत श्री. देवधरांनीं केलेल्या त्यांच्या सत्कारप्रसंगीं त्यांनीं गायलेल्या 'बागेश्रीचा' विसर पडणार नाहीं. भूपाचा तराणा तर मनांत घर करून बसलेला आहे. अगदीं गाढ झोंपेंतून उठवून कुणी विचारलं तरी सुद्धां त्याचे बोल ओठावर येतील इतका तो खोलवर रुजला आहे. "येरि ए मैं कैसे घर जाऊं" बागेश्रींतली ही चीज सगळेच गातात; पण 'ये' आणि 'रि' या दोन अक्षरांतला खाँसाहेबांचा लाडिक खटका त्यांच्या शिवाय दुसऱ्या कुणाकडून आतांपर्यंत तरी ऐकायला मिळाला नाहीं.

सूरसिंगार संसदेंत खाँसाहेब मोठ्या प्रेमानें गातात. त्यांचे प्रत्येक गाणं तिथं रंगलेलं आहे. एकदां स्वामी हरिदास जयंतीला त्यांनी जयजयवंती आणि त्यावर हमीर गाऊन एक वेगळेंच वैशिष्ट्य प्रस्थापित केलें होतें. 'हसमन'मध्यें रंगलेली 'भिमपलासी' तर त्यांच्या विरोधकांना सुद्धां कानाची पाळी पकडून जीभ बाहेर काढायला लावणारी ठरली होती. खाँ साहेबांची अशी अनेक, रंगलेलीं गाणीं मी ऐकलेलीं आहेत; परंतु त्यांच्याविषयीं एक विलक्षण आणि अढळ आदर जो माझ्या मनांत चिरस्थाई झाला, तो अचानक जुळून आलेल्या एका प्रसंगामुळं !

त्याचं असं झालं, माझे मित्र सबइन्स्पेक्टर नाडकर्णी मोठे रसेले आणि गुणग्राही ! त्यांच्या व्यक्तित्वावर खाँसाहेब बेहद खूष, 'माझ्याकडे येऊन गाणं ऐकून जा.' असं कित्येक वेळां खाँसाहेबांनीं त्यांना सांगितलं असेल; पण कार्यबाहुल्यामुळें त्यांना तें जमलं नव्हतं. एका संध्याकाळीं आम्ही कॉंग्रेसहाऊसकडून ऑपेराहाऊसपर्यंत बोलत निघालों होतो. हत्तीसारखे झुलत खाँसाहेब चौपाटीवरून फिरून येत होते. 'आदाबअर्ज' झाला. कुशल विचारलं गेलं.

"मग माझ्याकडे केव्हां येता गाणं ऐकायला ?" खाँसाहेब म्हणाले.

"रविवारी येऊं. माझा हा मित्र गाण्याचा शौकिन आहे. त्याला घेऊन येतो !" नाडकर्णींनीं उत्तर केलं.

"या, या अवश्य या. आणखीन कांहीं रसिकांना घेऊन या, रविवारीं मी तुमची वाट पाहीन !"

"अगदीं अस्सल असे रसिक श्रोते आणतो, असल्या दुर्लभ गाण्याला श्रोत्यांचा काय तोटा ?" असें सांगून नाडकर्णींचा निरोप घेऊन मी रसिक श्रोत्यांच्या शोधार्थ निघालों. वाटलं, नुसतं सांगायचा अवकाश, कीं श्रोते धांवून येतील !

जेवढे रसिक भेटले तेवढ्यांनाही आमंत्रण दिलं. आणखीन जिथें जातां येईल तिथें तिथें आमंत्रण देऊन आलों.

रविवार संध्याकाळ उजाडली. ४ वाजले, साडेचार वाजले, डोळ्यांत प्राण आणून मी श्रोत्यांनी माझ्या घरीं वाट पाहिली; अजून कुणाचाही पत्ता नाहीं, शेवटीं एकच एक श्रोता आला. आपलीं सर्व कामं धामं, घरची अडचण, वगैरे बाजूला ठेवून आला तो रसिक म्हणजे विन्दा करंदीकर. त्यांना घेऊन मीं धांवत खाँसाहेबांच्या निवासस्थानापाशीं आलों तिथें नाडकर्णी माझी वाट पाहात होते. पंचेचाळीस लाख वस्तीच्या एवढ्या मोठ्या मुंबईतून वेंचून मीं एकच एक श्रोता आणल्याबद्दल त्यानांही वाईट वाटलं; पण वेळ दुकवायची नव्हती. आणि शिवाय ते खाँसाहेबाशी वचनबद्ध होते. वरती खाँसाहेब आमची वाट बघत होते. आम्हीं तिघेच श्रोते, पाहून तेही थोडेसे नाराज झाले असावे; परंतू त्यानीं तसें कांहीं दर्शवलं नाहीं. आमचं स्वागत करून त्यानी एकदम 'मुनव्वरला' हांक मारली "मुनव्वर तानपुरा ला !"

कसल्या तरी विलक्षण धुंदींत असल्यासारखे खाँसाहेब अबोल झाले होते. आमच्याशी ते ज्यास्त बोललेच नाहीं. कुठंतरी शून्यांत पाहावं तशी त्यांची दृष्टि झाली होती. इतक्यांत मुनव्वर (खाँसाहेबांचा मुलगा) तंबोरा आणि स्वर मंडल घेऊन बाहेर आला. इनायतनीं तबला आणला आणि बरकत अली पेटी घेऊन बसले. सारं कांहीं पांच मिनिटांत जुळवून झालं. आम्हींहीं श्वास रोखल्यासारखे मुग्ध बसलों होतों. एवढं होतं न होतं तों खाँसाहेबांनीं 'सा' लावून सुरवातच केली. इतका मुलायम, इतका मधुर, तंबोऱ्याच्या स्वरांत बेमालूम मिसळलेला असा दमदार आणि बुलंद खर्ज मी आजवर ऐकला नव्हता. मध्यमावरून घसीट घेऊन निषादावरून खर्जावर ते पुन्हां जेव्हां स्थिर झाले तेव्हां संध्यादेवीच साकार झाल्याचा भास झाला केवळ त्या पांचच सुरांत खाँसाहेबांनी मुलतानी उभी केली होती. क्षणभर ते थांबले आणि बाजूला उभा असलेल्या नोकरास हांक मारून म्हणाले. "पंडितजीको बुलाव"

समोर बसलेले आम्ही मोजकेच श्रोते पाहून कांहीं खाँसाहेबांचं समाधान झालं नसावं ! आज ज्या अलौकिक धुंदींत ते गाणार होते, त्याला आम्हांहून कुणीतरी अधीक तज्ञाची साक्ष हवी होती. थोड्याच वेळानें ज्या पंडितांची खाँसाहेबांना जरुरी होती ते पंडित हजर झाले. ते म्हणजे बी. आर. देवधर.

आणि जणुं श्रोत्यांच्या सभेला आतां पूर्णत्व आलेलं आहे, अशा समाधानांत खाँसाहेबांनीं अत्यंत आकर्षक अशा मुलतानींतल्या ख्यालाला सुरुवात केली. मध्यमावरून उठाव असलेल्याचा अस्ताईत्या मुखडा श्रोत्यांच्या मनाची पकड घेणारा होता. बिलंपतीचा हळूहळू विस्तार करीत प्रत्येक स्वराला आंदोलन देत देत जवळ जवळ पंधरा मिनिटानी ते षड्जावर स्थिर झाले. हें सारं चालू असतांना मुलतानीच्या मध्यमाचं प्रमाण ऋषभाचे प्रमाण गांधाराचें तसेंच निषादाचें प्रमाण हीं सर्व प्रमाणें त्यांनी दाखवलीं त्याच्या मर्यादा सांगितल्या, जें सर्व आम्हांला अभ्यसनीय होतें.

(पान ४० वर)







## जुन्यांतलें सोनें

सुमारें २४ वर्षांपूर्वी 'यशवंत' मासिकांत प्रसिद्ध झालेल्या श्री. शामराव ओक यांच्या या विनोदी लेखानें महाराष्ट्रांत प्रचंड खळबळ उडविली होती. शामराव ओकांच्या मिस्कील, खेळकर, आणि क्वचित् प्रसंगी चावऱ्या अशा या विनोदाची खुमारी अजूनहि न्यारीच. क्रिकेटशोकीनांना आणि साहित्यिकांना त्या लेखांतील हा महत्त्वाचा भाग खात्रीनें हंसवील.



# चेंडूफळीचा चांचणी सामना

**शामराव ओक**

आजची चुरशीची चढाओढ
मुंबई ता. १ जुलै

आज रोजीं बरोबर बारा वाजतां आगाऊ जाहीर झाल्याप्रमाणें दादर माहीमच्या 'शिवाजी पार्क' या विस्तीर्ण मैदानावर 'सनातनी विरुद्ध नवमतवादी' हा चेंडूफळीचा चांचणी सामना मोठ्या उत्साही वातावरणांत सुरू झाला. प्रतिस्पर्धी पक्षांचे प्रतिनिधी व इतर कार्यवाह खालीं दिल्याप्रमाणें उपस्थित होते.

**सनातनी**

आहिताग्नि राजवाडे [नाखवा Skipper]
पंडित सातवळेकर
चौंडेबुवा
मुमुक्षु पांगारकर
म. भा. भू. आजगांवकर
याज्ञिक किंजवडेकर
ज. स. करंदीकर
माटे मास्तर
अश्लील मराठे
लखूअण्णा भोपटकर
भालाकार भोपटकर
राखीव : दा. न. शिखरे, वा. कृ. भावे
य. कृ. खाडीलकर, न. र. फाटक,
चि. गोपिनाथ तळवलकर इ. इ.

**नवमतवादी**

रघुनाथपंत कर्वे [ नाखवा ]
दिवेकर शास्त्री
राव सावरकर
डॉ. केतकर
भाई पी. वाय. देशपांडे
ना. जाधवराव
वि. स. खांडेकर
प्रो. फडके
प्रिं. अत्रे
अनंत काणेकर
वसंतराव मराठे
राखीव : प्रभाकर पाध्ये, मा. कृ. शिंदे, अनंतराव गद्रे, वर्तक, रा. प्र. कानिटकर
इ. इ. इ.

सनातनी विरुद्ध नवमतवादी यांच्यामधील ईर्षेचा स्फोट कोणत्या रूपानें होतो इकडे अखिल महाराष्ट्राचें सचिंत लक्ष लागलें होतें. यांची यादवी विकोपाला जाऊन हे एकमेकांचीं डोकीं फोडतात का त्याहूनहि बेहोष होऊन आपापसांत समेट करतात अशा शंकाकुशंका लोक काढीत होते.

हा संस्मरणीय ऐतिहासीक संग्राम पाहण्यास शिवाजी पार्ककडे लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. ( प्रेक्षकांसाठीं तिकिटें लावलीं नसल्यामुळें. ) महाराष्ट्रीयांचा एवढा मोठा जमाव पूर्वी कधींच एकेठिकाणीं दिसला नसेल. प्रेक्षकांत स्त्रियांचें प्रमाण बरेंच मोठें असून त्यापैकीं बऱ्याचजणी चेंडूफळीचा खेळ म्हणजे काय, सनातनी नवमतवादी हे कोण वगैरे चौकशा हळूच करीत होत्या. सनातन्यांचा मंडप आंब्याच्या डाहळ्या, केळीचे खांब व शिंदीच्या झांपा यांनी सजविलेला असून त्याच्या आंतून अनुष्ठान करीत बसल्याचे आवाज निघत होते. मंडपांतली सर्व मंडळी कडक सोवळ्यांत होती व भोंवतालीं तीर्थोदकाचा एक गटारवजा खंदक केलेला होता. नवमतवाद्यांच्या मंडपावर छप्पर नव्हतें; तो लाल, पांढऱ्या, हिरव्या वगैरे निशाणांनीं सजवलेला होता. त्याच्या बाहेर मार्क्स व फ्राइड यांच्या भयानक तसबिरी लावून ठेवलेल्या असल्यामुळें चौकस लहान मुलेंसुद्धां तिकडे फिरकत नव्हतीं. मंडपाचा एक भाग ( पोलिसाच्या भयानें ) गळ्याइतक्या उंच कमानीआड नग्नसंघाच्या सदस्यांसाठीं राखून ठेवला होता.

बरोबर अकरापन्नासला आहिताग्नि व कर्वे या नाखव्यानी ओली-सुकी केली. आहिताग्नींचा ऐटदार पोषाख गैरमाहितीमुळें थोडा








## पणती—

इवली याची मूर्ति
  इवलेसे हे ध्यान
इवलाले हात पाय
  इवलाले हावभाव ॥ १ ॥

इवलेसे हे ओठ
  इवलीसी ही बोट
इवली ही मूर्ति
  जणूं मानव्याची खाण ॥ २ ॥

इवलेसे हात पाय
  इवली त्यांची हालचाल
जगा जिंकण्याची त्यांची
  केवढी ही धडपड ॥ ३ ॥

शिवरीची ही पाऊलें
  अन् गुलाबपाकळ्यांचे ओठ
यांच्या स्पर्शापुढें बाई
  तुच्छ पारिजातकाची रास ॥४॥

यांच्या चुंबनाची गोडी
  वर्णू कोणत्या शब्दानें ?
रिते तरी करु किती
  भरले अमृताचे घडे ॥ ५ ॥

ओठींचे हें माणिक मोती
  नेत्रांचे ग हिरे ज्योति
संथ तेवूं दे एवढी
  माझ्या हृदयाची पणती ॥ ६ ॥

— प्रभा देशमुख

झुकला होता. तुमानीचीं बटनें पिछाडीला गेलीं होतीं. तें पाहून कर्वे स्मित करीत होते; आहिताग्निनीं त्यांना खोचून विचारलें, ' आम्हांला हें नवीनच आहे. पण कां हो, आपण आपल्या पुरस्कृत पोषाखांत कसे नाहीं ?'' कर्व्यांनीं गंभीरपणें उत्तर दिलें,'नग्न राहण्याचे फायदे आम्हीं वर्णन केले तरी आम्ही नग्न राहीलें पाहिजेच असें नाहीं. '

नवमतवाद्यांच्यातर्फे ' ओली ' ही बाजू सांगून ओली-सुकी कर्व्यांनीं जिंकली. पण आहिताग्नींचा सनातनी संशयीपणा जागृत झाल्यामुळें खापरीच्या दोन्ही बाजू ओल्या नाहींत ही खात्री करून घेतल्यावर, त्यांनी कर्व्यांना विचारलें, ' काय घेतां ? ' कर्व्यांनीं आधीं टोलेबाजी पत्करली.

अकरापंचावन्नला लांब झगे घालून पंच-श्री. वामन मल्हार जोशी व श्री. काकासाहेब लिमये-बाहेर पडले. पहिल्याचीं मतें कोणा-शींच पटत नसल्यामुळें व दुसऱ्याचें प्रत्येकाशीं पटत असल्यामुळें ही पंचांची जोडी आदर्श होती यांत शंका नाहीं. पंचांप्रमाणे चित्रगुप्त (स्कोअरर्स) सुद्धां निवडक होते. श्री. गं. दे. खानोलकर हे महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाचे अचूक मुद्रित-परीक्षक म्हणून त्यांची निवड या महत्वाच्या कामाला झाली होती; व त्यांच्या जोडीला ' प्राविण्य 'कार ताम्हनकर देण्यांत आले होते.

टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत सनातनी संघ कंदूक निरोधनाला (फिल्डिंगला) बाहेर पडला. तितक्यांत श्री. तात्यासाहेब केळकर घाईघाईनें आले व हें स्वागत आपलेंच म्हणून टाळ्यांचा त्यांनीं नमस्कारपूर्वक स्वीकार केला. वास्तवीक ते खेळाडू असा-यचे, पण आपण सनातनी का नवमतवादी हा विचार समतोलपणें करण्याच्या भरांत त्यांचें कोणीकडून खेळायचें हें शेवटपर्यंत ठरलें नव्हतें.

सनातनी नाखवा राजवाडे यांनीं आपला व्यूह (फील्ड) मोठ्या कौशल्यानें रचला होता. स्वतः सुरवातीचे गोलंदाज होऊन यष्टिरक्षण त्यांनी भालाकारांकडे सोपविलें होतें. भालाकारांच्या शेजारीं त्यांचे बंधू, आजगांवकर, व माटे मास्तर (अश्लील मराठ्यांच्या हाताला हात लावून) उभे होते. गोळकंडी (गली) त ज. स. करंदीकर होते, चौरस पदा-(स्क्वेअर लेग) वर पांगरकर व मध्य-पुरोभागीं (मिड-ऑनला) चौंडेबुवा उभे होते. लांबवर दोन्ही बाजूंना किंजवडेकर व सातवळेकर यांना दूर दूर ठेवण्यांत आलें होतें; कारण पंडितवर्यांची दाढी वामन शास्त्री सारखे न्याहाळीत असलेले पाहून त्यांच्यांत बरेचसें अंतर ठेवणें चांगलें हा विचार आहिताग्नि यांनीं केला होता.

नवमतवाद्यांची पहिली जोडी-कर्वे व अत्रे-हंशाच्या प्रचंड हलकल्लोळांत टोले-बाजीला निघाली. तितक्यांत बाउंडरीच्या कडेला भगतगणांत बसलेले मामा वरेरकर ओरडले, ' अरे या पुणेकरांची तंगडी मोडा आणि उडवा या नवमतवाद्यांची भंबेरी ! ' मामांनी आपला पक्ष केव्हां बदलला हें माहीत नसलेले लोक त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले ! तेव्हां मामा वळून सर्वांना उद्देशून म्हणाले, '' अरे मी सनातनीच आहे पहिल्यापासून ! संगमेश्वरी पोष्टमास्तर अस-तांना मला शृंगेरीपिठाचा शंकराचार्य व्हावयाला बोलविलें होतें पण—'' इतक्यांत कर्व्यांच्या पहिल्या हद्दपारीनें (चौंडरी) नें सगळ्यांचें लक्ष मॅचकडे गेलें. खरी गोष्ट अशी होती कीं, मामांना नवमतवाद्यांकडून चकरचिठी-सर्क्यूलर-गेली होती, पण 'चांचणी कीं चांचपणी ? '' ही कोटी लिहील्यामुळें त्यानां तावडतोब वगळण्यांत आलें होतें. ]

कर्व्यांनीं खाकी अर्ध-तुमान, कोट, फेल्ट हॅट हा आपला पोषाख कायम ठेवला होता. ते खांद्यावर फळी घेऊन उभे राहात, व चेंडू कापून त्याचें पृथक्करण करण्याच्या शास्त्रीय जिज्ञासेनें प्रेरीत झाल्यासारखा त्यांचा वार तिरकस पडत असे. राजवाड्यांच्या शेवटच्या फेंकीला एक धाव काढून ते समोरच्या टोंकाला आले.दुसरी गोलंदाजी अश्लील मराठ्यानां देण्यांत आली होती, पण त्यांच्या फेकीत हुषारीपेक्षां आवाजच जास्त असल्यामुळें कर्वे तिरस्काराने एकेका चेंडूची वासलात लावूं लागले. ते हळूहळू इतके गाफील झाले कीं, मागचे पंच श्री. वा. म. जोशी यांच्याशीं त्यानीं ' नीति ' च्या व्याख्येवर चर्चा सुरू केली.

मराठ्यांच्या सहाव्या चेंडूपुढें त्यांचा पाय आला व ' कसा ! ' या सनातनी दरडावणीला घाबरून काका लिमयांनीं एकदम वर हात फेंकला. कर्वे तंबूकडे चालले.

अनुक्रमणिका






इतक्यांत 'पायचीत !' म्हणून कोणाचा तरी चित्कार ऐकूं आला. तो ऐकून अत्र्यांनी चिडून फळी जमिनीवर आदळली व 'पाय-चीत' 'झेल' वगैरे शब्द वापरणाऱ्या माणसाला धक्के मारून हांकून दिला नाहीं तर आपण सामना उधळून लावूं, वगैरे (अनंत राव गद्रे यांच्याजवळ शिकल्याप्रमाणें) गर्जून ग्वाही दिली. हें ऐकून एक फाटक्या अंगाचा दाढी वाढलेला खादीधारी इसम जीव घेऊन पळाला. (तो एका गांवठी दैनिकाचा बातमी-दार होता हें नंतर कळून आलें.) यानंतर बराच वेळ गेला तरी नवीन फळीवाला येईना तेव्हां आहिताग्नि ओरडले.

'अहो कवें पुढला गडी येऊं द्या—'

भाई देशपांडे रागावून ओरडले.

'अहो गडी हें दास्यसूचक नांव वापरूं नका, हें समतेचें युग आहे.'

"मग म्हणायचं काय ?"

'दुसरं कांहींहि म्हणा—'

पांगारकरांनीं नाक मुरडून खांदा उडवून विचारलें,

'खेळाडू ?'

अत्र्यांनीं विकट हास्य केलें,

'ऐका ! अहो कौतुकम् ! सनातनी आणि खेळाडू !'

लखूअण्णा भोपटकर त्रासून म्हणाले,

'इतका वितंडवाद कशाला ? 'भिडू' म्हणा, वाटेल तें म्हणा, पण खेळायला येऊं द्या.'

'भिडू ?' म्हणून भिंवया उचलून अश्लील मराठ्यांनीं कायसें बोलण्यासाठीं तोंड उघडलें, पण आजगांवकरांना औचित्याची वेळींच जाणीव येऊन त्यांनीं मराठ्यांच्या तोंडावर हात ठेवला.

हा सगळा प्रकार चालला असतां, कर्व्यांनीं वसंतराव मराठ्यांना खेळायला जाण्यास सांगितलं होतें. वसंतराव खेळायला निघण्या-आधीं जाऊन अनंतराव गद्र्यांच्या कानाला लागले,

'कांहो, जाऊं का ?'

अनंतराव गर्जून खेंकसले,

'विचारतां काय ? मी सांगितलं ना एकदां ? जा, अत्रे खोळंबले आहेत—'

घाई घाईने वसंतराव फळी सरसावून क्षेत्राकडे धावले. त्यांना मधेंच आजगांवकरांनीं हटकलें,

'आँ ? वसंतराव ! तुम्ही कधीं नवमत-वादी झालात ?'

'ह्यः ह्यः ह्यः' अनंतरावांनीं सांगितलें

तिकाटीपुढें दाखल होतानां भालाकार व वसंतराव मराठे यांनीं बराचवेळ एकमेकांकडे रोखून पाहिलें. क्षणभर प्रेक्षकांत स्तब्धता उत्पन्न झाली. या मत्तमतंगजांच्या गंडस्थळांचा आघात होऊन वीज कडाडते कीं काय अशी भीति, सर्वांच्या चेहेऱ्यावर दिसूं लागली. तेवढी संधी साधून राजवाड्यांनीं चेंडू फेकला व काळ्या पडून वसंतराव तंबूकडे रवाना झाले ! चौथे खेळाडू जाड चष्म्यांतून आकाशांत कसलेसें निरीक्षण करीत येणारे वि. स. खांडेकर होते. ते पवित्रा घेतात न घेतात तों गुलाबी निशाणाखालीं बसलेले कांहीं प्रेक्षक गाऊं लागले—

'पृथ्वी चंद्र सूर्य तारे, त्यानें लोळविले सारे !'

त्या गडबडींत खांडेकरांनी रक्त सूर्यबिंबा-सारखा तो कंदूक वायुवेगानें तारांगणांशीं क्रीडा करायला जणुं काय प्रतिनिधी म्हणूनच प्रेषित केला—पण दुर्दैवानें तो नुसताच उंच उडाला; त्याचा पल्ला माटे मास्तरांच्या आवांक्याबाहेर गेला नाहीं. मास्तर मजकु-रांच्या मिशांच्या जंजाळावर तो अधर राहिला व त्यांच्या तोंडून निघणांऱ्या बऱ्याच शिवराळ शब्दांना क्षणभर तोवरा बसल्यासारखें झालें.

परंतु पंच श्री. वा. म. जोशी यांनी खांडेकरांना 'नाबाद' (नॉट औट) दिलें; केशाकर्षण म्हणजे झेलणें नव्हे असें त्यांचें मत पडलें. हा निर्णय ऐकून प्रेक्षकांत मोठी खळबळ उठली. वरेरकर ओरडले, 'अरे तो 'वाम' जोशी तो कुठला सरळ सांगायला आला आहे. त्यापेक्षां एखादा नामजोशी पत्करला !' या दरिद्री कोटीनें मळमळल्यासारखे चेहरे करून वरेरकरांचा भगतगण उठून गेला व ते स्वतः नव्या भक्तांच्या शोधार्थ मैदानाभोंवतीं हिंडूं लागले. येथपावेतों खांडेकर इतके थकले कीं त्यांनीं पळ्या (रनर) मागितला, व राज-वाड्यांच्या परवानगीनें नवमतवाद्यांच्या राखीव नगांपैकीं श्री. प्रभाकर पाध्ये दोन लाल ग्रंथ गुडघ्यावर बांधून क्षेत्रावर हजर झाले. तेवढ्यांत आपल्याला विनोदबुद्धि किती आहे हें दाखविण्यासाठीं त्यांनीं अत्र्यां-जवळ थांबून, त्यांना काल रात्रीं पाठ केलेल्या दोनतीन हास्यकथा सांगितल्या.

खांडेकरांनीं दोनतीन चेंडू नुसते आडवले, नंतर चौंडेबुवांकडे एक हलकेच ढकलेला. यावेळीं थोडा घोंटाळा झाला. धांव आहे असें समजून प्रभाकर पाध्ये धावूं लागले, आपल्याला पळ्या आहे हें विसरून खांडेकरहि धांवूं लागले. चेंडू जवळच आहे हें पाहून यष्टिरक्षक भालाकार तो उचलायला त्याच दिशेला धांवले; इतक्यांत लांब टांगा टाकीत आलेले अत्रे धांव मिळत नाहीं म्हणून परत पळाले; चेंडू उचलण्यास आलेले राजवाडे त्यांना



"हाऊज दॅट ?" — "बोल्ड !!"

बाद करण्यासाठीं त्यांच्या मागोमाग दौडूं लागले. पांच खेळाडू एकाच दिशेला धांवत अजलेले पाहून लोकांत जरा गैरसमज झाला; कित्येकांना खांडेकरांची तब्वेत एकदम बिघडल्याची भीति वाटली, तर चौंडेबुवांना हे आपल्यावरच हल्ला करून येत आहेत असा किंचित्काल भास झाला.

खांडेकर–अत्रे ही जोडी बराच वेळ टिकली. शेवटीं ज. स. करंदीकरांनी गोलंदाजी घेतली व ज्योतिष-शास्त्राच्या अचूक गोलानें खांडेकरांच्या तारका क्षणार्धांत उधळून लावल्या. ( १७–३–६ ) खांडेकर बाद झाले तरी पाध्ये तेथून हालण्याचें चिन्ह दिसेना; त्यांनीं अत्र्यांना 'पळ्या पाहिजे का ?' म्हणून विचारलें. अत्रे म्हणाले, 'मला शामाईक पळ्या नको.' तेव्हां पाध्ये नाइलाजानें परतले.

नवीन फळीधर भाई देशपांडे एका हातांत फळी व दुसऱ्या हातावर पादकवच (पॅड) बांधून फरीगदग्याच्या पवित्र्यांत उभे राहिले. त्यांनीं बरेच पट्टे फिरविले. अखेर नियमांच्या किंवा बंधनाच्या पलिकडे त्यांनी कांहींसा प्रमाद केल्यामुळें, त्यांना परत जावें लागलें. यानंतर प्रो. फडके विजारीच्या खिशांत डावा हात घालून उजव्या हातानें फळी फिरवीत फिरवीत रुबाबानें तंबूच्या बाहेर पडले. तिकाटीपाशीं जातांच जवळच्या लखुअण्णांनीं त्यांना स्वतःच्या तुमानींतलें रुपये खुळखुळवून सलामी दिली. फडके व अत्रे या जोडीनें सुमारें पन्नास धावांची भर घातल्यावर एक गुलावी निशाणवाला मध्येंच 'क्लेटन–हॅमिल्टन' म्हणून ओरडला व फडके थोडे बेसावध झाल्यामुळें त्यांनी हलगर्जीपणें मारलेला चेंडू लखू अण्णांनीं झेलला. ( १०४-५-२१ )

यानंतर लौवकरच अत्र्यांची दांडी उडाली तीहि ते बेसावध असतांनांच, कारण सहाधांवी (सिक्सर) मारण्याच्या तयारींत ते आठदहा पावलें पुढें गेले असतां, प्रेक्षकांतून अनंतराव ओरडले, 'अहो अत्रे, तसेच उभे रहा, फोटो काढताहेत तुमचा; विड्यांच्या लेबलावर तो छापून खेडोपाडीं तुमची प्रसिद्धी करण्याची व्यवस्था केली आहे मीं; तुमच्या पवित्र स्मृतींचा दिव्य संदेश पोहोंचविण्यासाठीं—

---

( पान ३२ वरून चालू )

मागोमाग पळाला. अंगाचा पसारा आवरत एका हातानं लुगड्याचा घोळ उचलत रखमा बाभळीशीं येऊन थबकली.

भिमू कुऱ्हाड नाचवत गाड्याजवळ गेला अन् एका एका गाडी खालनं चार चार माणूस बाहेर आलं. त्यांच्या प्रत्येकाच्या हातांत कुऱ्हाड नाही तर कांठी होती. क्षणभर भिमूला ओरबडल्यासारखं झालं, पांच पन्नास गड्यांचा त्याला वेढा पडला होता. तो रखा रखा बघत मागं पुढं होऊं लागला. तोंच त्याची आन् आबा चौघुल्याची नजरा नजर झाली. पटाईत वाघासारखं भिमूनं जाग्यावरनंच किरण साधलं आणि तो फरशी घेऊन आबाच्या अंगावर उडाला. पण त्याच्या एका कुऱ्हाडीला सात आठ कुऱ्हाडी भिडल्या. तरी पण त्याच्या अचाट ताकदीनं त्या सात आठ कुऱ्हाडीच्या जाळ्यांतनंहि आबाचं डोकं रक्त बंबाळ केलं. पण दुसऱ्याच क्षणीं त्याची कुऱ्हाड हिसकली गेली आणि सात आठ माणसं त्याच्या उरावर पडली. ज्याला सांपडल तिथं, सांपडेल तसा भिमूला कुबलूं लागली. तेवढ्यांत टेकडावरनं 'हाहाहा ऽऽऽ' ओरडत नांदगांवकडनं पायी आलेला माणसांचा थवा मळ्याच्या दिशेनं उतरूं लागला. गोपा जागच्या जागीं आपली लोखंडी कांब फिरवत होता रंगा भाला उगारून उगीचच अंगा भंवती नाचत होता. मंडळीच कडं आवळून गेलं तसं रंगा आणि गोपा हादरले. तिकडं भिमूचं काय झालं होतं कळायला मार्ग नव्हता.

कपाळावरच्या जखमेवर फेटा आवळत आबा चौघुले पुढं झाला अन् म्हणाला-' ए गोपा, आरं कां शिलंगणाच्या स्वारी म्होरं बोथाटी फिरवतुयास काय. पुरं कर.'

गोपानं एकाद्या आज्ञाधारक पोरासारखी आपली लोखंडी कांब थांबवली...आबा वळला आन् ओरडला...

'आरं भिम्याला कां जिवा मारला काय लेको...'

'नाहीं अजून जित्ता हाय.'

'सोडा...सोडा त्याला. अन् देना त्यो दोर घे आन् चालूं कर म्हनं तुझं काम '

तेवढ्यांत गोपाच्या हातांतली कांब हिसकली गेली. रंगाचा भाला दूर फेंकला गेला. पांच पन्नास गडी त्या दोघावर तुटून पडला. त्यांना पालथं पाडून चिखल तुडवावा तसं तुडवलं. त्यांची हाडन् हाडं मोकळी केली. पुनः आबा ओरडला, पण माणसं मागं हाटली नाहींत. तसा आबा काठी घेऊन पुढं झाला अन् चार पांच जणांच्या पेकाटांत रट्टे घालून त्यानं रंगाची आन् गोपाची सुटका केली. त्या दोघांना दोन पायावर धड उभं राहाणं सुद्धां मुष्किल झालं होतं. मग देना लव्हार दोर घेऊन जवळ आला अन् त्यानं रंगाच्या अन् गोपाच्या कंबरेला दोन दोन वेढे घेतले. चौघांनीं धरून भिमूला पुढं आणला. आबानं त्या दोराचा वेढा त्याच्याहि कंबरंभंवती घातला. दुसरी पांचसहाजणं लोखंडी नांगर घेऊन पुढं आली. आबानं भिमूला आणि त्याच्या पोरांना नांगराला जोडलं आणि गुरविणीला हांक मारली. गुरवीण पुढं झाली. तिच्या हातांत आबानं त्या दोराची दोन टोकं दिली आणि तो बाकीच्या गड्यांकडं बघून ओरडला...

'आरं बघताय काय आ वासून. नांगर काढा कीं आपापलं.'

पटापट गाड्यांतनं नांगर आणि जूं काढली गेली. गाडीची बैलं सोडून नांगराला जोडली गेली. बघतां बघतां तींस पस्तीस नांगर गुरविणीच्या मळ्यांत पडला. लोक भसाड्या आवाजांत गाऊं लागले,

'माझ्या भिम्या बैलाला वडी लागं'

'माझ्या रंग्या बैलाला वडी लागं'

'माझ्या गोप्या बैलाला वडी लाग ऽऽ हो ऽऽ—'

बाभळीच्या बुंध्याशीं रखमा उभी होती. तिच्या मागं सर्वांगाला कापरं भरलेला रामू उभा होता. रक्तबंबाळ झालेला तिचा नवरा आणि पोरं नांगर ओढत होती. माणसांचा एकच कालवा चालला होता. गुरवीण हातांत चाबूक घेऊन नांगर रेटत होती. मधनंच भिमूवर चाबकाचा फटका ओढत होती. रखमा तें सारं स्थिर डोळ्यांनं पाहात होती. तिच्या डोळ्यांत पाण्याचा टिपूस नव्हता कां मनांत कालवाकालव नव्हती.

• •

अनुक्रमणिका






( इतक्यांत आपण अच्यूतरावांबद्दल बोलत नाहीं ही त्यानां आठवण झाली. ) हा बिडी-वाला आला आहे कॅमेरा घेऊन- ' तितक्यांत दुसऱ्या बाजूनें वरेरकर ओरडले, ' कोण हा कृतघ्न चांडाळ बिडीवाला ? खास पुणेकर आहे हा ! जन्मभर पांच बोटांच्या फुंकणींतून तळहाताच्या फोडासारखी फुंकर घालून मीं नुसती बिडी ओढली, पण या नीचानं लेखावरसुद्धां अनुल्लेखानं मला मारलं ! ' अत्र्यांचें लक्ष इकडें असतां सीमोल्लंघनाबद्दल भालाकारानीं त्यांच्या खिश्या उडवल्या [ स्टंप्ड. ] या सर्व प्रकारानें संतापलेले अत्रे बॅट उगारून सनातनी टाळ्यांच्या गजरांत झुणका भाकर संघाच्या अंगावर धांवले; तेव्हां अनंतरावानीं गर्जून त्यांची माफी मागीतली.

फडक्यांच्या जागीं काणेकर व अत्र्यांच्या जागीं डॉ. केतकर आले. प्रेमांत पडण्याच्या बाबतींतदेखील मोजून व मापून वागावें असा पुरस्कार करणारे काणेकर खेळांतहि तितकाच हिशोबीपणा दाखवतील अशी सर्वांची अपेक्षा होतीच; त्याप्रमाणें एकेक धांव झाल्यावर चित्रगुप्ताच्या तंबूकडे वळून ओरडून ' एक ' ' दोन ' अशी पुकार त्यांनीं सुरू केली; त्यांच्यावतीनें प्रभाकर पाध्ये यांनीं हिशेबतपासनिसाचेंहि काम चालविलें; पण प्रेम किंवा खेळ सर्वस्वीं विज्ञानशास्त्राच्या नियमाप्रमाणेंच होत नसल्या-मुळें तिसऱ्या चेंडूलाच कांहीं चमत्कारीक वळण घेऊन काणेकरांचा त्रिफळा उडाला व ते पहातच राहीले. ( यावेळीं ' त्रिफळा ! ' म्हणून विजयोन्मादानें भालाकार ओरडले, व ' अश्लील ! ' म्हणून कृष्णराव मराठ्यांनी तुरट तोंडानें शेरा मारला. ) आतां डॉ. केतकरांच्या जोडीला ना. जाधवराव आले. त्या जोडीनें नुसत्या गगनचुंबी टोलेबाजीला सुरवात केली, एकदां ' राम अनार्य होता ! ' असें कांहीं पुकारून जाधवरावांनी एक तडाखा द्यावा, तर थोड्या वेळानें ' महाराष्ट्र ' म्हणजे ' महारांचा देश ! ' म्हणून केतक-रांनी दणका लगवावा. या जोडीनें आंकडा बराच फुगविला असता, पण मधेंच एक टोला मारल्यावर डॉ. केतकरांनीं आपल्या खिशांतले चणे काढून भालाकारांसह ते खाण्यास सुरवात केली; धांव घेण्यास आलेले जाधवराव अर्ध्या वाटेंतच थबकले, तिकडे गोलंदाजानें त्यांची दांडी उडविली, तें पाहून फळी काखेंत मारून डाक्टर मजकूर तिकडे धांवले, तेव्हां चेंडू भालाकारांकडे फेंकण्यांत आला व ( खाल्लेल्या चण्यांना न जागतां ) त्यांनीं आपल्याहि बाजूच्या तिकाट्या उधळून दिल्या. निःपक्षपाती वामनराव जोशी व काका लिमये यांनीं अर्थातच दोघांही गड्यांना बाद ठरविलें. जाधवराव चिडले; ' अखेर तुम्ही भटजीच ! ' ते केतकरांना म्हणाले. केतकरांनीं त्या विधानावर थोडा विचार करून कांहीं शास्त्रीय उत्तर दिलें, व ब्राह्मण जातीच्या आनुवंशिक ऱ्हासावर मानवशास्त्रदृष्ट्या चर्चा करीत जोडी तंबूकडे परतली.

शेवटची जोडी राव सावरकर व महादेव-शास्त्री दिवेकर सावकाश बाहेर पडली. खास याच जोडीला उत्तेजन देण्यास आलेला एक किडकिडीत चष्मेवाला कंपू ' हिम्मत ! तडफ उत्कर्ष !' अशा क्षीण आरोळ्या देऊं लागला. उलट त्यांना चिडविण्यासाठींच कांहीं सना-तनीच अल्लाहु अकबर म्हणून ओरडूं लागले. पण हे दोघेहिं फळीधर खंबीर होते. लेख-णींच्या फटकाऱ्याइतकेंच जालीम त्यांच्या फळ्यांचे फटके बसूं लागले. ह. भ. प. पांगारकर, म. भा. भू. आजगांवकर, वे. शा. सं. किंजवडेकर या सर्वांची गोलंदाजी त्यांनीं वगदिशा उधळून दिली. अखेर भालाकारांनीं यष्टिरक्षण सोडून चेंडू हातीं घेतला, व ' बुंदी मोतीचूर ! राघवदास ! ' अशा डुरकण्या फोडीत एकेक गोळा टाकण्यास सुरवात केली. मधून मधून ते स्वतः तयार केलेले शब्दही सोडूं लागले. त्याचवेळीं पांगारकर बुवांनीं आपलें इंग्रजीचें ज्ञान प्रकट करण्याची हुक्की आली. अश्लील मराठी ऋतुसंहारांतले श्लोक म्हणूं लागले, व माटे मास्तरांनी चारसहा फारशी शब्दांची कारिका उच्चारली. पण या-सगळ्या सरबत्तीनें गारद न होतां धीमेपणानें सावरकर--दिवेकरांनीं आंकडा पावणेदोनशें-वर नेला व अखेर ' इत्यलम् ' म्हणूनि निवृत्त होऊन ते तंबूंत परत गेले ( १७८-१०-५४ ) त्यांना खांद्यावर बसवून नेण्यासाठीं बोडक्या, चष्मेवाल्या, पैजामेधारी, खप्पड, काडीजवान नवमतवाद्यांची एक टोळी आली होती, पण वेळींच आपली कुवत ओळखून नुसत्या टाळ्या व जयजयकार इतक्यावरच या मंडळींनीं आपली उत्साहाची तलफ भागवली. यवेळेलाच उभय पक्षांनीं आपापल्या शिबीरांत उपाहार उरकून घेतला. खेळाडूंच्या सुमारें दसपट लोक त्यांचे अनुयायी म्हणून या समारंभास हजर राहीले हें सांगणें नकोच.

उपहार संपल्यावर अनंतराव गद्रे भाषण

करायला उठणार अशीं चिन्हें पाहून र. धों. कर्व्यांनीं आपले वीर तंबूबाहेर काढले. अंगाभर्स आपले पांढरे झगे घालून (व दोन्ही मांडवांतला समाचार घेतल्यामुळें जरा कष्टानें चालत) विकेटकडे चालले. सनातन्यांची पहिली जोडी बाहेर पडायला मात्र बराच वेळ लागला. कारण संवय नसलेल्या पाटलोणीच्या आतां गुंड्या लागत नसल्यामुळें बहुतेकांनीं पाटलोणींवर कमरेभोंवतीं काचा मारून उपरणींच बांधलीं होतीं. टॉस जिंकून आधीं बॅटिंग घेण्यांत, व आपली इनिंग्ज झाल्यानंतर उपहार ठेवण्यांत नवमतवादी कप्तान कर्वे यांनीं फारच दूरदर्शीपणा दाखविला होता. सनातनी कप्तान राजवाड्यांनीं शत्रूचा हा डाव फार उशीरा म्हणजे जेवणें झाल्यावर ओळखला. तरी पण त्यांतल्या त्यांत सडपातळ म्हणून ज. स. करंदीकर व आजगांवकर ही जोडी सनातनी इनिंग्ज सुरू करण्यास त्यांनीं पाठविली.

हे खेळाडू कल्पनेबाहेर चिकट (स्टेडी) निघाले. एक तास खेळून त्यांनी फळ्यावरचा आंकडा शून्याच्यावर चढविला नाहीं. पण इतक्या अवकाशांत बोलर या दृष्टीनें त्यांनी खांडेकर, सावरकर, केतकर व वसंतराव मराठे यांना मात्र निकामी करून टाकलें. अखेर कर्व्यांनीं समाजस्वास्थ्याच्या खाजगी पत्रव्यवहाराच्या एका पानांत गुंडाळून एक चेंडू इतका 'गरम' फेकला कीं, आजगांवकर तर सफा झालेच, पण करंदीकर देखील स्वेच्छेनें व राजीखुषीनें रिटायर होऊन तंबूकडे परत गेले. (०-२-०) आणीबाणीचा प्रसंग ओळखून माटे व कृष्णराव मराठे ही दुसरी जोडी पाठविण्यांत आली. यांनी मात्र पिचवर पाय टाकतांच बौंड्र्या मारण्यास सुरवात केली. माटे मास्तरांनीं आपले वसंत व्याख्यान मालेच्या सनातनी सभेंत गिरवलेले टोले काढले; तर अश्लील मराठ्यांनीं गीतगोविंद, शृंगारशतक, अनंगरंग वगैरेतील उत्तान प्रहार वापरले. अत्रे व दिवेकरशास्त्री यांचें आडदांड बोलिंगसुद्धां त्यांनी पार धुळीला मिळविलें. लौकरच शंभराचा आंकडा बोर्डावर झळकला. पुन्हां रघुनाथपंत कर्व्यांनी बोलिंग घेतलें व आपल्या फ्रेंच भाषेच्या ज्ञानाच्या भांडारांतून अशीं कांहीं एक भयंकर फेंक काढली, कीं माटे मास्तरांची बॅट लुली पडून त्यांनीं आपला कॅच जाधवरावांच्या हातांत अलगद ठेवला. कृष्णराव मराठे किंचाळले, 'अश्लील ! बॉडीलैन !'

तथापी मास्तरसाहेबांनीं तंबूचा रस्ता आधींच मुकाट्यानें सुधारला होता. या वेळीं स्कोअर (१०२-३-४९) असा होता. पुढचे खेळाडू पंडीत सातवळेकर, वैदिक मंत्र पुटपुटत क्रीजमध्यें दाखल झाले. त्या प्रसंगीं जाधवरावांना मुद्दाम बोलिंग देण्यांत आलें. त्यांनीं ताबडतोब पंडितजींचा बळी घेतला. नंतर आले त्या कप्तान राजवाड्यांच्या वेदोक्त बॅटींगची फळीही जाधवरावानीं आपल्या पाखंडी बोलिंगनें फोडली. पुन्हां वेळ विकट आहे हें ओळखून पांगारकर इंग्लीश बोलत आवेशानें पीचवर आले. त्यांनीं बोलरला चकविण्याची सोपी युक्ति काढली. बोलरनें स्टार्ट घेतला कीं, मुमुक्षुवर्य खांदा उडवून नाक मुरडीत; त्यामुळें बोलरची एकाग्रता न होतां त्याचा चेंडू निरुपद्रवि होई व पांगारकर एखाद्या सनातनी कोटीसह तो स्त्रियांच्या तंबूकडे मारीत. यावेळीं काणेकरांच्या बोलिंगची जरुरी कर्व्यांनां वाटली. काणेकरांची स्टाइल त्याच्या लघुनिबंधांइतकीच आळसट असल्यामुळें पांगारकर गडबडले. काणेकर पडल्या पडल्या, पलीकडच्या विकेटपर्यंत पोहोंचले कीं नाहीं ही पर्वा न करतां चेंडू फेंकून

---

(पान ३४ वरून चालू)

विलंपती नंतर आरोह अवरोहाच्या ताना, तीन तीन सुरांच्या अंतरानें घेतलेल्या हरकतीयुक्त ताना, मिरखंडी ताना, पल्टे आदि सर्व प्रकार दाखवून त्याच ख्यालाच्या द्रुत लयींतल्या चीजेला त्यांनी सुरुवात केली.

"सांज झाली होती, अजून प्रियकर घरीं आला नव्हता, वाट पाहून पाहून डोळे भरून येत होते. 'मन चिंती ते वैरी न चिंती' म्हणतात तसे भेडसावणारे निरनिराळे विचार मनांत येऊन बेचैनी वाढलेली आहे. अंतःकरणांतले विचार लज्जेमुळें कुणाशीं व्यक्त करतां येत नाहीं. दिशांना विचारून झालं, पशु-पक्षांना विचारून झालं, मावळत्या दिवसालाही विचारून झालं; पण कुणीही सांगत नाहीं. म्हणून हे निशे, प्रियाला नीट वाट दाखव, हे मेघानों तुम्हीं अकालीं वर्षूं नका; परंतु तुमच्या घर्षणांतून उत्पन्न झालेल्या विजेच्या प्रकाशानें माझ्या प्रियाला वाट दाखवा !"

प्रत्येक कडवें अत्यंत रेखीव, शब्दांची झिलई विलक्षण मोहिनी घालणारी, जणूं तो प्रसंगच आमच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष उभा होता. तब्बल एक तासपर्यंत आम्हीं नुसते तरंगत होतो. एकही सूर असा नाहीं कीं तो अधिक होता, एकही तान अशी नव्हती कीं तिची आवश्यकता न वाटावी. ती साधना पाहून डोळे भरून आले आणि वाटलं गातां यावं तर असं, इतकं; परंतु पूर्व पुण्याई शिवाय ती गोष्ट अशक्य आहे.

एक तासा नंतर खाँ साहेबानीं मुलतानी संपवली. तेव्हां टाळ्या देखील वाजवायचं भान राहिलं नाहीं. इतकी धुंदी त्या गाण्यानें निर्माण केली होती. मीं करंदीकरांकडे पाहिलं ते तर तूर्यावस्तेंत असल्या सारखे वाटले.

देवधरानीं केलेल्या आग्रहावरून खाँसाहेबांनीं "कानीं कुंडला" ही नायकी कानड्यांतील चीज म्हटली.

नायकी कानडा इतका आकर्षक आणि मुलायम पद्धतिनें गातां येतो हें त्या दिवशी मला पहिल्यानेंच कळलें, यापूर्वी नायकी कानडा म्हणजे सुराशीं भांडायचा राग असावा अशी कित्येकवेळां तो ऐकून माझी कल्पना झाली होती. नेहमीच्या लोकप्रिय झालेल्या ठुंबऱ्या सोडून आज एक विशेष लालित्याची ठुंबरी खाँ साहेब गायले.

"बहोत दिन हुवे संय्या नहीं आये, संय्या नहीं आये मोरा जिया घबराये"

हाय, हाय ! त्या पंजाबी ढंगाच्या ठुंबरीनें काळजें घायाळ झालीं.

अडीच तासानंतर खाँ साहेबांची धुंदी उतरली होती त्यांनी स्वर मंडळ खालीं ठेवलं आणि आम्हां श्रोत्याना नमस्कार केला.

अडीच तासापूर्वी कुठेंतरी शून्यांत पाहाणारे खाँ साहेब आतां मन मोकळे बोलूं लागले होते; परंतू स्वर साम्राज्यांच्या एका अति-विषाल वलयांत आम्ही विलीन झालों होतों.

त्या क्षणाची ती वलयांकित धुंदी अजूनहीं उतरलेली नाहीं. या नंतर खाँ साहेबांची अनेक गाणी मी ऐकली परंतू ते धूंद क्षण...!

• • •

अनुक्रमणिका

खांडेकरांशीं गप्पा मारूं लागायचे, पांगारकर मोठ्या आवेशानें तो चेंडू मारायला जायचे, पण बॅट आधींच निघून गेल्यामुळें टोला फुकट जायचा. मधेंच गर्दीतून कोणी ओरडला, ' अहो, मुद्याला धरून खेळा— बॅट व बॉल यांची भेट होऊं द्या ! ' तेव्हां पांगारकर तिकडे वळून म्हणाले, ' त्याची नको तुम्हांला काळजी—मी कांहीं असा तसा नाहीं—आय् ॲम नॉट ए धिस दॅट बॅटर ! ' एवढ्यांत काणेकरांचा एक चेंडू चुकून सरळ पडला, व दांडीच्या आधारास मुकलेले पांगारकर आपण नाशकाला नसल्याची खेदजनक जाणीव ठेवून घट्ट मिटलेल्या तोंडानें तंबूंत परतले.

यानंतर बराच वेळ गेला. सनातनी तंबूंत कांहीं गडबड झाली व अखेर एका गाईला पुढें करून चौंडेबुवा ' पिचवर ' आले. गाय घेऊन येण्याविरुद्ध नियम कोठेंहि न सांपडल्यामुळें अंपायर्सचा नाइलाज झाला. चौंडेबुवांचा मार्ग अगदीं सोपा होता. त्यांनी गाईला आपल्या विकेटपुढें उभी केली व नवमतवादाचे सनातनी पक्षावरील सर्व हल्ले परतविण्यास तिचा त्यांनी ढालीसारखा उपयोग केला. बाजूनें येणारे चेंडू तेवढे ते मारीत असत. पळण्याच्या वेळीं थोडा त्रास होई तेवढाच. गाय पाळीव असल्यामुळें पिचवरची हरळी ती समाधानी मुद्रेनें खात होती. मधेंच कर्व्यांनी गाईला दोनदां रन-आउट करून अपील केलें, पण अंपायर्सनी तें मान्य केलें नाहीं.

होतां होतां स्कोअर दीडशेंच्या जवळ जवळ गेला. एकदां गाईनें चेंडूच खाल्ल्यामुळें पळून दम लागेपर्यंत चौंडेबुवा-मराठ्यानी नऊ धांवा काढल्या व ' लास्ट बॉल ' म्हणून सहा रन्स सनातन्यांकडे जमा झाल्या त्या वेगळ्याच. दुखांत सुख म्हणजे नव्या चेंडूनें अश्लील मराठ्यांचा कॅच उडून तो देशपांड्यांनीं झेलला; व भालाकार भोपटकर हे मराठ्यांच्या जागीं आले. पण चौंडेबुवांना कळून चुकलें होतें कीं, जय आपल्या हातांत आहे. त्यांनीं परत सहाव्या बॉलला रन काढण्यास सुरवात केली. स्कोअर एकशेंपासष्ट झाला. नवमतवाद्यांची हार होणारसें दिसूं लागलें. गाईची विकेट पडण्यावर सगळ्या वादाची मदार होती.

अशांत अत्र्यांना एक कल्पना सुचली. त्यांनीं कप्तानांना विनंति केली कीं, वसंतराव मराठ्यांना बोलिंग द्यावें. वसंतरावांनीं बोलिंग घेतल्यावर गाईचें लक्ष सहज समोर गेलें. समोरच्या विकेटजवळ ' रनर ' भालाकार व व वसंतराव यांना शेजारीं शेजारीं पाहून ती जरा चुळबुळ करूं लागली, इतक्यांत प्रेक्षकांतून वरेरकरांचा आवाज आला ' अरे सनातनी गाईचे पुत्र असले तर नवमतवादी गाईचे बाप आहेत बाप ! ' गाईनें कान टवकारले. त्याचवेळीं कर्मधर्मसंयोगानें, सनातन्यांच्या उत्तेजनार्थ आलेल्या गोरक्षण मेळ्यांतून पेटी खुळखुळावून एक आवाज आला—

'नंदसुतानें वासुदेवानें गोपींकें रमणेऽऽऽ..'

हें मात्र त्या गाईला असह्य झालें. एकाएकीं शेंपूट उभारून ती चौखूर उधळली व तिनें सरळ वांद्र्याचा रस्ता धरला. (ती अजून बेपत्ताच आहे, पण एका स्थानिक अविंध पुढाऱ्याचे चेहऱ्यावर मात्र हुबेहूब तिचीच भावमुद्रा–Expression तेव्हांपासून दिसत आहे).

झालें क्षणार्धांत चौंडेबुवा ' आउट ' झाले व त्यांच्या जागीं किजवडेकर शास्त्री आले. ते खूप अवसान आणून आले होते. पण आयत्या वेळीं प्रेक्षकांपैकीं झुणका–भाकर संघाच्या सदस्यांतून ' बॅऽऽऽऽ ' असे आवाज सारखे निघायला लागल्यामुळें शास्त्रीबुवांचें चित्त द्विधा होऊन त्यांनीं काकबळी दिल्यासारखा सोपा कॅच काणेकरांच्या हातांत दिला. (व आश्चर्याची गोष्ट कीं काणेकरांनीं तो झेलण्याइतका उत्साह दाखविला.)

भालाकारांच्या जोडीला आतां त्यांचे बंधू आले. त्यांनी भेदनीतिला सुरवात केली. कर्व्यांना ते म्हणाले, ' अहो, पक्ष कसले घेतां ? तुम्ही सगळे माझेच पक्षकार व्हा, तुमचे काणेकर जितके नवमतवादी तितकाच मी सनातनी ! ' पण हें बोलत बोलत देखील त्यांनीं तीनचार रन्स काढल्याच !

आतां फक्त आठ रन्स जिंकायला हव्या होत्या. एक ' स्निक ' लावून भालाकारांनीं धांपा टाकीत टाकीत एक रन घेतली. भावाच्या जवळून जातांना ते म्हणाले, आण्णा आटप लवकर, मला भूक लागली आहे—

या उत्तेजनानें लवूअण्णांनीं जवाहिरलाल नेहरूंशी स्वतःची तुलना करण्यांत एक ओव्हर बौंडरी मारली.

दोन्ही पक्षांचा स्कोअर आतां सारखा झाला होता. जिंकायला आतां एकच रन पाहिजे होती. लवूअण्णांनीं महाराष्ट्र मंडळाचें नांव घेऊन एक गरगरीत बॅट फिरविली व तो चेंडू इतका उंच गेला कीं अत्र्यांनीं तो झेलीपर्यंत एक रन पुरी होऊन बंधुद्वय दुसरी काढूं लागले होते...दोन्ही दक्षांची बरोबरी झाली. ' जितंमया ' म्हणून उभय पक्षीय घरोघर गेले.


मिस्टर चंडू गडगडे वॉझ ' अन् प्लेएबल ' आफ्टर लंच !

अंपायर्स श्री. वामन मल्हार जोशी व श्री. काकासाहेब लिमये हे दोघे मात्र त्या मैदानावर ' दोहोंपैकीं पहिली पुरी रन मोजून सनातन्यांची सरशी सिद्ध होते कीं नाहीं ' हा निर्णय लावण्यासाठीं अद्यापी उभे राहून चर्चा करीत आहेत. त्या वाटेनें मध्यरात्रीं जाणाऱ्या वाटसरूला केव्हांही त्यांचे आवाज ऐकूं येतील.

● ● ●

अनुक्रमणिका



# दिवाळीचा हंगाम आणि साहित्याचें पीकपाणी

पि ना कि

महाराष्ट्रांतील ज्या मासिकांनीं आणि इतर नियतकालिकांनीं आपले दिवाळी अंक दीपावलीकडे भेटीसाठीं पाठविले, त्या सर्वांचे आम्ही आभारी आहोंत. या सर्व अंकांचे आणि ज्यांनीं अंक पाठविले नाहीं अशा अंकांचेहि विस्तृत परीक्षण आमचे मित्र **श्री. पिनाकि** यांनीं दीपावलीसाठीं केलें आहे. यांतील सर्वच मतांशीं आम्ही सहमत नसलों तरी वाचकांना आणि लेखकांना हें परीक्षण उद्बोधक वाटेल अशी आशा आहे.

गेल्या कांहीं वर्षांत मराठी माणसाच्या सांस्कृतिक जीवनांत दिवाळी अंक ही एक अपरिहार्य बाब बनली आहे. दिवाळीसणाच्या धूमधडाक्यांत एखादा रंगीबेरंगी दिवाळी अंक खरेदी करणं प्रतिष्ठितपणाचं मानलं जाऊं लागलं आहे. शिवाय गल्लोगल्ली निघालेली फुटकळ वाचनालयें आणि सरकारी व इतर कर्मचाऱ्यांनीं आपापल्या सेक्शनपुरतीं उघडलेलीं मासिक वाचनालयें यामुळें सांप्रत मासिकवाल्यांना बरे दिवस आले आहेत.

याचा दृश्य परिणाम म्हणजे दिवाळी अंकांची चलती. यांत दैनिकें, साप्ताहिकें आणि मासिकें यांच्या जोडीला वार्षिकें आलीं. यंदा कमींत कमी दोनशें तरीं दिवाळी अंक प्रसिद्ध झाले असावेत. अर्थात् यांत वाचनीय आणि संग्राह्य असे फारच थोडे आहेत. गेल्या कांहीं वर्षांत दिवाळी अंकांचे बाह्यांग सुधारलें पण अंतरंग बिघडले हा आरोप कांहीं अंशीं खरा आहे. तरीपण यंदाच्या एकूण सर्व अंकांत मौज, मनोहर, हंस, गांवकरी आणि अर्थातच दीपावली हेच काय ते ठसठशीत आणि रेखीव दिवाळी अंक. त्यानंतर सत्यकथा, किर्लोस्कर, केसरी, रविवार सकाळ, वसुधा, तरुण भारत, साधना या अंकांची वर्णी लावतां येईल. रत्नदीप, वाङ्मयशोभा, मोहिनी, वीणा, अनुराधा, वसंत, सुदर्शन, अंजलि, आवाज, यांची गणना मागील अंकावरून पुढें चालू अशाच अंकांत करावी लागेल. आणि फालतू मंडळींत आनंदवन, नवल, संजय, अमृत, दीपलक्ष्मी, अलका, इत्यादि मासिकांची नोंद. शिवाय विविधवृत्त, महाराष्ट्र, रोहिणी, इ. खुर्दा विपुल आहेच.

सजावटीच्या दृष्टीने नीटनेटकेपणांत दीपावली, मौज, गांवकरी, हंस, आणि केसरी, यांचा निर्देश केला पाहिजे. किर्लोस्कर, मनोहर सारखीं श्रीमान मासिके सजावटीबाबत निष्काळजी कां रहातात हें एक कोडंच आहे. मौजेची परीटघडी छपाई आणि रेखीव सजावट दरवर्षी प्रमाणें. चित्रांची लयलूट अनेकांनीं केली आहे पण त्यांत कलेचा अंश फारच कमी आहे. दीपावलींतील कला दृष्ट्या सरस असलेली दोन चित्रें नेमकीं वाईट छपाईनें बिघडली आहेत.

मजकुरांच्या दृष्टीनें यंदा दीपावलींत स. आ. जोगळेकर आणि पु. भा. भावे यांनीं 'दिवे कां लावले' नाहींत हें कळत नाहीं. त्याचप्रमाणें मौजकारांचे 'प्राणप्रिय' गंगाधर गाडगीळ यंदा मौज सत्यकथेंत नसावे याचें आश्चर्य वाटतें. हंसचा अंकहि नीटनेटका आहे. मौजेचा अंक चांगला आहे. मिरची कितीहि नासली तरी मटारच्या शेंगेपेक्षां तिखटच असायची (पण मिरची नासलीय हें निर्विवाद). सत्यकथेनें नेहमींप्रमाणें 'दर्जेदार' पण निर्जीव साहित्य पुरविले आहे. मनोहर मासिकानें यंदा मनापासून अंक काढला पण लेखकांनी दगा दिला. त्यांतील लेखकांचे फोटो आणि विचार जुनेच आहेत. वीणा मासिकानें यंदा 'उदरविदारक' अंक काढला (हें काय प्रकरण आहे?) पण नेहमींच्या अंकाहून या उदरविदारकाचें स्वरूप वेगळें नाहीं. मोहिनी आणि आवाज हे दरवर्षीचे विनोदी वाङ्मयाचे ठेकेदार. पण दोघांनीहि साफ निराशा केली आहे. वाङ्मयशोभेनें शेजारधर्माला अनुसरून मोहिनीची नक्कल करण्याचा प्रयत्न चालविला आहे. पण तो फारसा जमत नाहीं. केसरीचा अंक या वर्षी कमालीचा निराशाजनक निघाला आहे हें नमूद केलें पाहिजे. त्या मानानें गांवकरीनें केसरीवर ताण करून छान अंक सादर केला आहे. अनुराधा, ललना, स्त्री या मासिकांना लोकप्रियता मिळत असली तरी अजून त्यांना इंग्रजींतील 'वूमेन ॲण्ड होम' सारख्या मासिकाचा दर्जा लाभत नाहीं.











अनुक्रमणिका

### लेखकांचा तुटवडा

यंदाचे दिवाळी अंक बारकाईनें चाळल्यास एक गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते, आणि ती म्हणजे मराठींत खरोखरच चांगल्या लेखकांचा तुटवडा आहे. लेखक म्हणजे लेख लिहिणारे. पोस्टाच्या नियमामुळें संपादकांना नाईलाजानें लेख शोधावे लागतात आणि असे लेख लिहिणारे लेखक फार थोडे. एकेकाळीं वाङ्मयीन टिपणीवजा लेख लिहिणाऱ्या प्राध्यापकांना मासिकवाल्या मंडळींत फार भाव होता. अलीकडे या मंडळींचीं पाळें मासिकांतून पार उठली असून भलतेच लोक त्यांच्या सत्तेच्या प्रांगणांत गर्दी करूं लागले आहेत. लेखांच्या या अडचणींमुळें संपादकांनी परिसंवादाची टूम काढली. यंदा असे परिसंवाद संयुक्त महाराष्ट्राभोंवतीं घुटमळत आहेत. साधना, किर्लोस्कर, मौज यांचे परिसंवादाचे विषय फार गंभीर आहेत. मौजेच्या परिसंवादाची कल्पना या पूर्वीच उगाळली गेलीय आणि त्यांतील लेखकांनीं याच विषयावर इतक्या असंख्य वेळां लिहिले आहे, आणि वक्तव्यें केलीं आहेत कीं त्यामुळें त्यांतील नावीन्य लोपलें आहे. शिवाय मतभेदाचा एखाददुसरा मुद्दा सोडल्यास सर्वांचें अनेक बाबतींत एकमत झालें आहे आणि महत्त्वाच्या प्रश्नांबाबत पुढारी मंडळींनीं फारसा विचार न करतां मतप्रदर्शन केल्यामुळें त्याला उथळपणा आला आहे. किर्लोस्करनें त्रुटित परिसंवाद सादर करून परिसंवादाची एक प्रकारे थट्टाच केली आहे. आणि साधनेचा परिसंवाद मौजेच्याच वळणावर गेला आहे. ललित परिसंवादांत दीपावलीच्या माफ करा हं ! कांहीं तरी गैरसमज होतोय या परिसंवादाची कल्पना फार चांगली आहे. पण त्या कल्पनेला बालगंधर्व, मोतीराम टोपीवाले आणि बाबुराव पटेल याखेरीज कुणी प्रामाणिक साथ दिली नाहीं. 'गांवकरी' नें यंदा दीपावलीच्या 'रसिकहो चतुर किती बायका' या लेखमालेवरून सुचलेला एक परिसंवाद सादर केला. या लेखमालेंतील एक दोन लेख सोडल्यास बाकी लेखांत लालित्य असें फारसें नव्हतें. 'सत्यकथे'तील काव्यविषयक परिसंवाद मर्यादित क्षेत्रांतील वाचकांना रुचेल असा होता. त्यामानानें लोकसत्तेतील रंगभूमिविषयक परिसंवाद विशेष दर्जेदार नव्हता.

वाङ्मयीन लेखांत यंदा फारसें स्पृहणीय लेखन कोणी केलेलें दिसत नाहीं. हंसमधील इंद्रायणी सावकार यांचा रहस्यकथेवरील लेख म्हणजे अनेक छोट्या छोट्या रहस्यकथांची गोळाबेरीज. बाळ सामंत यांचा कामकथांची कैफियत (दीपावली) हा लेखाचा विषय नवीन असला तरी त्या लेखाचें स्वरूप बरेचसें माहितीवजा झालें आहे. त्या मानानें यंदा डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांची कामगिरी लक्षांत राहाण्यासारखी आहे. निबंधरचना आणि राष्ट्र रचना (हंस), वैयक्तिक पुण्य आणि सामाजिक पुण्य (वसंत) हे दोन्ही लेख नवे विचार, आणि प्रभावी प्रतिपादन शैली यासाठीं उल्लेखनीय आहेत. मात्र विवेचनाच्या भरांत डॉ. सहस्रबुद्धे अतिरेकी एकांगी बनतात कीं काय याची शंका येते. सामाजिक पुण्याचे पाश्चात्य दाखले देतांना महात्मा फुले, कर्मवीर शिंदे, भाऊराव पाटील, महर्षि कर्वे, आचार्य भिसे हे देशांतर्गत सामाजिक पुण्याचे दाखले कसे विसरले याचें आश्चर्य वाटतें. पंचवार्षिक योजनेबाबतचा देवदत्त दाभोळकरांचा केसरींतील लेख असाच एकांगी आहे. योजनेबाबत जनतेला उत्साही करण्यांत सरकारला अपयश आलें असें गृहीत धरूनच त्यांनीं पुढील मिमांसा केली आहे. या मानानें गोवर्धन पारीख यांचा विरोध विरोधक, आणि विरोधी पक्ष (लोकसत्ता) हा विवेचनात्मक लेखाचा एक उत्कृष्ट नमूना. प्रा. पारीख फारच कमी लिहितात याचें यामुळें दुःख वाटतें.

याशिवाय प्रा. श्री. के. क्षीरसागर, सेतुमाधवराव पगडी यांचे ठरीव विषयावरचे ठराविक मतें मांडणारे लेख प्रसिद्ध झाले आहेत. अंजलि मध्यें प्रा. फडक्यांनीं चित्रकार दलालांच्या जुन्या चित्रांवर भाष्य केलं आहे. तीं चित्रें आणि भाष्य दोन्हींहि उल्लेखनीय नव्हती. चित्रकार दलालांच्या कलेच्या वेगवेगळ्या छटा दाखविणारीं कांहीं अस्सल चित्रें निवडून त्यावर भाष्य करणें आवश्यक होतें. पण एखाद्या नाटकाचे किंवा पुस्तकाचे परीक्षण करावें अशा थाटांत फडके चित्रें समजावून देतात तेव्हां मोठी मौज वाटते. एकूण चित्रकलेंतील मर्मज्ञ माणसें महाराष्ट्रांत कमीच हें खरें ! मौजेनेहि जुनी चित्रें मिळवून छापली आहेत, त्याबाबत असा उपक्रम करावयास हवा होता.

काव्यात्म आणि ललितपूर्ण लेखांचा यंदा फारच अभाव आहे. या संदर्भात माधव आचवल यांचें लेखन ठळक आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे. दुर्गा भागवतांचा नर्मदेवरील लालित्यपूर्ण लेख बराच काळ आठवणींत राहील. याच संदर्भात स. आ. जोगळेकर लिखित सिंधु (वसुधा) हा लेख व्यासंगाच्या दृष्टीनें मराठी विद्वानांनीं समोर आदर्श म्हणून ठेवण्यासारखा आहे. यंदाच्या सर्व दिवाळी अंकांतील हा एकमेव व्यासंगपूर्ण लेख. मराठी बावनकशी विद्वत्ता कशी दुर्मिळ होऊं लागली आहे याचें हें उत्तम उदाहरण. संतवाङ्मयावर ललितपूर्ण लिहिण्याचा मक्ता स. कृ. जोशी यांनी आतां घेतला असून या लेखकाची समज आणि शैली दोन्ही सामान्यच आहेत. मात्र त्यामुळें सामान्य वाचकांना ते खात्रीने आवडतील.

### आत्मवृत्तपर लेखन

आत्मवृत्तर ललित लिखाणाला यंदा बहर आला आहे. आत्मवृत्तपर लिहिण्यासाठीं स्वतःजवळ बरंचसं सांगण्यासारखं आणि वाचकांना आपलं वाचण्याची उत्सुकता निर्माण होण्याएवढं प्रभावी व्यक्तिमत्व हवें. याचा विचार न करतां कोणीहि उठावं आणि आत्मवृत्तपर लिहावं असा प्रकार घडला आहे. यांत आमचे ललित लेखकहि सामील झाले आहेत. यंदा या विभागांत स. आ. जोगळेकर यांचा व्यासंग आणि प्रसंग (वाङ्मयशोभा) हें एकमेव निवेदन खास उल्लेखनीय. वि. द. घाटे यांनींहि

वयोमानाला अनुसरून जुन्या आठवणी सांगितल्या आहेत. मागें वळून पाहाणे हें वय झाल्याचें लक्षण. (तरीपण मी म्हातारा नाहीं असें घाटे गर्जून सांगतात) दीपावलींतील परिसंवादांत सगळेंच लिखाण आत्मवृत्तपर आहे. पण या आत्मपर लिखाणांत आत्म-समर्थनाऐवजीं कांहीं ठिकाणीं आत्मप्रौढी आल्यामुळें त्यांतील गंमत राहिली नाहीं. प्रा. न. र. फाटकांनीं इतरांच्यावर लिहिण्यांत जन्म घालवला, आतां स्वतःबद्दल लिहितांना ते कां संकोच करतात हें कळत नाहीं. कारण जोगळेकरांप्रमाणें फाटकांचें आत्मवृत्तहि अनेक दृष्टींनें वाचनीय ठरेल. ना. ग. गोरे यानींहि आत्मवृत्तपर लिहिलें आहे. गोऱ्यांना ऐन तारुण्यांतच जुन्या आठवणी सांगायची संवय आहे. हें त्यांच्या कांहीं लेखमालांतून दिसतें. विशेषतः समकालीन व्यक्तींबद्दल अशा तरुण माणसांना खरं लिहिणं कठिण जातं आणि त्यामुळें अशा आत्मपर लिखाणाच्या मन-मोकळेपणाला एक प्रकारची मर्यादा येते.

—आणि या मंडळींचे हें लिखाण वाचल्यावर न्या. रानडे, गोखले, टिळक, राजवाडे, वामनराव जोशी, काकासाहेब खाडिलकर आदि थोर महाराष्ट्रीयानीं स्वतः-बद्दल कांहीच कुठें लिहिलें नाही म्हणून त्यांच्याबद्दलचा आदर वृद्धिंगत होतो आणि तसेंच महाराष्ट्र चांगल्या लिखाणाला मुकला म्हणून वाईटही वाटतें.

### कथाकारांची कामगिरी

यंदाच्या दिवाळी अंकातील सर्वांत मोठा विभाग आणि सर्वांत निराशाजनक विभाग म्हणजे कथा. एकाच लेखकाकडून पैशाच्या आणि प्रसिद्धीच्या मोहानें दहा दहा बारा बारा कथा लिहिल्या जातात (गेल्या वर्षी २२ हा उच्चांक होता म्हणे) आणि त्यामुळें कथेचा दर्जा ढांसळतो. यंदा एकहि उत्कट प्रेमकथा, रांगडी ग्रामीण कथा, सोज्वळ आणि हृदयस्पर्शी कुटुंब कथा भीषणरम्य रहस्यकथा अगर खदखदवून हंसवणारी कथा वाचल्याचें आठवत नाहीं. विषय तेच तेच आणि त्याच ठुनाट पद्धतीनें मांडलेले, शब्दांवरील हुकमत कोणताहि क्षुद्र प्रसंग चित्रित करूं शकते आणि त्यांतून कथा, निर्माण होते. यंदा पु.भा. भावे यांनी विश्रांति घेतलेली दिसते. नवकथा कारांचे आघाडीचे शिलेदार श्री. गंगाधर गाडगीळ यांनीहि यंदा फारसें चांगलें लिहि-लेलें नाहीं. तीच गत व्यंकटेश माडगूळकरांची त्यांनी ऐन तिशींतच आपल्या बालपणींच्या रम्य कथा आळवून सांगितल्या आहेत. तरुण लेखक असें आत्मवृत्तपर लिखाण करूं लागला म्हणजे जरा काळजीच वाटते. जें काम फडके, खांडेकर, माडखोलकर जोगळेकर यांनीं करावयाचें तें तरुण लेखकांनीं इतक्या घाई-घाईनें करावयास नको. द.मा. मिरासदारांच्या हातूनहि फारसें जोमदार लिखाण झालेलें नाहीं. शंकर पाटलांनी कांहीं कथांत राकट-पणा दाखविण्याचा प्रयत्न केलाय, पण त्यांत पाहिजे तेवढी रग नाहीं. त्यामुळें यंदा ग्रामीण कथा फारशी नाहींच. वसुंधरा पटवर्धन आणि दि. बा. मोकाशी यांनीं यंदा लोकप्रिय होतील अशा कथा लिहिल्या आहेत. त्यांत वसुंधराबाईंची दीपावलींतील जप्ती, आणि मोकाशींची 'आमोद सुनासि आले' या कथा वाचकांच्या दीर्घकाळ लक्षांत राहातील.

> भागवताच्या भोजनालयीं
> साजरी झाली बुद्धजयंती
> कारण त्याच्या आज्ञापंक्ती
> भोजनहिताय भोजनसुखाय
>
> — शां. शं. रेगे

थोरल्या माडगूळकरांनीं आपल्या नेहमींच्या व्यापांत अनेक ठिकाणीं हजेरी लावली आहे, त्यांतल्या कांहीं कथा सवडीनें नीट लिहील्या असत्या तर खात्रीनें उत्तम कथा ठरल्या असत्या. जुन्या श्रेष्ठींपैकीं नाव घेण्यासारखे कोणीच नाहीं. खांडेकरानीं वयोमानाला अनुसरुन पुराणकालाकडे आपली दृष्टि वळ-वली आहे. पण पौराणिक नांवाखालीं आधुनिक जीवनाचें चित्रण आणि तेहि खांडेकरी शैलीला साजेसें. त्यामुळें ठराविक वाचकांनाच आवडावें. नव्या तरुण लेखकांत अनेकांनीं चांगलें लिखाण केलें आहे. त्यांत प्रामुख्यानें जी. ए. कुळकर्णी यांच्या साधने-तील व्यथा आणि दीपावलींतील 'रात्र झाली गोकुळी' या कथा विशेष उल्लेखनीय आहेत. विजय तेंडुलकरांनींहि यंदा कांहीं चांगलें लिखाण केलें आहे. विशेषतः त्यांची 'गांवकरीतील' चित्र-पट सृष्टींतील एक व्यक्तिरेखा आणि दिपावलींतील मित्रा अत्यंत हृदयस्पर्शी आहेत. सदानंद रेगे यांच्या चंद्र सावली कोरतो (दीपावली) आणि काकांची स्वप्नगंधा या काव्यपूर्ण कथा नवें तंत्र आणि आशय या दृष्टीनें खरोखर वरच्या दर्जाच्या आहेत.

मराठी कथेचे एक मानकरी अरविंद गोखले यांनीं आपली किर्ती कायम राहील याची खबरदारी घेतली आहे. गोखल्यांनीं अमेरिकेंत जें जीवन टिपलें त्याची अंतर्भेदी झलक त्यांच्या भूकंप (दीपावली) या कथेंत दिसते. अन्नू (हंस) अभोगी (वाङ्मयशोभा) या दोन्ही कथा वाचकांच्या बऱ्याच काळ लक्षांत राहाव्यात.

याशिवाय ए. वि. जोशी, अच्युत बर्वे, जयवंत दळवी, रणजित देसाई यांनीं यंदाच्या दिवाळी अंकांत उत्तम कथा दिल्या आहेत. प्रभाकर पाध्यांनीं आपल्या प्रवासांतील अनु-भवांत जे प्रसंग टिपले त्याचें प्रत्ययकारी चित्रण मोठ्या तन्मयतेनें केलें आहे. याशि-वाय शं. ना. नवरे, शंकर वैद्य, या तरुण कथाकारांचीहि कामगिरी डोळ्याआड करण्याजोगी नाहीं.

### विनोदी वाङ्मय—

विनोदी वाङ्मय हा एक दिवाळी अंकां-तील आवश्यक विभाग बनूं पाहात आहे. महाराष्ट्राचे अग्रणी विनोदी लेखक श्री. पु. ल. देशपांडे यांनीं यंदा विपुल लिहिलें आहे. पण त्यांतील 'शांभवी एक वेणें (मौज)' हा लेख बहारीचा आणि 'चावट' आहे. त्यांचा 'अंतु बरवा' (दीपावली) म्हणजे विनोद आणि कारुण्य यांचें भावमधुर संमिश्रण असणारी सुरेख व्यक्तिरेखा. विपुल विनोदी लेखन करणाऱ्या नव्या लेखांत वसंत सबनीस यांचें लिखाण उल्लेखनीय आहे. त्यांचा दीपावलींतील टेलिफोनवरील लेख आणि







अनुक्रमणिका

वीणेंतील वग अंतर्बाह्य विनोदी आहेत. बाळ गाडगीळ यांनीं पु. ल. देशपांड्यांच्या पद्धतीवर केसरींत एक लेख लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. याशिवाय, वि. आ. बुवा, बाळ सामंत, द. पां. खांबेटे, इंद्रायणी सावकार यांचे लिखाण त्यांच्या नेहमींच्या ठशाला अनुसरून आहे. त्यांत फारसे नावीन्य नाहींच. मं. वि. राजाध्यक्षांचा पुरुषांच्या मासिकाची कल्पना (दीपावली) चांगली असली तरी विनोदी लिहितां लिहितां राजाध्यक्ष विनाकारण गंभीर झाले आहेत. अर्थात् त्यांची खेळकर आणि बोचकारे देणारी धांवती शैली यांहि दोषावर पांघरुण घालते ही गोष्ट वेगळीच. याशिवाय चिं. वि. जोशी आणि कॅप्टन लिमये या दोन रिटायर्ड विनोदी लेखकांनीं दरवर्षीप्रमाणें यंदाहि हास्यास्पद लिखाण केलें आहे. विनोदी वाङ्मयाच्या जोडीला विनोदी चित्रांचाहि उल्लेख केला पाहिजे. वीणा, आवाज, आणि अलका, मोहिनी यांची मुखपृष्ठें व्यंगचित्रात्मक आहेत. शिवाय सालाबादप्रमाणें यंदाहि सर्व दिवाळी अंकांनीं हास्यचित्रांची लयलूट केली आहे. त्यांतील बरीचशीं चित्रें इंग्रजी-वरून घेतलेली आणि उरलेली अगदींच क्षुद्र आहेत. एकूण मराठी मासिकांतील व्यंगचित्रांत कल्पकतेपेक्षां आचरटपणाच अधिक डोकावूं लागला आहे. दीपावलींत आधुनिक दशावतार या नांवाखालीं ठाकऱ्यांचीं व्यंगचित्रें प्रसिद्ध झाली आहेत. दशावताराची कल्पना चांगली असली तरी ठाकऱ्यांच्या व्यंगचित्रांत याची तेवढी गंमत आलेली नाहीं.

## नाट्य आणि कादंबरी

यंदा एकांकिकेची चलती दिसते. विजय तेंडुलकर, रत्नाकर मतकरी, वसंत सबनीस, पु. ल. देशपांडे यांची कामगिरी उल्लेखनीय. परंतु या विभागाकडे संपादकाचें अक्षम्य दुर्लक्ष झालें आहे असें दिसतें.

दिवाळी अंकांत कादंबरी देण्याची प्रथा रुढ झाली आहे. 'अंजलि' मध्यें प्रा. फडक्यांची वार्षिक कादंबरी आहेच. फडक्यांच्या कादंबऱ्यांचे विषय, नायक नायिका आणि वर्णन शैली यांचा एक ठसाच बनला आहे. अर्थात् अजूनहि त्याला वाचक-वर्ग आहे हें निर्विवाद.

तीन पिढ्या (अनुराधा) ही अंबादास अग्निहोत्री यांची कादंबरी अत्यंत सामान्य आहे. अर्थात् चंद्रकांत काकोडकरांची अन्नपूर्णा, (साहित्यलक्ष्मी) व ना. ह. आपट्यांच्या ते अकरा दिवस (संजय) या कादंबऱ्यापेक्षां अग्निहोत्रींची कादंबरी वाचवते तरी. याशिवाय अनुवाद, दीपमाला, सुषमा रहस्यरंजन या अंकांतहि कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. पण त्यांत उल्लेखनीय अशी कोणतीच नाहीं.

दिवाळी अंकांतील हें साहित्य वाचून मनाशीं कांहीं विचार येतात. एक म्हणजे या सर्व प्रपंचाचा मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीला कांहीं उपयोग होत आहे काय? दिवाळी अंकाची वाढती लोकप्रियता लक्षांत घेऊन वाङ्मयाशीं सुतराम संबंध नसलेली मंडळी, चार लेखक दावणीला बांधून दिवाळी अंकाचा धंदा करूं पाहात आहेत आणि यामुळें दिवाळी अंकालाहि बाजारी स्वरूप प्राप्त होऊं लागलें आहे, आणि दिवसेंदिवस अंकाचा दर्जा खालावूं लागला आहे. दुसरी गोष्ट अशी कीं ख्यातनाम लेखकांच्या अत्यंत सामान्य अशा लिखाणाचाहि त्यांना मोह सोडवत नाहीं. या सर्व अंकांतून आणखी एक वैशिष्ट्य आढळतें आणि तें म्हणजे संपादकांनींहि आपले लेखकांचे गट ठरवून टाकले आहेत. एकाच मासिकाचे गेल्या चारपांच वर्षांचे दिवाळी अंक तपासून पाहिले तर असें आढळतें कीं संपादक आपल्या ठराविक लेखकांच्या वर्तुळाबाहेर जायला तयार नसतो. याशिवाय वैयक्तिक हेवेदावे, मोबदल्याची धुसफुस, अहंकार अशा अनेक कारणांमुळें कांहीं लेखक ठराविक मासिकांच्या भोंवतीं फिरत असतात.

दिवाळी अंकांनंतर लेखकांना आणि संपादकांना वर्षभर शिथिलता येते. नवी चुणुक असणारे लेखक शोधून काढून त्यांच्याकडून लिहवून घेण्याचा चोखंदळपणा कोणी संपादकांनी दाखविलेला दिसत नाहीं. अर्थात याला वाचकहि तसेच जबाबदार आहेत. ते लेखकांची नामावलि वाचूनच अंक विकत घेत असावेत. यामुळें दिवाळी अंकाचें बाह्यांग, अंतरंग ठरीव ठशाचें झालें आहे. आठ कथा, चार विनोदी लेख, कांहीं व्यंगचित्रें पांचसहा कविता दोन चार लेख एवढ्या भांडवलावर दिवाळी अंक निघू शकतो. त्याला कांहीं सायास, जुळवणी संपादन लागतें याची जाणीव कुणाला दिसत नाहीं. अगर असली तर त्याप्रमाणें अंक काढणें परवडत नसावें अगर करण्याची गरज भासत नसावी.

त्यामुळें विकत घेणाऱ्या वाचकांवर आणि नंतर जाहिरातीवर दिवाळी अंकांचें आर्थिक यशापयश अवलंबून असल्यामुळें ही परिस्थिति अशीच राहाणार हें निर्विवाद.

● ● ●



न्हही रे साला-'टॅस' जोवा जाऊंद








जणुं रत्नजडित सोन्याची लंका समुद्रांतून वर आली आहे, कीं सागरानें आपलीं हिरे, माणकें, इंद्रनिळमण्यांनीं खचित अशीं किरीट कुंडलें बाहेर काढून ठेवलीं आहेत. अशी जिला पाहातांच कल्पना आली ती...

# का व लू न

## नऊ नागांची नगरी

**-अनंत काणेकर**

या चिन्याचें नांव मि. थिप्. त्यानें उच्चार 'थिप्' केला; पण कागदावर लिहून देतांना, 'वाय ए पी' 'याप्' असें लिहिलें ! याप् ही एक खरोखरच 'अविस्मरणीय व्यक्ति' आहे. त्याचें तें खांदे उडवून स्वतः-शींच हसणें, मध्येंच आकाशाकडे डोळे लावून मिस्किलपणें कांहीं तरी उद्गारणें, चांगलें इंग्रजी, पण 'र' चा 'ल' करीत, कांहीं व्यंजनें गाळीत तुरुतुरु बोलणें—सर्वच कांहीं मजेदार होतें. माणूस बहुश्रुत, हुषार, विनोदी; पण आपण निश्चितपणें कोणत्या मताचे आहोंत याची दाद लागूं न देणारा धूर्त वाटला. भांडवलशाही, समाजवाद, डावें राजकारण यांचा त्याचा चांगला अभ्यास दिसला. इतिहास, तत्त्वज्ञान, भारतीय राज-कारण यांचीहि त्याला चांगली माहिती होती. 'चिन्यांचें मूळ वसतिस्थान तिबेट' तो म्हणाला, "तुमच्या हिंदुस्थानांत आपण १९६५ सालीं येणार. बुद्ध गया आणि सारनाथ पाह्यची मला फार इच्छा आहे. तोंपर्यंत तुमची भाषा शिकणार. एखाद्या देशाची भाषा आल्याशिवाय त्या देशांत फिरण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'

'तुमच्या बोलण्यावरून तुम्हांला आमच्या देशाची बरीच माहिती दिसते.' मी म्हणालों.

'आहे थोडीशी' आपले इवलेसे डोळे मिचकावीत तो म्हणाला, 'तुम्हां हिंदु लोकांना आठ मुलगे पाहिजे असतात ना !— आम्हा चिन्यांना सात हवे असतात !'

गांधीजीबद्दल त्याला फार आदर दिसला. "तुमचे 'माम्मा गांदी' फार चांगले— फार चांगले," तो पुन्हां पुन्हां म्हणत होता.'

त्याच्या विक्षिप्त बोलण्याचा नमुना म्हणून गांधीजींच्या वृत्तीचें त्यानें केलेलें वर्णन सांगण्यासारखें आहे. तो म्हणाला, 'पन्नास जहाजांत भारतांतल्या सगळ्या इंग्रजांना भरून तुम्हीं इथून चालते व्हा म्हणून तुमचे गांधी इंग्रजांना सांगतील. पण त्यांचीं जहाजें किनारा सोडून दोन मैल गेलीं कीं त्यांना तुम्ही परत या म्हणून ते सांगतील ! आमचे चिनी कम्यूनिस्ट इंग्रजांना जहाजांत भरून एकदां समुद्रांत ढकलतील ते कायमचे !'

'चीनच्या कुठल्या भागांतले तुम्ही ?' मी त्याला विचारलें,

'आम्हाला आतां चीनचा कुठलाच भाग नाहीं,' आपले बारीक डोळे आणखींच बारीक करीत तो म्हणाला, 'आमचे पूर्वज दोनशें वर्षांपूर्वी मलायांत आले.'

'काय हो,' त्यानें मला विचारलें, 'तुमच्या भारतांत बायका पुरुषांची पूजा करतात हें खरं का ?'

मी जरा लाजल्यासारखा झालों. हंसून मी म्हणालों, 'तसं अगदीं देव्हाऱ्यांत बसवून गंध, फुलं वाहून, आरती ओवाळून आमच्या बायका ---ांची दररोज पूजा करीत नाहींत; पण नवऱ्यासाठीं पुष्कळशीं व्रतंवैकल्यं करतात.'

'तुमचे ऋषिमुनि सुंदर स्त्रियांच्या पुढें हरल्याच्या गोष्टी तुमच्या पुराणांत आहेत नाहीं ?' त्यानें गंभीरपणें विचारलें.

'हो,' मी म्हणालों, 'कां ?'

'नाहीं,' त्यानें उत्तर दिलें, 'आमच्या चिनीभाषेंतहि एक म्हण आहे, कीं सौंदर्याच्या द्वारांतून कोणताच वीर जाऊं शकत नाहीं !'

मि. यिपशीं बोलतांना वेळ कसा जातो तें कळत नाहीं. मोठा मजेदार माणूस आहे.

आज रात्री ९ च्या सुमारास बोटीच्या ध्वनिक्षेपकावरून सांगण्यांत आलें कीं कांहीं मैल दूर असलेल्या एका इटालियन बोटी वरल्या एका उतारूला अपघात होऊन त्याचा पाय मोडल्याचा बिनतारी संदेश आला आहे. त्या बोटीवर डॉक्टर नाहीं; तेव्हां ती बोट आपल्याजवळ येऊन त्या उतारूला आपल्या बोटीवर पाठवणार आहे. बोटीवरल्या जीवनांत असला एखादा प्रसंग म्हणजे मोठीच खळबळ. आम्ही सर्व मोठ्या उत्सुकतेनं त्या बोटीची वाट पहात डेकवरून फिरत होतों. तास दीड तासानें पुन्हां आमचा ध्वनिक्षेपक बोलूं लागला, 'त्याला झालेली इजा फारशी'






गंभीर नाहीं. तेव्हां आमच्या बोटीची आणि त्या बोटीची भेट होत नाहीं !'

### २८ मे १९५५

बोटीवर चांगलेंच उकडतें आहे, समुद्रहि खवळलेला दिसतो. बोट चांगलीच हालते आहे.

डेकवर फारसे लोक नाहींत आपापल्या खोलींत पडून आहेत. हाँगकाँग हें बेट आहे. त्याच्याखेरीज चीनच्या मुख्य भूमीचा कावलून हा हाँगकाँग समोरचा भाग ब्रिटिशांकडेच आहे. विपूनें बोलतां बोलतां 'कावलून' आणि 'हाँगकाँग' या चिनी शब्दांचा अर्थ सांगितला, "कावलूनचा अर्थ 'नाइन ड्रेगन्स', किंवा 'नऊ नाग' लांबून कावलूनमधील डोंगरांच्या रांगा अस्ताव्यस्त पसरलेल्या नऊ अजस्र नागासारख्या दिसतात," तो म्हणाला, "हाँगकाँग म्हणजे गंधद्वीप."

### २९ मे १९५५

इंडो-चायनांत हो-चि-मिन्हचे कम्युनिस्ट सैनिक आणि फ्रेंच साम्राज्यवादी यांचें तुंबल युद्ध सध्यां चालू आहे. कम्यूनिस्ट चीनचा हो-चि-मिन्हला पाठिंबा आहे, तर इंग्लंड, अमेरिका साहाजिकच फ्रेंचांच्या पाठीशी आहेत, कालपासून आमची बोट इंडो-चीनच्या किनाऱ्या जवळून चालली आहे. आज हैनान समोर आम्ही आहोंत.

सकाळीं अकराच्या सुमाराला एक काळ्या भोर रंगाचें विमान वरेंच खालीं येऊन आमच्या बोटीशीं समांतर जाऊं लागलें. कुणाचें असेल हें विमान कोण जाणें, या विचारानें बोटीवरल्या आम्हां उतारूंत एकच खळबळ उडाली. इंडो चिनी कम्यूनिस्टांच्या विमानानें एखादा बाँब या ब्रिटिश जहाजावर सहज टाकला तर मागाहून चूक झाली, माफ करा, वगैरे आंतरराष्ट्रीय प्रश्नोत्तरें होतील; पण बुडून गेलेले आम्ही लोक कांहीं परत जिवंत होणार नाहीं. थोड्या वेळानें कळलें कीं तें विमान सध्यां या समुद्रांत गस्त घालणाऱ्या अमेरिकन आरमाराचें होतें.

सकाळीं हा भीतिदायक तर संध्याकाळीं आनंददायक प्रसंग घडला. इंग्रजी वाङ्मयांत 'डॉल्फिन्,' या सुंदर माशा विषयीं वाचलें होतें. आज शेंकडो 'डॉल्फिन्' माशांचा एक तांडाच्या तांडा समुद्रांतून उड्या मारीत बोटीच्या बाजूनें जात असलेला दिसला. तो पहायला सर्व उतारू डेकवर जमले होते. 'डॉल्फिन्' मासा शरीराची सफाईदार कमान करून पाण्यावर येतो, पुन्हां बुडी मारतो, तितक्याच सफाईनें पुन्हां बाहेर येतो, पुन्हां कमान करून बुडी मारतो —असा उड्या नागमोडी चालीनें पाण्यांतून जातो. संध्याकाळच्या सोनेरी सूर्यप्रकाशांत चमचमत, निळ्या पाण्यांतून किती तरी 'डॉल्फिन' उडत बुडत चालले होते, ते पाण्याखालीं असतात; पण पळतांना असे जातात म्हणे. आमच्या बोटीच्या पंख्याच्या आवाजानें भिऊन ते पळत होते.

### ३० मे १९५५

आज हाँगकाँगला बोट लागणार पहांटे सहा साडे सहाला जागा झालों. केबिनच्या



पोर्ट होल मधून दूर हाँगकाँग दिसत होतें. कडे खांद्यावर पांढरीं घरें घेतलेले हिरवे गार डोंगर आणि पेट्रोलच्या रुपेरी टाक्या केबिनच्या भोकासमोर वरखालीं होत होत्या. साडे आठला बोट धक्क्याला लागली एक जोराची पावसाची सर आली. आणि नंतर स्वच्छ ऊन पडलें. चीनच्या मुख्य भूमीचा भाग असलेल्या कावलून बंदराला बोट लागते. समोर हाँगकाँग दिसतें. लहानशा वाफोरांतून मधला समुद्राचा पट्टा ओलांडून हाँगकाँगला जायचें. कावलूनच्या धक्क्याकडून हाँगकाँगच्या धक्क्याकडे जाणारीं, किंवा तिकडून कावलूनला येणारीं वाफोरें पांच पांच मिनिटांनीं सुटत असतात. हांग कॉंग डॉलर सगळी आपल्याकडल्या चौदा आण्याइतका आहे. डॉलरचे शंभर सेंट. वाफोराचें तिकिट फक्त वीस सेंट आहे. कावलूनमध्ये रहाणारे हजारों लोक सकाळीं हाँगकाँगमध्यें कचेऱ्यांत जाऊन संध्याकाळीं घरीं परत येत असतात. हाँगकाँगचा विमानतळहि कावलूनमध्येंच आहे. एअरइंडियाची कचेरी मात्र हाँगकाँगमध्यें आहे. मध्यें समुद्राचा पट्टा असला तरी ब्रिटिशांचें हाँगकाँग म्हणजे हाँगकाँग बेट कावलून आणि कावलूनच्याहि डोंगरांपलीकडला,—दक्षिण चीनचें मुख्य शहर जे कॅन्टन त्याच्याकडे कावलूनहून जाणाऱ्या रेल्वेवरील वीस एक वीस मैलांचा न्यू टेरिटरी हा प्रदेश.

कावलूनच्या धक्क्याला बोट लागली, तेव्हां समोरचें हाँगकाँग धुक्यांत गुरफटलेलें दिसत होते. हळुहळू धुकें विरून जात होतें, आणि चार पांच हिरव्यागार डोंगरांच्या कुशींशीं, पोटाशीं बिलगलेलीं लहान मोठीं घरें मधून मधून दिसूं लागलीं होतीं. बऱ्याचशा आधुनिक इमारती डोंगर फोडून उंचसखल ठिकाणीं बांधलेल्या असल्यानें त्या एकमेकांच्या खांद्यावर उभ्या आहेत कीं काय असा भास होतो. धक्क्याला लागलेल्या बोटीवरून समोर कावलूनकडे पाहिलें तों एका इमारतीवरील कावलून पोस्ट ऑफिस ही पाटी स्पष्ट दिसत होती. थोड्या अंतरावर घुमट असलेल्या मनोऱ्यांची एक इमारत दिसली. कुणी तरी म्हणालें, हें हाँगकाँग कॅन्टन रेल्वे स्टेशन. इकडे तिकडे पहात होतो, इतक्यांत आमचे तरुण मित्र हाँगकाँग मधल्या एअर इंडियाचे श्री. शरद् वैद्याले आम्हाला शोधीत बोटीवर आले. कावलूनच्या टोकाला बाऊन्डरी रोडवर ते रहातात. जवळच विमानतळ आहे तिथें त्यांचें काम असतें. 'एअर इंडियाच्या कचेरींत माझें थोडें काम आहे; तेव्हां पलीकडे हाँगकाँगमध्यें जाऊं. तिथें थोडा वेळ भटकूं आणि मग दुपारीं आमच्याकडे जेवूं,' ते म्हणाले.

त्यांच्याबरोबर आम्ही बाहेर पडलों. आणि स्टार फेरी कंपनीच्या, वाफोरांतून पलीकडे गेलों. आकाशांत ढग जमले होते, आणि पुन्हां भुरुभुरु बारीक पाऊस पडूं लागला होता. डोंगरांवर इकडे तिकडे थोडेसें धुकेंहि





दिसत होतें. उकडत नसतें तर ब्रिटिश बँका कंपन्या कचेऱ्या इत्यादिकांच्या इथल्या इमारती आणि एकंदर वातावरण पाहून लंडन मध्येंच फिरत आहोंत असें वाटलें असतें. एअर इंडियाच्या ऑफिसांत विमानानें आलेले गेल्या आठवड्याचे 'टाईम्स ऑफ इंडिया' चे अंक दिसले. अधाशासारखे वाचून टाकले. कित्येक दिवसांनी मुंबईतल्या बातम्या वाचायला मिळाल्या. नतर बंबावाल्यांच्या बरोबर न्यू इंडिया इन्शुरन्स कंपनीच्या इथल्या कचेरींत गेलों. तिथें मॅनेजर नानावटी बरोबर बोलत बसलों असतां मॅनिलाहून आलेले श्री. आजगांवकर भेटले.

सिंगापूरप्रमाणेंच हाँगकाँगहि खुलें बंदर असल्यामुळें घड्याळें, कॅमेरे, कापड वगैरे वस्तू इथें अतिशय स्वस्त दरांत मिळतात. बंबावाल्यांच्या ओळखीच्या एका चिनी शिंप्याच्या दुकानांत सुटाचें सुंदर कापड विकायला ठेवलें होतें. मला पुरा सूट नको होता, फक्त कोट करून हवा होता. 'सूट नको, फक्त कोट करून दे,' असें मी त्याला म्हटलें, तेव्हां त्यानें नमुनेदार चिनी इंग्रजींत मला उत्तर दिलें, 'ओन्ली कोट नो कॅन् डू!'—म्हणजे फक्त कोट नाहीं करतां येणार! हाँगकाँगमध्यें सिंधी व्यापाऱ्यांचीं कापडाची मोठमोठी दुकानें आहेत. तेहि इंग्रज किंवा अमेरिकन गिऱ्हाइकाबरोबर असलेंच इंग्रजी बोलतात. एखादा ब्रिटिश किंवा अमेरिकन सैनिक दुकानांत आला की 'लुक सी बाय् बाय्—नो बाय्, गुड्बाय्!'—म्हणजे पहा, पहा, विकत घ्या नाहीं विकत घेतलांत तर रामराम!' असें म्हणत सिंधी व्यापारी त्याच्या मागें मागें फिरत असतो. आमच्या बोटीवरला एक सिंधी व्यापारी मला म्हणाला, आमचे लोक व्यापाराकरतां जगभर पसरले आहेत—जिब्राल्टर, जकार्ता, मॅनिला, वेस्ट इंडीज कुठेंहि तुम्ही गेलात तर सिंधी व्यापारी तुम्हांला भेटतील.

इथल्या व्यापाऱ्यांचें एक विशेष तंत्र म्हणजे मुंबईत ज्याप्रमाणें व्यापारी गिऱ्हाईकाला चहा पाजून खूष करतात त्याप्रमाणें व्हिस्की किंवा ब्रँडीचें पेय गिऱ्हाइकाला द्यायचें. कांहीं व्यापारी म्हणे अमेरिकन सैनिकांना खायला, प्यायला, घालून मोटारीतून फिरवतात. आणि मग वाटेल त्या किंमतीला आपला माल त्यांच्या गळी उतरवतात.

बारा साडेबाराला कावलूनला परतलों, आणि टॅक्सी घेऊन बंबावाल्यांच्या घरीं गेलों. त्यांच्या घराकडे जातांना एका बाजूला उघड्या बोडक्या लाल पिवळ्या टेकड्या दिसत होत्या. हिरव्यागार डोंगरांच्या माथ्यावर कांहीं ढग घोटाळत होते. एका अद्यावत् इमारतींतला प्रशस्त फ्लॅट कंपनीनें बंबावाल्यांना रहायला दिला आहे. बंबावाले म्हणाले 'कंपनी भाडं भरते म्हणून ठीक आहे. या फ्लॅटचं भाडं महिना अकराशें हाँगकाँग डॉलर्स म्हणजे जवळ जवळ हजार रुपये आहे!' हाँगकाँग मधलीं भाडीं, नोकरांचे पगार—एकंदर सर्वच रहाणी फार महाग आहे. बंबवाल्यांच्याकडे काम करणाऱ्या चिनी मोलकरणीचा पगार महिना एकशेंतीस डॉलर्स म्हणजे जवळ जवळ सव्वाशें रुपये! "मात्र सैंपाक, झाडलोट, कपडे धुणें—फार काय कपड्यांना रोज इस्तरी करणें,—सर्व कांहीं ती करते" बंबावाले म्हणाले, "या चिनी आया काम करणाऱ्या जबरदस्त!" सौ. बंबावाल्यांनी तिला वरण, आमटी, चपात्या करायलाहि शिकवलें आहे. स्वतःचें चिनी जेवण म्हणजे घाडगाभर भात, उकडलेल्या भाज्या वगैरे ती स्वतः करून खाते. आणि आपल्या कामाला लागते. जेवण झाल्यावर बंबावाल्यांनी आम्हाल केळीं खायला दिलीं तीं फॉर्मोसाहून आलेलीं होतीं.

विश्रांति घेतल्यानंतर दुपारीं कावलूनच्या मुख्य रस्त्यावर भटकायला बाहेर पडलों. एखाद्या रस्त्याला मॅथान स्ट्रीट असें इंग्रजी नांव दिसलें तरी बऱ्याचशा रस्त्यांचीं नांवें पेकिंगरोड, हँको रोड, हायफाँग रोड अशीं चिनीच होतीं. हॉकी, बॅडमिंटन वगैरे खेळांचें सामान विकणाऱ्या एका दुकानांत बेळगांवचे श्री. वेलींग या महाराष्ट्रीय गृहस्थांची गांठ पडली. लवकरच श्री. वेलिंग खेळाच्या सामानाचें स्वतःचें दुकान इथें काढणार आहेत. मिरामार हॉटेलांत ऑल इंडिया रेडिओचे डॉ. राम मराठे भेटले. भारतीय गायक नर्तकांचे एक शिष्टमंडळ घेऊन ते चीनमध्यें कॅन्टनला जात आहेत. सफाईनें चिनी भाषा बोलणारे महाराष्ट्रीय श्री. परांजपे त्याच्याबरोबर दुभाषे म्हणून जात आहेत. डॉ. मराठ्यांच्या खोलींतून खालीं हॉटेलच्या दाराशीं आलों तों आणखी दोनतीन महाराष्ट्रीय मित्र, भारतीय मजूर संघाच्या शिष्टमंडळांतून चीनला गेलेले हैद्राबादचे श्री. व्ही. डी. देशपांडे आणि मुंबईचे डॉ. गणाचार्य तिथें भेटले.

कपडे, घड्याळें, कॅमेरे वगैरे पहात रस्त्यांतून फिरत असतां 'डेरीफार्म' नांवाचें एक चहाचें दुकान दिसलें. बंबावाले म्हणाले, या चिनी दुकानांत चहा फार चांगला मिळतो. आम्हीं चहा मागवला. इथें ताकहि चांगलें मिळतें, असें म्हणून बंबावाल्यांनी स्वतःकरतां ताक मागवलें. मात्र ताकाला इथें 'आंबट दूध'—सॉवर मिल्क् म्हणतात! कचेऱ्यांतून बाहेर पडणारे सुशिक्षित चिनी चांगलेच गोरेपान आणि बूटसूट, टायशर्टांत दिसत होते; तर बिस्किटें किंवा फुलं विकणारे रस्त्यांतले चिनी फेरीवाले ठराविक तुकतुकीत काळ्या कापडाच्या बंडी-पायजम्यांत आणि डोक्यावर उलट्या टोपलीसारखी मध्यें कळस असलेली टोपी—असे दिसत होते. बऱ्याचशा चिनी स्त्रियांचा वेषहि पुरुषांसारखाच काळ्या तुकतुकीत कापडाचा पायजमा आणि बंडी असा दिसतो. केसाचें चकडें, आपल्या इथल्यासारखाच अंबाडा किंवा चांगला लांबलचक वेणीचा शेपटा. मात्र सुशिक्षित, सुखवस्तु चिनी स्त्रिया इंग्रजी पद्धतीच्या रंगीबेरंगी फ्रॉक्मध्यें किंवा स्कर्ट्-ब्लाऊज्मध्यें, किंवा खांद्यापासून गुढग्यापर्यंत अंगाला तंग चिकटणाऱ्या चिनी पद्धतीच्या फ्रॉकमध्ये दिसतात. याला 'चाँगसाम' म्हणतात असें कळलें. यातंग चाँगसां मध्यें रेखीव सडपातळ बांध्याच्या काळ्या कुलीन केंसांच्या गोऱ्यापान चिनी तरुणी बाहुल्या सारख्या सुरेख दिसतात. फुलें किंवा बिस्किटें विकणारे फेरीवाले आपला माल खांद्यावर कावडी सारख्या बांबूला अडकविलेल्या टोपल्यांतून विकीत असलेले दिसले. बराच वेळ कावलून मध्यें भटकून संध्याकाळीं बोटीवर परत आलों.

रात्रीं केबिनमध्यें बिछान्यावर पडलों आणि कुशीवर वळून सहज समोरच्या खिडकीवजा भोंकातून समोर पाहिलें तर जागेपणीं लखलखीत रंगी बेरंगी स्वप्न समोर दिसलें. हाँगकाँगमधल्या डोंगरांच्या कडेकपारी खोदून वर खाली बांधलेल्या शेंकडो इमारतींवर लाल पिवळे, हिरवे, निळे असंख्य निऑन लाइट्स् झळझळत होते. रत्नजडित सोन्याची लंका समुद्रांतून वर आली आहे कीं सागरानें आपलीं हिरे माणकें इंद्रनिळ मण्यांनी खचित अशी किरीट कुंडलें बाहेर काढलीं आहेत?

(अपूर्ण)







गेल्या महिन्यांत दिल्लीच्या इस्पितळांतून एक मूल पळविल्याची अद्भुत कहाणी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती. मुलासाठीं आसुसलेल्या स्त्रिया त्यासाठीं वाटेल तीं साहसें करावयास तयार असतात. अशीच एक घटना १९५१ च्या मे महिन्यांत पाटणा येथें घडली. त्या घटनेचा हा रोमांचकारी तपशील—

# रक्ताचें नातें

—चंद्रसेन

राणी देवीला कसलीच कमतरता नव्हती. मायेनं फुलासारखा जपणारा नवरा,—आणि त्याला सरकारी नोकरी असल्यामुळें कशाचीच कमतरता नव्हती. फक्त घरांत आतां दोघांच्या प्रेमाला तिसरा गोड साक्षीदार येण्याचीच दोघंजणं वाट पाहात होतीं.

आपल्यासा मुलगा व्हावा-अशी दोघांची मनोमन इच्छा. राणीला तर मुलाचा ध्यासच लागलेला जणूं! मुलासठीं तिचीं कडक व्रतवैकल्यें सुरू झालीं. सोमवार व शनिवारी ती एकभुक्त राही. मंगळवारचा तर कडकडीत उपास. राणीचा नवरा तिची सारखी चेष्टा करी.—म्हणे—" अग असे उपास तापास करून कां कुठं मुलं होतात. ? " त्यावर राणी म्हणे " राहूं द्या तुमचं—मुलगा झाला म्हणजे नाचाल. "

राणीची देवभक्ति खरंच सफल झाली कीं काय कोण जाणे! राणीला दिवस गेले आणि हां—हां म्हणतां दिवस जवळहि आले. २० मे १९५१ च्या सकाळी राणीच्या पोटांत दुखू लागलं. नवऱ्यानें तिला पाटणा जनरल हॉस्पीटलमध्यें दाखल केलें—

आणि रात्रौ ८॥ वाजतां राणी पुत्रवती झाली. अखेर राणीची तपश्चर्या फळाला आली. आपला हा ऐश्वर्याचा ठेवा कुठं ठेवूं न् कुठं ठेवूं नको असं तिला झालं. बाळाला सारखं हृदयाशीं धरून ठेवावं—कुणाकुणाजवळ देऊं नये असंच तिला वाटूं लागलं. पण बाळंतीणीजवळ चोवीस तास मूल ठेवायला नर्स कुठं कबूल होती? ती सारखी आतां आंघोळ घालायला-जराशानं औषध पाजायला, या ना त्या निमित्तानें बाळाला घेऊन जायची; राणीला त्या मेल्यांचा अरसा राग यायचा-पण करते काय?

दुसऱ्या दिवशीं म्हणजे एकवीस तारखेला







संध्याकाळीं राणी जागी होऊन पाहाते तों बाळ पाळण्यांत नाहीं. तिनें म्हाताऱ्या दाईला बोलावून विचारलें कीं बाळ कुठंय ? दाई म्हणाली, "एका तासापूर्वी नर्स आली आणि बाळाला घेऊन गेली.

राणीनें विचारलें "पण तूं विचारलं नाहींस कशाला बाळाला नेलं तें ?"

दाई म्हणाली, "विचारलं ना ! तेव्हां नर्सबाय म्हणाली कीं बाळाला आंघोळ घालायची आहे आन् कपडे नेसवायचे आहेत."

"अस्सं–" राणीनें सुटकेचा निश्वास टाकला. पण तिला आश्चर्यच वाटलं कीं— इतका वेळ नर्सनें बाळाला कसं परत पाठवलं नाहीं."

पण थोड्या वेळानें हॉस्पीटलमधल्या नर्सनें बाळाला आंघोळ घालण्यासाठीं म्हणून दुसऱ्या एका दाईला पाठवलं. पण बाळ कुठं सांपडेना. सर्वत्र शोधाशोध सुरू झाली. पहिल्यांदा वाटलं कीं कुणी तरी बाळाला घेऊन खेळवत बसलं असेल. पण थोड्या वेळानें खरोखरीच बाळाचा पत्ता लागेना तेव्हां हॉस्पीटलमध्यें घबराट निर्माण झाली. राणीनें तर हंबरडाच फोडला. शुभ्रवेषधारी परिचारिका इतस्ततः धांवाधांव करूं लागल्या. सारेच घाबरले. कुणाला कांहींच सुचेना–हें असं झालं तरी कसं ?–बाळाला कुणी पळविलं ?–तर्कवितर्क सुरू झाले.

राणी म्हणाली कीं पोलिसकडे तक्रार नोंदवा. पण व्यर्थ प्रसिद्धी नको आणि हॉस्पीटलचं नांव उगाच खराब व्हायला नको म्हणून, डॉक्टर आणि परिचारिकांनी तिला दटावलं–तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण जसजसा वेळ जाऊं लागला तसं राणीचं चित्त थाऱ्यावर राहीना. ती वेड्यासारखी करूं लागली–डोकं आपटून प्राण देण्याचा यत्न करूं लागली. आतां ही ऐकायलाच तयार नाहीं असं पाहून इस्पितळाच्या अधिकाऱ्यांनीं पोलिसांकडे तक्रार नोंदविण्यास संमति दिली. राणीचे नातेवाईक जेव्हां तक्रार नोंदवायला बाहेर निघाले तेव्हां इस्पितळाच्या दरवाजाच्या बाहेर एक गाडी उभी राहिली होती त्यांतून एक अद्यावत् पोषाख केलेली व्यक्ति आंत जाऊं लागली. त्यांना वाटलं हा सिव्हिल सर्जन असावा. त्यांनीं त्याला भेटून बाळाचा शोध लावण्याची विनंति केली. तेव्हां तो गृहस्थ म्हणाला-मी सिव्हिल सर्जन नाहीं— "आपण उगाच माझ्याकडे आलांत" शेवटीं राणीच्या नवऱ्यानें मध्यरात्रीं पीरबाहोर पोलिस स्टेशनवर आपलं मूल हरवल्याची तक्रार नोंदवली.

या प्रकरणीं इस्पितळांतीलच कुणातरी व्यक्तीचा हात असावा असा पोलिसांचा तर्क. त्यांनीं इस्पितळांतील प्रत्येकाचा कसून जबाब घेतला. राणीच्या शेजारीं एक पेशंट रोगी स्त्री होती. तिला बिचारीला मूल होत नव्हतं चार वेळां तिचा गर्भपात झाला. त्यामुळें ती मुलासाठीं आसुसलेली होती. पोलिसांना प्रथम तिचाच संशय आला. तिलाहि पोलिसांनीं खूप छेडलं. कुमऱ्हार येथील तिच्या घराची झडती घेतली पण कांहींच सांपडलं नाहीं. रेल्वेस्टेशन, गंगाघाट, सर्वत्र तपास केला पण व्यर्थ ! शिवाय इतर इस्पितळांतहि चौकशी केली पण कांहीं पत्ता लागेना.

पोलीस परत इस्पितळाकडे गेले. तेथील नोकरांनीं त्यांना एक महत्त्वाची बातमी दिली. कीं त्या दिवशीं ८॥ वाजतां इस्पितळाच्या आवारांत रेशमी शाल पांघरलेली एक स्त्री संशयास्पद रितीनें हिंडत होती. पण ती स्त्री कोण होती हें कुणालाच सांगतां येईना. इस्पितळांतील नोकरांना आणखी तीन इसम आवारांत हिंडतांना आढळले. ते सर्व मिस मिश्र हिला आमचं काम झालं का असं विचारतांना त्यांनीं ऐकलं. आणि तिनं, होय तुमचं सारं काम झालंय असं उत्तर दिल्याचंहि त्यांनीं ऐकलं. यावर पोलीसांनीं मिस मिश्रला विचारलं त्यावर तिनं उडवा-उडवीची उत्तरं दिली. इस्पितळातील सर्व स्टाफच याबाबत कावल्यासारखा झालेला दिसला आणि पोलिसांनीं जास्त कांहीं केलं तर आपण सारेजण संपावर जाऊं अशीहि त्यांनीं धमकी दिली.

या प्रकरणांत कांहीं कौटुंबिक हेवेदावे असावेत असं पोलिसांना प्रथम वाटलं. पण चौकशी केल्यानंतर या शंकेत तथ्यांश नसल्याचं त्यांना आढळलं. कदाचित या प्रकरणामागं एखादी मुलं पळवणारी टोळी असावी असाहि एक तर्क पुढें आला. त्या दृष्टीनें अशा सर्व संशयित टोळीवाल्यांनाहि पोलिसांनीं छेडलं अशा टोळ्यांच्या हालचाली-वर सक्त नजर ठेवली–पण त्यांतूनहि कांहींच निष्पन्न झालं नाहीं–सर्व पोलिस स्टेशनांवर सूचना देण्यांत आल्या कीं कोणत्याहि प्रकारची विलक्षण घटना घडल्यास त्याची नोंद घ्यावी. या सूचनेचा चांगला परिणाम झाला. लवकरच एक बातमी आली कीं पन्हापूर येथें शेतांत एक लहान मूल सांपडलें अर्थात् ती मुलगी होती. कुणी म्हणालं कीं आईबापानीं इस्पितळांतील मुलगा चोरून, आपली मुलगी शेतांत टाकली असावी. शेवटीं तपासाअंतीं असं कळलं कीं ती अनौरस संतति आहे.

एक दिवस बिहारच्या सी. आय. डी. खात्यांतील सब इन्पेक्टर सरोज रंजन सहाय यांना गुप्तरितीनें अशी बातमी लागली कीं पाटण्यांतील 'महाराजा की देवडी' या विभागांतील श्रीनिवास पांडे यानें कुठूनतरी एक मूल ( मुलगा ) आणला असून तो तें मूल आपलंच आहे असं शेजाऱ्यांना सांगत सुटलाय. या श्रीनिवासला एकूण दोन बायका. कांहीं जबाबदार व्यक्तींकडे चौकशी केल्यावर असं कळलं कीं या श्रीनिवासच्या दोन्ही बायकांना दिवस गेल्याची बातमी नव्हती. मात्र त्यापैकीं एका बायकोनें आपल्याला दिवस गेल्याची खोटीच हूल उठवली होती.

यामुळें पोलिसांनीं शेवटीं धाडसच करायचं ठरवलं. यांत कदाचित शेवटीं खोटेपणा पदरीं येण्याचा धोका होता पण तो पत्करुन त्यांनीं १४ जून १९५१ रोजीं श्रीनिवासच्या घरावर छापा घातला आणि मुलाचा ताबा घेतला. पोलिसांनीं मुलाला ताब्यांत घेतांना श्रीनिवास आणि त्याच्या दोन्ही बायकांनीं फारच मोटा आरडाओरडा केला. एकीनें तर दिवाणी दावा लावण्याची धमकी दिली. पोलिसांनीं तिघांना पोलिसस्टेशनवर नेलं. तेव्हां मात्र तिघांनीं मुकाट जबाब दिला कीं तें मूल आपलं नसून आपण याच मोहोल्यांत राहाणाऱ्या ब्रिजमोहन प्रसाद या गवळ्याच्या आजीकडून हें मूल पन्नास रुपयांना विकत घेतलं. आणि त्या म्हातारीनें तें मूल आपण एका विधवेकडून आणलं अशी त्यांना माहिती दिली.

( पान ५२ वर चालू )




• तारे–तुटले • फाळणीचें काम सुरू झालें • डांगचें शल्य
• अभिनंदन • ग. दि. माडगूळकर आणि नवसाहित्य
• योग्य दखल • नवकलेचीं विस्तारलेलीं क्षितीजें • कांहीं प्रदर्शनें • संगीत क्षेत्रांतील अजब घटना • नोबेल पारितोषकें
• शतायुषि ग्रंथ • अंतरिक्षांत.

## तारे–तुटके

संयुक्त महाराष्ट्राच्या शुभागमनाच्या मुहूर्तेच्या आनंदांत विरजण घालणाऱ्या नोव्हेंबर महिन्यांतील घटना म्हणजे कर्तृत्ववान महाराष्ट्रीयांचे आकस्मिक मृत्यु. या एका महिन्यांतच महाराष्ट्राच्या विविध क्षेत्रांत अग्रभागी चमकणाऱ्या कर्तृत्ववान पुरुषांचें शोचनीय निधन झालें. देशभक्त केशवराव जेधे आणि सेवानंद बाळूकाका कानिटकर यांचें निधन म्हणजे महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक जीवनांत निर्माण झालेली एक पोकळी. मराठी राजकारणांत आज केशवरावांसारख्या सर्वपक्षीयांना प्रिय असणाऱ्या निस्वार्थी प्रेमळ आणि फटकळ पण त्यागी अशा नेत्याची गरज होती. विधायक कार्यातील त्यागमूर्ति आणि अतिरेकी व्यक्तिमत्व असणारी बाळूकाकांची मूर्ति यापुढें कधींहि दिसणार नाहीं.

रंगभूमीच्या क्षेत्रांत आपल्या तेजानें तळपणारे श्री. चिंतामणराव कोल्हटकर आणि श्री. पार्श्वनाथ आळतेकर यांची स्मृति नाट्यरसिकांना सदैव रहावी. चिंतामणरावांनीं नाट्य-चित्रपट आणि साहित्य या तिन्ही क्षेत्रांत अविस्मरणीय कामगिरी केली. तर पार्श्वनाथ आळतेकरांचें जीवन म्हणजे एका ध्येयवाद्याची अपरिहार्य शोकांतिका. त्यामुळें आळतेकरांची अखेरी ज्या परिस्थितींत झाली त्यामुळें मन विषण्ण होतें.

इतिहास क्षेत्रांतील दोन मातब्बरांचें निधन हाहि मराठी विद्वत्तेला गेलेला एक तडा. रियासतकार सरदेसाई यांचें निधन म्हणजे सतत दीर्घोद्योग आणि व्यासंगाच्या एका महत्त्वाच्या कालखंडाची समाप्ति. आजकाल महाराष्ट्रांत एकाच विषयाला वाहून घेणारीं अभ्यासी माणसें दुर्मिळ झाली आहेत. अशा अवस्थेंत रियासतकारांचा आदर्श अनेक दृष्टीनें उपकारक ठरेल. महापंडित डॉ. भ. ग. भाळवेकर यांचे निधन अनेक अर्थानें महाराष्ट्राला जाणवेल. हा थोर संशोधक इतर प्रांतीयांनीं जवळ केला आणि महाराष्ट्रानें त्याची अक्षम्य उपेक्षा केली याचें शल्य संयुक्त महाराष्ट्राला यापुढें सतत जाणवेल. इतिहासपरिषदेपुढील होणारें आपलें व्याख्यान तपाशीत असतांना त्यांना हृदयविकाराचा झटका आला. रणांगणावर सैनिकाला मृत्यु यावा तसाच हा भाग्यशाली मृत्यु असला तरी त्यानें महाराष्ट्राचें आणि पर्यायानें भारताचें कधींहि भरून न येणारें नुकसान केलें आहे हें निर्विवाद.

या सर्व थोर आत्म्यांना दीपावली तर्फे आदरांजलि.

## राजकारण

### फाळणीचें काम सुरूं झालें

संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती ही आतां झाल्यातच जमा आहे. फक्त महिन्या दोन महिन्याचा आतां प्रश्न आहे. मात्र सरकारी अधिकृत घोषणा होण्याची वाट न पहातां मुंबई सरकारनें विभाजन कार्याला झपाट्यानें आरंभ केला असून या कार्याला सर्वतोपरी लायक अशा अत्यंत तडफदार, कार्यक्षम आणि निःपक्षपाती अधिकाऱ्याची म्हणजे श्री. मोरेश्वर पिंपुटकर आय. सी. एस् यांची नेमणूक केली आहे. मोरारजी मंत्रिमंडळांत ज्या काळांत श्री. यशवंतराव चव्हाणांकडे ॲकोमोडेशन खातें होते त्या काळांत श्री. पिंपुटकर कंट्रोलर ऑफ ॲकोमोडेशन म्हणुन काम पाहात असल्यामुळें मुख्य मंत्र्यांना श्री. पिंपुटकरांचीं काम करण्याची वेगवान पद्धति माहित असल्यामुळें त्यांनीं आतांपर्यंत पिंपुटकरांवर अशाच तऱ्हेच्या अवघड जबाबदाऱ्या टाकल्या. मध्यंतरी कोंकण विभागाच्या विकासाची जी आरडाओरड चालू होती त्या काळांत कोंकण विभागांतील विकासाचीं कामें जलद गतीनें आटपून टाकावींत म्हणून पिंपुटकरांच्या हातीं मुंबई विभागाची डिव्हिजनल कमिशनरच्या ऑफीसची सूत्रें देण्यांत आली. त्यानंतर राज्यपुनर्रचना झाल्यामुळें विदर्भ आणि मराठवाड्यांतील नोकरवर्गाची मुंबई राज्यांत व्यवस्था लावण्याचें अवघड काम पिंपुटकरांच्यावर सोंपविण्यांत आलें. हें काम संपल्यानंतर त्याच काळांत कॉंग्रेसनें सहकारी शेतीच्या प्रश्नावर फार जोर दिल्यामुळें ती संधि साधून सहकारी चळवळीच्या दृष्टीनें कांहीं हालचाल व्हावी म्हणून पिंपुटकरांना इंडस्ट्रीज ॲंड को-ऑपरेशन डिपार्टमेंटचे सेक्रेटरी म्हणून नेमण्यांत आले.

मुंबई सरकारच्या महसूल खात्यांत श्री. पिंपुटकरांएवढा दरारा आणि धाक कुणाचाच नसेल. त्यांच्या कारभारविषयक निःपक्षपातीपणाच्या अनेक सुरस आणि चमत्कारिक गोष्टी प्रख्यात आहेत. धान्यनियंत्रणाचा भंग केल्याबद्दल त्यांनीं कलेक्टर असतांना आपल्या






सौ गयवतील हि दंडाची शिक्षा फर्मावली आणि तो दंड सरकारी तिजोरींत भरायला लावला.

अशी अत्यंत लायक अधिकाऱ्याकडे हें अवघड पण कटु कर्तव्य सोंपविल्यामुळें या फाळणीच्या कार्यांत महाराष्ट्रावर अन्याय होणार नाहीं आणि महाराष्ट्र कुणावर अन्याय करणार नाहीं हें निश्चित !

## डांगचें शल्य

एकभाषी राज्याचा प्रश्न सुटला पण डांगचें शल्य तसेंच राहाणार असें दिसतें. कारण महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या बैठकीसमोर भाषण करतांना मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनीं डांगचा निर्णय डांगमधील मराठी कॉंग्रेसजनांच्या संमतीनंतरच घेतला आहे असें जाहीर करून एक प्रकारें विरोधकांना निरुत्तर केलें आहे. गेल्या वर्षात डांगमध्यें पद्धतशीर गुजरातीकरण चालू होतें त्याकडे आमच्या कार्यकर्त्यांनीं अक्षम्य दुर्लक्ष केलें. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या झंझावातांत महाराष्ट्रांतील विधायक कार्याचे उरले सुरले अवशेष समूळ नष्ट झाले. विरोधीपक्षीयांकडे विधायक कार्यकर्त्यांचा मूळांतच अभाव. अशा परिस्थितींत यशवंतराव चव्हाणांचें म्हणणें न ऐकतां मराठी कॉंग्रेसजनांनीं लोकलबोर्डाच्या निवडणुका लढविल्या आणि त्यांत ते हरले. तेव्हां सद्यःपरिस्थितींत महाराष्ट्रानें डांगबाबत विनाकारण चळवळ न करतां आपल्या पुढील विधायक कार्याची वाटचाल करण्याच्या दृष्टीनें इतर महत्त्वाच्या प्रश्नावर लक्ष केंद्रीत करावें. कारण गेल्या अडीच तीन वर्षांत महाराष्ट्रांतील विकासकार्याचें एवढें अपरंपार नुकसान झालें आहे तें भरून काढण्यासाठीं आतां सर्व पक्षांनीं एकत्र येऊन महाराष्ट्राचें आर्थिक आणि सामाजिक जीवन कसें समृद्ध होईल यांतच आपली शक्ति खर्च केली पाहिजे.

विष्णुशर्मा

---

( पान ५० वरून चालू )

हें ताब्यांत मिळालेलं मूल राणीचंच असं इस्पितळांतील नोकरांनीं ओळखलं. पण त्यांनी एकच दिवस मुलाला पाहिलं असल्यामुळं त्यांना ओळखण्याच्या निश्चित खुणा सांगतां येईनात.

आतां श्रीनिवासकडे राणीचं मूल कसं आलं याचे धागेदोरे पोलिसांनीं जुळवले. त्याची पहिली बायको वांझ होती. त्याची दुसरी बायको दोन तीन महिन्यापूर्वी आपल्या आईकडे गेली आणि आपण गरोदर असल्याची बातमी तिनं लाजत लाजत तिच्या कानांवर घातली. आणि हें सिद्धं करण्यासाठीं गवळणीवर मूल मिळवून देण्याची जबाबदारी सोंपवण्यांत आली. या योजनेप्रमाणें २१ मेला रात्रौ ९ ते ११ च्या दरम्यान राणीदेवीचें मूल पळविण्यांत आलें. त्रिदेश्वरीला मुलगा हवा होता आणि त्याप्रमाणें हा मुलगा चोरण्याचा घाट घालण्यांत आला. नर्सच्या साहाय्यानें मुलाला कांहीं काळ वार्डात ठेवण्यांत आलें आणि नंतर मोटारींतून पळवण्यांत आलें. एक आठवडाभर मूल गवळणीकडे होते. आठवड्यानें म्हणजे ३० मेला त्रिदेश्वरी गवळणीकडे राहायला आली आणि तीन दिवस राहून मुलासह परत गेली. श्रीनिवासच्या घरी पुनर्जन्म जाहीर करण्यांत आला आणि नातेवाईकांना मोठी मेजवानी देण्यांत आली.

आतां पोलिसांच्या समोर एक नाजूक प्रश्न उभा राहिला. राणीदेवी प्रसूत झाली हें सिद्ध होतें. वैद्यकीय तपासणीकरून तसा प्रकार त्रिदेश्वरीच्या बाबतींत घडला नाहीं हें सिद्ध करण्यांत आलें. हें मूल त्रिदेश्वरीचें नाहीं हें खरें पण राणीचेंच कशावरून ? यासाठीं पोलिसांना निश्चित पुरावा पाहिजे होता. यासाठीं दोघांच्या रक्तांची तपासणी करण्याचें ठरलें.

तज्ञांच्या मतें माणसांच्या रक्ताचे अनेक गट पडतात. मानवी रक्ताच्या तांबड्या पेशींत Agglutinogen नांवाचा एक घटक असतो. रक्ताचे ए, बी, ओ असे तीन भाग पडतात. आणि संशयित बाबीत पितृत्व सिद्ध करण्यासाठीं या घटकांचें निश्चितीकरण करणें उपयुक्त ठरतें. मेंडलच्या तत्त्वाप्रमाणें मातापित्यांच्या रक्ताचे गुणधर्म मुलांच्या रक्तांत उतरतात. आणि याकरितां डॉक्टरांनीं कांहीं ठराविक मार्गदर्शक C तक्ते केले आहेत. त्यावरून आईबाप आणि मूल यांच्या रक्तांच्या घडकांवरून त्याचें नातें निश्चित करतां येतें. उदाहरणार्थ मातापित्यांच्या रक्ताचे घटक O असते तर मुलाचे रक्तघट A किंवा B असणें शक्यच नसते.

त्यामुळें राणी देवीचा कूटप्रश्न सोडविण्यासाठीं राणीदेवी, तिचा नवरा मोरेश्वर, आणि तें मूल यांचे रक्तघटक तपासणें आवश्यक होतें. या बाबतींत पाटण्याच्या ब्लड बँकेनें राणीदेवीच्या विरुद्ध निकाल दिला. हें मत पूर्वग्रहदूषित असल्याचें वाटून पोलिसांनीं सिरिऑलॉजिस्ट ॲट केमिकल अनलायझर टू गव्हर्न्मेंट ऑफ इंडिया कलकत्ता यांच्याकडे रक्ताचे नमूने तपासासाठीं पाठविले त्यानें ब्लड बँकेच्या विरुद्ध मत दिलें त्यामुळें आणखी एका ब्लड बँकेकडे याबाबत विचारणा करण्याची जरूरी भासली. त्याप्रमाणें यु. पी. सरकारच्या लखनौ ब्लडबँकेकडे विचारणा करण्यांत आली त्यांनीं सिरिऑलजिस्टच्या मताप्रमाणें मत दिलें तो अहवाल पुढीलप्रमाणें

| नांव | पाटण ब्लड बँकेचा अहवाल | सिरिऑलजिस्ट कलकत्ता अहवाल | लखनौ ब्लड बँकेचा अहवाल |
|---|---|---|---|
| १ महेश्वर | O | O | O |
| २ राणी देवी | B | B | B |
| ३ मूल | AB | B | B |

वरील पुराव्यामुळें पळवलेलं मूल हें राणीदेवीचंच असें ठामपणें सिद्ध झालें. सेशन्स कोर्टात जजानें रक्ताचं नातेंच अखेर ग्राह्य मानलें. पाटण्याचे फर्स्ट असिस्टंट सेशन्स जज श्री. टी. एन् सिंग यांनीं श्रीनिवास पांडे आणि नर्स या दोघांना ४ वर्षें सक्तमजुरी, त्रिदेश्वरीला ३ वर्षें सक्तमजुरी आणि पांडेची दुसरी बायको राजीपती हिला १ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली. आरोपींनीं पुढे अपील केलें आणि अपिलांत संशयाचा फायदा देऊन सर्वांना निर्दोष म्हणून मुक्तता झाली.

— अखेर इतक्या यातायातीनें राणी देवीचा लाडका बाळ तिला परत मिळाला. जणूं तिचे प्राणच तिला परत मिळालें. पाण्यापेक्षां रक्त घट्ट असतें अशी एक इंग्रजींत म्हण आहे. तिची यथार्थ प्रचीती या जोडप्याएवढी दुसऱ्या कुणाला कधींच आली नसेल.

• • •

## साहित्य

### अभिनंदन

दीपावलीचे एक व्यासंगी लेखक श्री. ग. त्र्यं. देशपांडे यांच्या 'भारतीय साहित्यशास्त्र'या ग्रंथाला साहित्य अकादमीतर्फे प्रादेशिक भाषेंतील सर्वोत्कृष्ट पुस्तक म्हणून पांच हजारांचे पारितोषिक मिळालें याबद्दल श्री. देशपांडे यांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. श्री. देशपांडे यांचा जुन्या संस्कृत वाङ्मयाचा व्यासंग किती परिपूर्ण आहे याची ओळख दीपावलीच्या वाचकांना वेगळी करून द्यावयाला नको. मुंबई पुण्यासारख्या ठिकाणापासून दूरच्या गांवीं राहून कोणत्याहि पक्षोपक्षांत सामील न होतां प्रसिद्धीचे आणि प्रशंसेचे सर्व मार्ग कटाक्षानें टाळून देशपांडे यांनीं जी अविरत साहित्यसेवा आणि व्यासंग चालविला त्याचें निदर्शक म्हणजे त्यांचा उपरोक्त ग्रंथ. श्री. देशपांडे यांच्या हातून उत्तरोत्तर अशीच वाङ्मयसेवा घडो अशी अपेक्षा व्यक्त करून मी पुनश्च त्याचें अभिनंदन करतो.

मराठीचे एक व्यासंगी आणि चिकित्सक प्राध्यापक श्री. वा. ल. कुळकर्णी यांची मराठवाडा विद्यापीठांत मराठी भाषाभ्यास विभागाचे प्रमुख म्हणून नेमणूक झाली याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन. विल्सन हायस्कूलमध्यें शिक्षकाच्या पेशांत असतांनाच श्री. कुळकर्णी यांची वाङ्मयनिष्ठा आणि स्वतंत्र मतप्रतिपादन शैली तत्कालीन जाणकारांच्या नजरेस येऊं लागली होती. पुढें विल्सन कॉलेजमध्यें मराठीचे लेक्चरर म्हणून नेमणूक झाल्यावर वामनरावांच्या वाङ्मयीन गुणांना नवें कार्यक्षेत्र मिळालें आणि त्या संधीचा योग्य तो फायदा घेऊन एक चोखंदळ आणि रसिक समीक्षक हा दर्जा त्यांनी प्राप्त करून घेतला. नववाङ्मयाचे पुरस्कर्ते आणि कठोर विवेचक या दोन्ही अवघड कामगिऱ्या वामनरावांनीं समीक्षाक्षेत्रांत पार पाडल्या. नियतकालिक फुटकळ लिखाणाचे त्यांचे कांहीं वाङ्मयीन समीक्षात्मक संग्रह प्रसिद्ध झालें असले तरी मराठी समीक्षा वाङ्मयांत नवी मोलाची भर टाकील असें पूरेपूर स्वतंत्र आणि भरीव लिखाण अद्यापि त्यांच्या हातून झालेलें नाहीं. आणि त्यादृष्टीनें या नव्या जबाबदारींतहि त्यांना अशा ग्रंथोत्पत्तीला भरपूर वेळ मिळेल अशी अपेक्षा आहे. आणि म्हणून मुंबईपासून ते दूर जात असले तरी त्यांची वाङ्मयीन मतें तितकींच पुरोगामी आणि धडाडीची राहातील अशीच सर्वांची अपेक्षा.

### ग. दि. माडगूळकर आणि नवसाहित्य

बडोद्याच्या मराठी वाङ्मय परिषदेचें वार्षिक व्यासपीठ गेलीं दोन तीन वर्षें नवसाहित्याच्या विरोधी घोषणांनीं गर्जू लागलें आहे. श्री. पु. ल. देशपांडे, पु. भा. भावे यांच्या मागोमाग महाराष्ट्रांतील नामवंत कवि, उत्कृष्ट लघुकथा लेखक, ख्यातनाम चित्रपटकथा लेखक या त्रिविध नात्यांनीं सुपरिचित असलेल्या श्री. ग. दि. माडगुळकरांसारख्या सौजन्यशील साहित्यिकानें वाङ्मयपरिषदेच्या २३ व्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना नवसाहित्यावर आणि नवसाहित्य प्रचारकांवर कडाडून हल्ला चढविला आहे. ते म्हणतात, "नवसाहित्य नांवाची जी वस्तु या काळांत आपल्या वाङ्मयांत पिकली आहे तिच्या मुळाशीं जळालेल्या मूल्यांचें खत अभाविकपणें पडलें आहे. आजचें वाङ्मय वैफल्याची वांझोटी गाणीं गाणारें अनीतीच्या कथा अट्टाहासानें ऐकवणारें, आणि अर्धं वोचडी अभिव्यक्ति अट्टाहासानें लादणारें मराठीचे माथेफिरू पोर आहे असें मला वाटतें." माडगूळकर पुढें कडाडून म्हणतात—"नव्यांत कांहीहि चांगलें असलें तर त्यानेंहि मी भारूनच जाणार. रत्न जुनें काय नवें काय पारख्याला त्याचे रत्नत्व प्रतीत होणारच. मला सांगायचें आहे तें हें कीं असें रत्नत्व या नवसाहित्यांत अभावानेंच आहे...नव्याकडे झेपावणें हा माणसाच्या उपजत कल आहे. त्यांत संधिसाधु टीकाकारांनीं या नवीन साहित्याची तळी उचलली आणि भंडारा उधळून एळकोट गाजविला. युगप्रवर्तक जन्माला आल्याचा डांगोरा पिटला, आरोळ्या ठोकल्या. टीकांचेहि नवीन शास्त्र निर्माण केलें. नवी परिभाषा निर्माण केली. त्यांचेच उमेदवार त्यांचेच परीक्षक आणि त्या परीक्षकांनींच यांना देऊन टाकलेलीं प्रशस्ती पत्रकें असा खेळ सुरू झाला." ते पुढें म्हणतात—"नवकवींनीं गद्याला पद्याच्या घरांत घातलें हें त्यांचें कर्तृत्व. हे हातपाय मोडके गद्य म्हणजे युगप्रवर्तक कविता आहे असा 'बादपणाचा डांगोरा, कांहीं आत्मनेखोर नियतकालीकांनी पिटला आणि नवकवि फोफावले"

मराठींतील नवसाहित्यावर माडगूळकरांनी चढविलेला हल्ला आवेशयुक्त असला तरी संपूर्ण समर्पक आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. नवसाहित्यांत रत्नत्वाचा अभाव आहे. असेंहि एक अतिरेकी विधान त्यांनी केलें आहे. वास्तविक पाहातां १९४७ सालीं मर्ढेकरांच्या उदयानंतर आज एका तपांत टीका प्रतिटीकांचा फार मोठा धुरळा उडाला तरी नवसाहित्याची विशेषतः नवकाव्याची निर्मिति न थांबतां—आतां नववाङ्मय हें मराठींत पूर्ण स्थिर झालें आहे असें म्हणावें लागेल. मराठी वाचकाला नववाङ्मयांतील नवकवितेंतील बराचसा ग्राह्य भाग मानवला आहे. विशेषतः विरोधी टीकाकारांचा जागता पाहारा आणि हलकल्लोळ चालू असतां एका अविरत निष्ठेनें आणि प्रामाणिकपणानें स्वतःची कांहीं वाङ्मयीन मूल्यें निश्चित करून नववाङ्मयकार आज गेली बारा वर्षें लिहित आहेत. तेव्हां त्यांच्या हेतूंच्या शुद्धाशुद्धतेबाबत शंका प्रदर्शित न करतां अगर एका ठराविक ठशाची लोकप्रिय टीका न करतां या नववाङ्मयांत 'रत्नत्वाचा अभाव' कसा आहे, सोनें सोनें म्हणून जें म्हणतात तें पितळ कसें आहे हे या नवसाहित्याच्या 'टीकांचें नवें शास्त्र' न वापरतां जुन्या टीकाशास्त्राच्या नियमावर घासून अशा वाङ्मयाचें खरें स्वरूप मांडण्याचे आवाहन माडगूळकरानीं स्वपक्षीयांना करावयास हवें होतें. कारण माडगूळकरांनीं ज्या प्रकारची टीका नववाङ्मयावर केली आहे त्यात नावीन्य असें कांहीं नाहीं. जें अनेकवेळा पूर्वी अनेकांनीं सांगितलें तेंच माडगूळकरानीं फार चांगल्या लालित्यपूर्ण ठसकेदारपणें सांगितलें. कदाचित् या माडगूळकरांच्या टीकेंतहि 'रत्नत्व अभावानेंच' आहे असा प्रतिहल्ला नवसाहित्यिकांकडून होण्याचा संभव आहे.

चित्रपटकथेला साहित्याच्या दरवाजानें प्रवेश करूं द्या अशी माडगूळकरांची मागणी तूर्त मान्य होणासारखी नाहीं. साहित्य हें वाचलें जातें. नाटक पाहिलें गेलें तरी तें छापलें जातें. प्रयोगाशिवायहि मुद्रित नाट्यकृतीला एक स्वतंत्र साहित्यकृति म्हणून अस्तित्व आहे,






अनुक्रमणिका

अशा या नाट्यकृति पदवी परीक्षेला अभ्यासाला लागतात. इंग्रजी नाटकें पाहाण्याचा योग आपल्याला फारसा येत नाहीं पण त्या कृति वाचून आपण त्यांतील आनंद उपभोगूं शकतो आणि जोपर्यंत आमच्या चित्रपटकथा अगर Filmplays पुस्तकरूपांत प्रसिद्ध होत नाहींत तोपर्यंत त्यांना वाङ्मयीन प्रतिष्ठा लाभणें शक्यच नाहीं. लालित्य हा नाट्याचा आत्माच आहे. पण एखाद्या सरस चित्रपटांत वाङ्मयीन गुणांचा अभाव असला तरी नटनटी दिग्दर्शन, उत्तम छायालेखन, उत्तम पार्श्वसंगीत, गोड संगीत यांच्या जोरावर सुमार चित्रकथा सुद्धां अमाप, लोकप्रियता मिळवते. मात्र सुमार नाटक कितीहि लोकप्रिय झालें तरी त्यामुळें त्याचा वाङ्मयीन दर्जा उंचावतो असें नाहीं.

मात्र या प्रसंगीं एक गोष्ट नमूद केली पाहिजे. मराठी चित्रपटकथांना आणि संवादांना वाङ्मयीन मूल्य आणण्याचें फार मोठें कार्य प्रथम माडगूळकरांनींच केलें आहे. आणि त्यामुळें त्यांच्या चित्रकथांचा संग्रह एखाद्या चोखंदळ प्रकाशकानें छापल्यास मराठी वाङ्मयांत खऱ्या अर्थानें अपूर्व अशी भर पडेल यांत शंकाच नाहीं.

—पिनाकी

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### योग्य दखल

चित्रकलेच्या क्षेत्रांतील गेल्या नोव्हेंबर महिन्यातील एक अत्यंत महत्वाची घटना म्हणजे कोल्हापूरच्या 'कलानिकेतन' या संस्थेतर्फे भरलेली 'चित्रकला शिक्षण परिषद, या परिषदेसाठीं महाराष्ट्रांतील बहुतेक भागांतून प्रतिनिधि आले होते. या प्रदर्शनाचें अध्यक्षपद प्रथितयश चित्रकार श्री. माधव सातवळेकर यांनी भूषविलें होतें. एक चांगले शिक्षक म्हणूनही माधवरावांनीं यश मिळविलें असल्याकारणानें चित्रकला शिक्षकांच्या जीवनांतील अडि अडचणींची माधवरावांना चांगली माहिती आहे.

गेल्या २ डिसेंबरला हायस्कूल मधील चित्रकला शिक्षकांची जी नवी वेतनश्रेणी प्रसिद्ध झालेली आहे तिच्या तुलनेच्या मानानें तृतीय श्रेणीच्या एखाद्या कारकुनापेक्षा देखील चित्रकला शिक्षकांचा पगार कमी ठरतो. या परिषदेंत या गोष्टीची दखल घेण्यांत येऊन तीव्र नापसंती दर्शविणारा ठराव पास करण्यांत आला.

माधवरावांनीं आपल्या भाषणांत चित्रकारांच्या अनेक अडी अडचणींच्या गोष्टींचा आढावा घेऊन चित्रकला विषयक शिक्षणाबाबत ते म्हणाले "विद्यार्थ्यांना कला शिक्षणाचा मुख्य पाया शुद्ध पद्धतीने तयार करणें हें पहिलें कर्तव्य आहे, पायाभूत शिक्षण पुरें झाल्यावर मगच विद्यार्थ्याने आपल्या स्वभाव प्रकृतिप्रमाणें विवक्षित पद्धत शोधून काढावी!" नव्या विद्यार्थ्यांनी माधवरावांचा हा उपदेश लक्षांत ठेवला पाहिजे.

कांहीं उत्तमोत्तम आणि उपयुक्त असे ठराव परिषदेनें पास केले त्यांतला तिसरा ठराव लक्षवेधक आहे. आणि तो असा "चित्रकलेला उपयुक्त अशा वस्तूंचे कारखाने सुरू करण्याची योजना सरकारनें सत्वर हातीं घ्यावी, तोंपर्यंत त्याच्या आयातीवरील कर व बंधनें ढिलीं करावी." गेल्या एप्रिलमध्यें दीपावलीनें हा विषय आवर्जून आणि ठळकपणें मांडला होता; परंतु अशा विषयाकडे पाहाण्याची किंवा वाचण्याची चित्रकारानां संवय नसल्यामुळें कुणाचेंही लक्ष त्याकडे गेलें नाहीं! दुर्दैव! चित्रकलेच्या रसग्रहणासंबंधीं, तंत्रासंबंधीं व चित्रकला प्रांगणांतील इतर विषयांची माहिती देणारें एक नियतकालिक परिषदेमार्फत सुरू करावें असाही एक ठराव पास करण्यांत आला. उत्तर हिंदुस्थानांत विशेषतः बनारस येथें अशा विषयाला वाहिलेली दोन तिन मासिकें निघतात आणि उत्तर हिंदुस्थानांतले बहुतेक नामवंत चित्रकार आपापलीं मतें त्यांत मांडत असतात.

आपल्याकडील 'बॉम्बे आर्टसोसायटी किंवा' आर्ट सोसायटी ऑफ इंडिया' या संस्था वार्षिक प्रदर्शनाचा कॅटलॉग काढण्यापलीकडे दुसरें कांहीं करीत नाहींत हें भूषणास्पद (!) आहे! असो.

### नवकलेचीं विस्तारलेलीं क्षितिजें

चित्रकलेंतले नवे नवे आविर्भाव दुर्बोध असून, सामान्य माणसाला त्यांत कांहीं समजत नाहीं. (हीं सामान्य माणसें कोण हें अजून ठरायचें आहे.) असा आक्षेप वारंवार घेतला जातो; परंतु नव्या पिढीनें हाताळलेल्या या कलाविष्काराच्या मार्गाची लांबी रुंदी, दिवसें दिवस वाढत आहे. प्रदर्शनाची प्रतिवर्षी वाढणारी संख्या, तीं पाहाणाऱ्या प्रेक्षकांची संख्या आणि चित्रांचा मर्यादेच्या बाहेर होणारा खप पाहून डोळे दिपून जातात. येथील 'जहांगिर आर्ट गॅलरी' मध्यें गेल्या एक जानेवारी १९५९ पासून पुन्हां जानेवारी ६० पर्यंतच्या एका वर्षांत जवळ जवळ ५६ प्रदर्शनें भरलीं. गेल्या वर्षाची संख्या ६७ च्या आसपास होती. एक हाती प्रदर्शनाची संख्या अर्थात्च अधिक आहे हें सांगणे नकोच. कांहीं कांहीं प्रदर्शनांत दोन-तीन हजारांपासून आठ-नऊ हजार रुपयांपर्यंत चित्रांची विक्री झालेली पाहून तर महदाश्चर्य वाटतें. कारण विकल्या गेलेल्या चित्रांत पंचाहत्तर टक्के चित्रें नवचित्रकारांचीं होतीं आणि ती मुळींच सुबोध नव्हतीं. 'नवी कला' बहुजन समाजाला कळत नाहीं, म्हणून वारंवार हाकाटी करणाऱ्या टीकाकारानां हें एक प्रकारचें आव्हानच आहे.

### कांहीं प्रदर्शनें

नोव्हेंबर महिन्यांत भरलेलें 'शांति दवे' या बडोद्याच्या सांप्रदायांतील नवोदित चित्रकाराचें प्रदर्शन त्यानें केलेल्या अनेक वल्गन्या-मुळें लक्षवेधक झालें होतें. त्यानें हाताळलेल्या पद्धती, कला शास्त्राच्या रूढपद्धतीच्या अगदीं विरूद्ध होत्या. सिमेंटच्या जागीं सिमेंट, रेतीच्या जागीं रेती,' कदाचित् शेणाच्या जागीं शेणसुद्धां लावून त्यानें वास्तवतेची कमाल मर्यादा गांठली होती म्हटलें तरी चालेल. कांहीं वृत्तपत्रानीं त्याचा उदो उदो केला. आमच्या दृष्टीनें त्याचें तें प्रदर्शन म्हणजे हस्तकलेचा एक उत्कृष्ठ नमुना होता.

श्री. रायबा हेही एक-वेगळया आणि वैशिष्ट्यपूर्ण शैलीनें प्रथितयश ठरलेले चित्रकार. या वर्षीचें त्यांचें प्रदर्शन पाहून एके काळीं सांप्रदाय सोडून कांहीं तरी वेगळें करणारे रायबांतले 'रायबा' आतां त्यानां सोडून गेले कीं काय अशी शंका आल्याशिवाय राहिली नाहीं.

तिसरें प्रदर्शन बेंद्रे यांचें. आपल्या गुणामुळें आपला असा वेगळा सांप्रदाय निर्माण करणारे चित्रकलेंतले वेदग्कार बेन्द्रे, त्यांचें प्रदर्शन पाहून भुताटकीने भारून गेल्यासारखे वाटले. चीन जपानचा प्रवास त्याना बाधलेला दिसला.

अनुक्रमणिका






बाकी एवढें मात्र खरें कीं निर्गुण, निराकारी, पूर्ण ब्रह्माची ओळख त्यांना आतां होऊं लागलेली आहे. ही ओळख त्यांना पूर्णपणें पटली कीं, पुढच्या वर्षी कदाचित् याहून वेगळें म्हणजे रंगफलकावर ओढलेला एकच एक फटकारा किंवा त्याच्याही पल्याड जुनतेच कोरे रंगफलक पाहूनही आम्हाला आश्चर्य वाटणार नाहीं. कारण तें प्रदर्शन सांप्रदाय निर्माण करणाऱ्या केन्द्रें यींचें म्हणूनच आम्हीं पाहाणार !

यीं वर्षी प्रदर्शनाची संख्या कदाचित् शंभरांच्या आसपास जाईल. चित्रकलेची ही विराट प्रगति कलाप्रेमी माणसाला थक्क करते. मन अस्वस्थ होतें तें एकाच कारणामुळें, मुंबईत भरणारी मुंबईची अशी खास प्रदर्शनें भारतीय वाटत नाहीं. इतर देशांतलीं सर्व प्रदर्शनें त्या त्या देशांची वैशिष्ट्यें सांगतात. महाराष्ट्रीय केन्द्रयांच्या एखाद्या तरी चित्रांत महाराष्ट्राचा खास नसला तरी निदान–अगदीं नव्या म.ध्यमानें कां होईना—भारतीय संस्कृतीचा आत्मा दिसावा, एवढेंच !

**संगीत क्षेत्रांतील अजब घटना**

'कुमार पोहोणकर' हें संगीत प्रांतातलें एक महदाश्चर्य म्हटलें तरी चालेल. गेल्या नोव्हेंबरमध्यें पुणें येथें साजऱ्या झालेल्या 'सवाई गंधर्वां' च्या पुण्यतिथी निमित्त हा ११ वर्षांचा मुलगा गायला, त्यानें गायलेला 'यमन' राग आणि मैफलीला आणलेला रंग पाहून मीं मीं म्हणणारे गायक थक्क झाले. आणि पुनर्जन्मावर विश्वास वसूं लागला. 'हा शापभ्रष्ट गंधर्व आहे' असें कित्येकांनी म्हटलें, तर एका सुप्रसिद्ध गायिकेने त्याच्या नंतर गाण्याचें नाकारलें. त्याच्या सुराचा लगाव त्याची लयकारी, तनाईत आणि ढंग पाहून याची आणि एका तयार गवयाची जुगल बंदी ठेवावी असेंही कित्येकांनी बोलून दाखवलें. त्याला लाभलेली ही ईश्वरी देन सलामभूत व्हावी हीच सदीच्छा !

— गोपालन्

## शास्त्रकारण

**नोबेल पारितोषिकें:—**

यंदाच्या नोबेल पारितोषकांच्या वितरण समारंभात चार अमेरिकन शास्त्रज्ञ मानाच्या मुजऱ्याला हजर राहाणार आहेत. आतापर्यंत एकूण ७४ अमेरिकन लोकांना नोबेल पारितोषकें मिळालीं आहेत. त्यापैकीं ५७ पारितोषकें शास्त्रज्ञांना मिळाली आहेत. त्या पारितोषकांचा गेल्या वीस वर्षांतील इतिहास पाहिल्यास अमेरिकन शास्त्रज्ञ हळुहळू आघाडीवर येत असल्याचें दिसून येईल. इ. स. १९४९ मध्यें जर्मनी ह्या बाबतींत आघाडीवर होती. त्यावेळेपर्यंत ३७ जर्मन शास्त्रज्ञ नोबेल पारितोषक विजेते होते तर २८ अमेरिकन शास्त्रज्ञांना तो मान त्यावेळीं दिला गेला होता. ब्रिटन व फ्रान्स ह्या देशांतील शास्त्रज्ञांनाहि वेळोवेळीं ही पारितोषकें मिळाली आहेत. रशिया मात्र अजून मागे पडला आहे.

**शतायुषी ग्रंथः—**

"Origin of species ह्या ग्रंथाच्या प्रकाशनास शंभर वर्षे झाली म्हणून अमेरिकेतील चिकागो विद्यापिठानें एक समारंभ घडवून आणला. त्यावेळीं झालेल्या परिसंवादात नोबेल पारितोषक विजेते प्रा. मुल्लर ह्यांनी एक नवाच खळबळजनक विचार मांडला. प्रा. मुल्लर त्यांच्या प्रबंधाप्रमाणें "मानवाला आपला भावी विकास नियंत्रित करता येईल. त्यासाठीं भावी पिढ्यांची निर्मिती कशी असावी हे प्रथम ठरवावे लागेल." प्रा. मुल्लर यांनी त्या करिता एक उपाय सुचविला आहे. ते म्हणतात कीं, "ह्या पुढील गर्भधारणा कृत्रिम असाव्यात कारण त्यामुळें उत्तमोत्तम गुण असलेल्या व्यक्तींमधील जनन बीजें एकत्र आणता येतील व पर्यायानें नवी संतती ही जास्त सकस निवेल"

शास्त्रज्ञांच्या दृष्टीनें हा प्रकार अगदीं योग्य आहे. परंतु सर्वसामान्य लोकांना हा प्रकार पटणार नाहीं. कारण आपल्याला होणारे मूल आपले नसून दुसऱ्याच्या बीजाचे आहे असे समजल्यावर कोणत्याच पुरुषाला वा त्याच्या पत्नीला त्या बालकाबद्दल वात्सल्य वाटणार नाहीं. आणि हें आजवर होत आलेल्या संस्कारांमुळें वाटणार नाहीं. मुल्लर ह्यांच्या मताप्रमाणें खरोखरीच प्रयोग करावयाचे म्हटल्यास साऱ्या समाजव्यवस्थेचा नाश होईल लग्नसंस्थाच नष्ट होईल. एवढा कठीण विचार लोकांच्या गळीं उतरविणें फारच त्रासाचें आहे.

**अंतरिक्षांत—**

मनुष्याची झेप अंतरिक्षात जशी वाढूं लागली तशी त्याची कल्पनाही वाढूं लागली. सूर्यमालेप्रमाणें आकाश गंगेत अनेक माला आहेत. ह्या मालांमध्यें सहाजिकच पृथ्वीसारखे सजीवांची वस्ती असलेले ग्रह असणेहि संभवते. अशाच ग्रहावरून कांहीं संदेश येतात काय हे पाहाण्यासाठीं अमेरिकेतील शास्त्रज्ञांनीं खूप उंच प्रातंतू उभारले आहेत. हे संदेश खरोखरीच मिळाल्यास मानवाला आपल्या क्षुद्रत्वाची पुन्हा आठवण होईल. सध्या चाललेल्या अंतरिक्षांतील भ्रमणांमुळें मानवाला आपण आणि पृथ्वी किती लहान आहोत ह्याची कल्पना येऊं लागली आहे. त्यांत अशा प्रकारच्या संदेशांनी भरच पडेल. प्रथम फक्त १२ प्रकाश वर्षे अंतरावर असलेल्या ग्रहांकडून संदेश मिळविण्याचा प्रयत्न होणार आहे.

— सोविर

• • •



वेल् कौर्




## एका बंडखोर आत्म्याची कहाणी
—श्रीकृष्ण ठाकूर

## आणखी कांहीं म्हातारे
—ल. ग. जोग

## गांवकरी फड
—मधु कर्णिक

एका बंडखोर आत्म्याची कहाणी—

### फ कि रा

( ले० -अण्णाभाऊ साठे )

राणोजीनें जोगिणीची वाटी पळवून गांवासाठीं आत्मसमर्पण केलें आणि याच देवीच्या वाटीच्या रक्षणासाठीं फकिरानें ग्रामसंस्थेचे आधारस्तंभ असलेल्या बापू खोताविरुद्ध व त्याचा बचाव करूं पहाणाऱ्या इंग्रजी सत्तेच्या तापल्या बंदुकीविरुद्ध जें बंड केलें त्याची रोमहर्षक कहाणी या कादंबरींत अण्णाभाऊनीं चित्रीत केली आहे. मांग-अस्पृश्य समाज हा कैक शतकें पायीं तुडविला गेला आहे. सामाजिक व राजकीय दुःखांची कडू चव या समाजानें चाखलेली आहे. याची परंपरा शोधायला फार फार मागें जावें लागेल. परंतु इतके सायास नको असले तरी महात्मा ज्योतिबा फुल्यांपासून तो तहत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांपर्यंतच्या या समाजाच्या चालीचा मागोवा घेतला तरी आपणांस कळून येतें कीं हा समाज फसवणूक व सामाजिक नाडणूकीनें किती गांजला आहे. त्याचाच परिपाक म्हणजे हा "फकिरा"

या कादंबरीतील व्यक्तिरेखा मोठ्या रेखीव आहेत. विष्णुपंत कुळकर्णी, राधा, राणोजी, फकिरा या साऱ्या व्यक्तींच्या कर्तृत्वांमधून निरनिराळेपणा जाणवतो. विष्णुपंतांची करारी व प्रखर बुद्धिमत्ता, राधेचं मातृवात्सल्य, आणि राणोजी म्हणजे साक्षात् विद्युल्लता. या विद्युल्लतेचा वारसा घेऊन फकिरा जन्माला आला. या साऱ्या व्यक्तींच्या कर्तृत्वांत निराळेपणा असूनहि एकात्मता आहे. ही सारीं माणसं जीवनांतील प्रखर संघर्षात कमी अधिक प्रमाणांत झगडत असतात.

अण्णाभाऊंची कथनशैली मोठी रसाळ आहे. एकामागून एक प्रसंगांची मालिका गुंफून त्यांनीं वाचकांना भारावून टाकलें आहे. नुसताच चित्तवेधकपणा आहे असं नव्हे तर त्यांत जिवंतपणा आहे. दलित जीवनाचे विविध पैलू-निरनिराळ्या समस्या आत्मीयतेनें हाताळलेल्या आहेत.

अण्णाभाऊंची निसर्गवर्णनं जितकीं जिवंत आहेत तितकेंच त्यांचे मानवी स्वभावाचे बारकावे दाखविण्याचें कौशल्य कौतुकास्पद आहे.

फकिराच्या रूपानें लेखकानें एक प्रखर सामाजिक व्यक्तिचित्र निर्माण केलें आहे हे निर्विवाद.

—श्रीकृष्ण ठाकूर

• • •

आणखी कांहीं म्हातारे—

### पांढरे केस हिरवीं मनें

( ले० विठ्ठलराव घाटे )

अलीकडे मराठींत प्रसिद्ध होत असलेल्या ललित साहित्यांत अगदीं वेगळेपण धारण करून आलेला हा छोटासा व्यक्तिचित्रणात्मक ग्रंथ होय. ही कादंबरी नव्हे; पण यांतल्या व्यक्तीना कादंबरींतल्या व्यक्तींचा रेखीवपणा आला आहे. ह्या कथा नव्हेत; पण ह्या व्यक्तिचित्रांची पार्श्वभूमी दर्जेदार कथांची आहे. नाटक नाहीं ( एक स्मशान नाट्य आहे. पण त्यांत नाट्य मुळींच नाहीं. ) परंतु नाट्यमय प्रसंगांनीं पूर्ण भरलेलें असें हें सुंदर पुस्तक आहे. 'कांहीं म्हातारे व एक म्हातारी' च्या कर्त्याचें हें पुस्तक आहे. हें सहजगत्या जाणवतें. त्याचप्रमाणें रविकिरणमंडळाच्या परंपरेंतील रसिकतेची जाणीव करून देणारा 'रे धुंदींतच जगणें मरणें' हा काव्यमय लेख पुस्तकांत आढळतो. ललित वाङ्मयाच्या कोणत्याच साचेबंद प्रकारांत न मोडणारा हा ग्रंथ साऱ्या ललित वाङ्मयाची पदोपदीं जाणीव करून देतो.

तसें पाहिलें तर यांत साऱ्या आढळतात व्यक्ती! निसर्गानुसार एकदां तरुण असणाऱ्यानी त्याच निसर्गक्रमानुसार वृद्ध झालेल्या. त्या वृद्ध आहेत पण जर्जर मात्र नाहींत. जिद्दीनें दारू सोडणारे आप्पा; वृद्धत्वाकडे झुकलेल्या 'आईचे' प्रेम (पण प्रकरण नव्हे) हिंदवी स्वतंत्र्याच्या आकांक्षा जागणारा हिंदुस्थानलाच घर मानणारा 'मार्शल;' अंगात आल्याचें नाटक करणारे 'श्रीपतमामा' साऱ्या वृद्धांची हीं व्यक्तिचित्रें संस्मरणीय ठरतील. ह्या प्रत्येक व्यक्तीला कणखर मत आहे. झुंज देणारं मन आहे. आणि विशेष म्हणजे असल्या कणखरपणांत नसणारी मानवता अमाप आहे. ही खरी माणसं आहेत कारण त्यांच्यांत गुणदोषांचं मिश्रण आहे. आणि हें गुणदोषांचे मिश्रण श्री घाटे यांनीं कमालीच्या हळुवारपणानें पण तितक्याच पूर्णतेनें केलें आहे. ह्या वृद्धांसमवेत कांहीं तरुणांच्या स्मृतीहि रंगविल्या गेल्या आहेत. केस पांढरे दिसतात; पण स्मृति अस्पष्ट क्षीण झाल्यावर तीव्रतेनें जाणवतात. ग्वाल्हेरच्या महाराजांनीं ठाकोरांच्या 'गुहेंत' केलेला प्रवेश, अशाच तारुण्याचें आक्रमक साहसी चित्र होय. ह्या व्यक्तिचित्रांच्या संग्रहांत अशी विविधता आढळते—पण विविधतेबरोबरच एक मोठी निराशा पदरीं पडते. विविधता संपते आणि एकसुरीपणा येऊं लागतो. साऱ्या म्हाताऱ्यांत एकसुरीपणा दोन कारणांनीं आला आहे. विठ्ठलरावांच्या लेखनशैलीच्या कांहीं मर्यादा आहेत. त्या मर्यादेला शब्दांची सीमा आहे. एकसुरी लेखनानें व्यक्तिचित्रांना 'एकसुरी' पणा आला आहे. दुसरें कारण असें कीं 'भाई' 'झुंगळीचोर' 'गुजरातचे महाराज' हीं सारीं व्यक्तिचित्रें एकाच भर्तीचीं उतरलीं

( पान ५८ वर पुढें चालू )

केव्हां केव्हां माणसाच्या आयुष्यांत असे प्रसंग घडतात कीं, त्या छोट्या प्रसंगानें त्याच्या साऱ्या आयुष्याला कलाटणी मिळते. थोर व्यक्तींच्या चरित्रांतील असले हे प्रसंग नेहमीं व मनोरंजक आणि उद्बोधक असतात. त्यामुळें या सदरांत दर खेपेला आम्ही आपल्याला निरनिराळ्या व्यक्तींच्या आयुष्यांतील अशा वरून दिसायला क्षुद्र पण अत्यंत महत्त्वाचे असे प्रसंग मुद्दाम वेंचून काढून सादर करणार आहोंत. दीपावलीच्या वाचकांच्या वाचनांत कुठेंहि अशा तऱ्हेचे प्रसंग आल्यास त्यांनी ते आमच्याकडे अवश्य पाठवावे. त्याला आम्ही या सदरांत योग्य ती प्रसिद्धि देऊं.

# तिथें घडला प्रसंग

* विनोबा भावे
* ऊ नू
* टायनबी

## खरी मिठाई

मी दहा वर्षांचा होईपर्यंत कोकणांतील एका खेडेगांवांत रहात असे आणि त्याचवेळीं माझे वडील कामानिमित्त बडोद्याला रहात असत. मात्र दर दिवाळीला ते न चुकतां घरीं येत असत.



एकदां माझी आई मला म्हणाली "आज तुझे वडील येणार आहेत आणि ते तुझ्यासाठीं खाऊ घेऊन येणार आहेत." त्या वेळीं मी अगदीं लहान होतों. नुकतीच कोठें अक्षर ओळख झाली होती.

आणि माझे वडील आले. मी त्यांच्याजवळ गेलों तेव्हां त्यानीं मला माझ्यासाठीं आणलेला खाऊ दिला. खाऊ म्हणजे लाडू, बर्फी, हलवा असं कांहींतरी असेल अशी माझी अपेक्षा होती. पण प्रत्यक्षांत पहातों तों काय! कागदांत गुंडाळलेलं चपट लांबट असं कांहींतरी होतं. काय बरं असावं हें? मी उत्सुकतेनें उघडून पाहिलं. काय होतं आंत?—दोन पुस्तकं! मी तीं उचललीं व आईकडे घेऊन गेलों. तीं पाहून आई म्हणाली "बाळ तुझ्या वडिलानीं तुझ्यासाठीं आज जी मिठाई आणिली आहे त्याहून श्रेष्ठ मिठाई दुसरी कोणतीच नाहीं." तीं पुस्तकं म्हणजे रामायण व महाभारतांतील गोष्टी होत्या.

ती पुस्तकं मी कितीतरी वेळ वाचलीं. आणि आईचं म्हणणं खरं असल्याचं पटूं लागलं. आजहि ती मिठाई मला अवीट गोड लागते.

— विनोबा भावे.

## अपूर्व टोपी

मी आठनऊ वर्षांचा असतानाची ही गोष्ट आहे. माझी आई दररोज देवळांत देव-दर्शनाला जात असे. आणि पुष्कळदां आई-बरोबर मी पण जात असे तो कांहीं देवावरील प्रेमामुळें नव्हे, तर देवळांतील पुजाऱ्याची



टोपी पहाण्यासाठीं. ती टोपी फार सुंदर होती आणि मला ती फारफार आवडायची. शेवटीं एक दिवशी मी आईला सांगितलं कीं मला तसली टोपी हवी म्हणून. पण आईनं माझं म्हणणं हंसण्यावारी नेलं. अखेर मी हट्टच धरला तेव्हां ती म्हणाली, "बाळ ती टोपी म्हणजे कांहीं अशी तशी गोष्ट नव्हे. आपल्या राष्ट्रांतील ती सर्वश्रेष्ठ टोपी आहे आणि सदाचरणानें वागणारालाच ती मिळते." आणि नंतर सदाचरण म्हणजे काय तें मला आईनें सांगितलें.

टोपीचा मोह मला कांहीं आवरत नव्हता तेव्हां गंभीरपणें मी आईला म्हणालों, "आई आजपासून सदाचरणानें वागण्याची मी प्रतिज्ञा करतों. सर्व प्राणिमात्रावर प्रेम करीन—इमान सोडणार नाहीं—खोटं वागणार नाहीं आणि अशा रीतीनें माझं चरित्र उज्वल करीन, पण तूं ती टोपी मला दे."

आई मनापासून हंसली व म्हणाली, "तर मग ती टोपी तुझ्या डोक्यावर आहेच कीं"

आईच्या बोलण्याचा अर्थ त्यावेळीं मला नीटसा कळला नाहीं. पण जसजसा मी मोठा होत गेलों तसतसा मला त्या बोलण्याचा अर्थ कळूं लागला.

ती अपूर्व टोपी डोक्यावर नीट ठेवण्याचा प्रयत्न मी आजतागायत इमानेइतबारें करीत आलों आहे.

—ऊ नू (बर्मी प्रधानमंत्री)

## मित भाषणी

माझे आजोबा पादरी होते व दिसण्या वागण्यांत धीरगंभीर होते. आवाज चढवून बोलतांना अगर कोणावर रागावतांना—खेकसतांना त्यांना कोणीच पाहिलं नव्हतं. आणि माझं वर्तन बरोबर याच्या उलट होतं. माझ्या अति बडबड्या स्वभावामुळें मला 'दुष्ट' ही उपाधी मिळाली होती. क्षणिक आवेशांत मी मागचापुढचा विचार न करतां वाटेल तें बोलत



असे. माझ्या बोलण्यानें कोणाला बरं वाटेल, कोणाला वाईट वाटेल याचा मी विचारच करीत नसे. मी माझी ही पद्धत सोडून द्यावी म्हणून आजोबांनीं मला किती वेळां सांगितलं असेल—आणि मींहि किती वेळां संकल्प केला असेल याला गणती नाहीं; पण प्रसंग येतांच माझी जीभ कांहीं माझ्या ताब्यांत रहात नसे.

आमच्या घरांत एक स्त्री नोकर होती. तिशीच्या आसपास तिचं वय होतं; आणि ती दिसायला कुरूप होती. मी तिला नेहमीं कुरूपतेवरून चिडवीत असे पण तरीहि तिचा माझ्यावर जीव होता. मला काय हवं-नको तें ती पहात असे. आणि रात्रीं झोपतांना मला गोष्टी सांगत असे. अशीच एके रात्रीं ती मला गोष्ट सांगत असतां म्हणाली "...आणि त्या

प्रमाणें राजकुमारीचं राजकुमाराशीं लग्न झालं त्याप्रमाणें प्रत्येक तरुणीचं कुणा ना कुणा तरुणाशीं लग्न लागत असतं—" हें ऐकतांच मी झटकन् तिला विचारलं " असं जर आहे तर तुझं अद्याप कुणाशी कसं लग्न झालं नाहीं! तूं तर केवढी मोठी झाली आहेस!" हें ऐकतांच ती गप्प बसली, तिचा चेहरा गंभीर झाला, डोळ्यांत पाणी तरारलं पण तिकडे फारसं लक्ष न देतां मी म्हणालों, " हं—साल माकडासारखं तुझं ध्यान आहे! कोणता मनुष्य तुझ्याशीं लग्न करणार!-हं!" हें ऐकतांच तोंड झांकून ती झटकन् बाजूला झाली व रडूं लागली. पण तरीहि मी शुद्धीवर आलों नाहीं. मी परत म्हटलं, " तुझ्यासारख्या माकडाशीं कोण लग्न करणार!" मी हें वाक्य परत म्हणतांच ती जोरजोरानें रडूं लागली. मी तेंच वाक्य परत म्हणतांच तिनं झटकन् मला विचारलं, " मग मी काय करूं!" आणि मग मागचा पुढचा विचार न करतां मी म्हटलं, "दुसरं काय करणार! नदींत जाऊन सरळ जीव देणं एवढाच मार्ग शिल्लक आहे." माझं हें वाक्य ऐकतांच ती तिथून शांतपणें बाजूला झाली.

दुसऱ्या दिवशीं तिचं प्रेत नदींत मिळालं. आमच्या घरांतील कुणाच्याच लक्षांत येईना कीं हिनं आत्महत्या कां करावी?

दिवसामागून दिवस लोटत होते पण माझ्या मनाला कांहीं शांती मिळेना. माझं मन मला सांगायचं कीं कुणासमोर तरी आपल्या पापाचा कबुलीजबाब दे. शेवटीं मी आजोबांकडे गेलों आणि घडलेली सर्व हकीगत त्यांना सांगितली. ती ऐकतांच ते तटस्थ झाले! कांहीं वेळ ध्यानस्थ राहिले—ईश्वराकडे त्यांनीं क्षमायाचना केली आणि आपल्या नेहमीच्या आवाजांत ते म्हणाले, " यासाठीं मी तुला नेहमीं सांगत असे कीं जें कांहीं बोलायचं असेल त्याचा प्रथम मनाशीं पूर्ण विचार कर. विचार केल्याशिवाय कांहींहि बोलूं नकोस. कारण एकदां तोंडातून निघालेला शब्द परत मागें घेतां येत नाहीं आणि त्याचा प्रहारहि इतर कोणत्याहि शस्त्रापेक्षां तीव्र असतो. ह्या बाईचीच गोष्ट पहा. तूं बोललास तें सहज, मजा करावी ह्या हेतूनें बोललास. पण तुझं उपहासाचं शस्त्र तिचं काळीज कापून गेलं. गरीब बिचारी...!"

त्याक्षणींच आजोबांच्या पायाला हात लावून मी प्रतिज्ञा केली कीं यापुढें आजोबासारखं मितभाषणी व्हायचं.

—टायनवी ( इतिहासकार )

( पान ५६ वरून चालू )

आहेत. सर्व्यांना 'कथारूप' आलें आहे हेंहि त्यांचें एक कारण असूं शकेल.

'आचार्योचें मृत्युपत्र' व 'एक सत् विप्रा बहुधा वदन्ति' या दोन लेखांची शैलीहि सारखी आहे. (पहिल्यामधला आचार्यांनीं आश्रमकन्येच्या स्तनाला स्पर्श करून बोट जाळून घेण्याचा प्रसंग फारच हृदयस्पर्शी आहे) आत्मचरित्राच्या धर्तीवर लिहिलेल्या ह्या दोनहि लेखांत जीवनांतल्या विविध प्रकारच्या रसिकतेची दोन चित्रें आढळतात. पहिल्यांत दंभाखालीं दडलेलें मन आहे तर दुसऱ्यांत सामाजिक कर्तव्याखालीं दबलेलें मन आहे. पहिलें अखेरपर्यंत दडपणांत राहून अखेर मोकळें होतें तर दुसरे स्वतःला ओळखणारें असल्यानें मुक्त आहे. 'एकं सत्...' हें लेखन आत्मपर लेखनाचा एक अप्रतिम नमुना आहे.

ह्या नव्या काळांत जुन्या भाषेंत बोलणें अप्रशस्त ठरतें खरें; पण 'पांढरे केंस हिरवीं मनें' ह्या ग्रंथांत मोह, भोग, त्याग, स्वार्थ, आनंद, दुःख, शौर्य ह्या साऱ्या भावनांचें मनोहारी दर्शन आढळतें. रविकिरण-मंडळाच्या काळांतल्या पिढीचें 'रसिक मन' 'भावस्पर्शी हळुवार मन' ह्या ग्रंथाच्या पाना-पानांतून आढळतें. 'आईचा कौल' मध्यें हें मन कारुण्याच्या भावनेंत भिजलें आहे. 'गुजरातचे महाराज' मध्यें तें भव्यतेपुढें नम्र झालें आहे. 'रे धुंदीतच जगणें मरणें' मध्यें त्याच मनाची व्याकुळ अवस्था जाणवते. ह्या ग्रंथाच्या भाववैचित्र्याप्रमाणेंच अनुभवांचीं विविध केंद्रेंहि लक्षांत येतात. गायक, राजे, महाराजे पुढारी, नातेवाईक, शिकारी सैनिक, भटक्या जमाती, आचार्य, कुत्र्यांचें व फुलांचे शौकिन अनेक थरांतले हें जीवन विशाल खरें...पण ती शैली, सुंदर खरी पण एकसुरी! ह्या सुंदर शैलीनेंच ह्या जीवनचित्रांचा एक सांचा बनवला. शैलींत जीवनाइतकें वैचित्र्य असतें तर!—

—ल. ग. जोग

गांवकरी फड

## वळीव

(ले०—शंकर पाटील)

मराठी वाचक आतां ग्रामीण कथेला साफ कंटाळले आहेत. कारण त्याच त्याच विषयाभोंवतीं आमचे ग्रामीण कथाकार सारखे फिरत आहेत. थंडीच्या रात्रीं शेकोटीभोंवतीं चार इकडच्या तिकडच्या गप्पा माराव्यात त्याप्रमाणें आमचे ग्रामीण कथाकार आमच्या वाचकांना अगदींच फालतू गोष्टी सांगून झुलवित आहेत. या सर्व मंडळींना गोष्ट सांगण्याची, खुलविण्याची कला चांगलीच साधली आहे. आणि नेमक्या या गुणानेंच आमची ग्रामीण कथा झांकळून गेली आहे. शंकर पाटील यांचा वळीव हा कथासंग्रह अनेक दृष्टीने या दोषांपासून अलिप्त असला तरी असल्या 'सरस्या कहाण्या' सांगण्याचा मोह त्यांनाहि आवरत नाहीं. या संग्रहांतील 'भान' भूल, रिपीशन, या सारख्या कथांत पाटलांना चटकदारपणांचा मोह आवरलेला नाहीं. 'शाळा' सारखी कथा म्हणजे एक सुरेख रेखाचित्र आहे. पण त्यांत नावीन्य नसल्यामुळें कथाकाराची करामत वांया गेली आहे.

या कथासंग्रहांत नांव घेण्यासारख्या कथा म्हणजे वळीव, शारी. विशेषतः वळीवला थोडासा कृत्रिमतेचा वास येतो. पण शारी, ही एक करुणरम्य कथा अंतःकरणाचा भेद घेते. पण असें आंतरिक सामर्थ्य असणारे पाटील कणव मध्यें थोडे घसरले आहेत. कणवची मध्यवर्ति कल्पना चांगली आहे. पण भट्टी नीट जमली नाहीं. 'नाटक' सारख्या कथा म्हणजे चावून चोथा झालेल्या प्रसंगावर पाटलांनीं चढवलेला नवा साज. तीच गत 'सूड' या कथेची झाली आहे.

एकूण शंकर पाटलांचा हा पहिलावहिला कथासंग्रह आगळा नसला तरी वैशिष्ट्यपूर्ण आहे. थोडासा अपेक्षाभंग करणारा असला तरी निराशाजनक नाहीं. जातिवंत आणि कसदार कथाकाराचीं पाऊलें या 'वळीव' मध्यें दिसतात हें नक्की. त्याच्या समग्र दर्शनाची वाचकांनीं वाट पाहावी.

—मधु कर्णिक

## साहित्य स्वीकार

१ **अंजली** (कथासं.) अंबादास अग्निहोत्री रु. ३-०-० (श्रीराम प्रकाशन, मुंबई)

२ **खुपणारं सुख** (कादं.) अंबादास अग्निहोत्री रु. ३-०-० (श्रीराम प्रकाशन मुंबई)

३ **वृंदा आणि इतर कथा** अंबादास अग्निहोत्री रु. ३-०-० (श्रीराम प्रकाशन)












# असें आहे हें आजकालचें क्रिकेट

इंग्रजांपासून आम्ही अनेक गोष्टी शिकलों. त्यांतल्या प्रमुख दोन ! एक म्हणजे इंग्रजी भाषा आणि दुसरी म्हणजे क्रिकेट.

अस्सल इंग्रज माणसानेहि ज्यांच्या भाषाशैलीचा हेवा करावा असे गोखले, म. गांधी, सरोजिनी नायडू, पं. नेहरू यांच्यासारखे भाषाप्रभु या देशांतच निर्माण झाले. त्याचप्रमाणें ज्यांच्याबद्दल "असा महान् खेळाडू पुनरपि निर्माण होणेंच शक्य नाहीं—तो खरोखरच होऊन गेला कीं काय ! अखेर तो म्हणजे एक मधुर स्वप्न होतें" असे उद्‌गार नेव्हिल कार्डस् सारख्या थोर समीक्षकानें काढावे असा क्रिकेट जादुगार रणजितसिंहजी या देशांत होऊन गेला.

दुलिप, सी. के. नायडू, अमरनाथ, विजयमर्चंट, विनूमंकड यांच्यासारख्या असामान्य क्रिकेटपटूंनीं जगांतील सर्व क्रिकेटशोकीनांच्या डोळ्यांचें पारणें फेडलें आहे—

असा ज्यांचा देदिप्यमान इतिहास त्यांना आतां 'गेले ते दिवस' म्हणून हळहळावें लागणार कीं काय अशी शंका वाटते पण क्रिकेटचें प्रेम आतां आमच्या इतकें रक्तांत भिनलें आहे कीं त्यामुळें एखादा रंगतदार सामना पाहात असतांना देश, धर्म सारें कांहीं विसरून जातिवंत खेळाडूंच्या पराक्रमाच्या गुणगानांत आम्ही गर्क होतो.

आणि म्हणूनच आमचे बलशाली ऑस्ट्रेलियन पाहुणे इथं आलेले असतांना त्यांच्या खेळाडूवृत्तीला हें दीपावलीचें नम्र अभिवादन म्हणजे हा छोटासा खास क्रिकेट विभाग—




— शां. शं. रेगे

करमणूक, मनोरंजन व आनंद हे कोणत्याहि खेळाचें मुख्य साध्य असलें पाहिजे. खेळाचें महत्व व उपयुक्तता त्यांतील व्यायाम, कला, शिस्त व प्रथा यावर अवलंबून असतात. क्रिकेटच्या खेळांत या सर्व प्रकारचें वैशिष्ट्य असल्यामुळें तो सर्व 'खेळांचा राजा' असें मानलें गेल्यास अतिशयोक्ति ठरणार नाहीं. क्रिकेटमध्यें शक्तीपेक्षां युक्तीला व कौशल्याला जास्त वाव आहे. या खेळांत सफाई व कौशल्य जसजसें वाढत गेलें तसतसें या खेळाला निव्वळ आरोग्यदायक अगर मैदानी खेळापेक्षां एक नवीन कलात्मक स्वरूप प्राप्त झालें. ओबड-धोबड पद्धतीनें कसेंतरी खेळणाऱ्या फलंदाजापेक्षां सुबक व डौलदार पद्धतीनें चमकून जाणाऱ्या खेळाडूचीच खरी किंमत जास्त ठरते. खेळांतल्या सामान्य गणल्या गेलेल्या हालचाली लयबद्ध झाल्यास त्या कलात्मक आणि प्रेक्षणीय ठरतात. खेळीचा शेवट कसाहि होवो, सामना अनिर्णित ठरला तरी त्याची तमा नसते पण एखादा क्रिकेटचा कलावंत सामन्यांत भाग घेऊन गेला तरी त्याची आठवण परतणाऱ्या प्रेक्षकांना जास्त आनंद देते. पांसष्ट वर्षांपूर्वी इंग्लंडमध्यें आपल्या उत्कृष्ट व कौशल्यपूर्ण खेळानें ज्या रणजीनें प्रेक्षकांचें भान हरपवलें त्याचे 'लेटकट' व 'लेगग्लान्स' हे अजूनहि अद्वितीय ठरले आहेत. ज्या ससेक्स परगण्याच्या तर्फे रणजी खेळत असे ती टीम इंग्लंडमध्यें अतिशय नांवाजलेली होती, असें असूनसुद्धां त्यांचे बहुतेक सामने अनिर्णितच राहिले होते. ब्रॅडमननें रणजीपेक्षां किती तरी अधिक धांवा काढल्या असतील अथवा जागतिक विक्रमहि प्रस्थापित केले असतील तरी पण कलेची सफाई अगर प्रेक्षणीयपणांत तो रणजीपेक्षां किती तरी खालच्या पट्टीचा गणला गेला आहे.

क्रिकेटच्या खेळाची सुरवात इंग्लंडमध्यें जरी झाली तरी तो अखिल ब्रिटिश साम्राज्यांत लोकप्रिय झाला. ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका, भारत, पाकिस्तान, वेस्ट इंडिज, सिलोन, केनया व फिजी या देशांत क्रिकेट आज फारच लोकप्रिय आहे. आणि ह्या देशांत ब्रिटिश साम्राज्याचें जूं झुगारून देण्याचे प्रयत्न होऊन सुद्धां ब्रिटिशांच्या ह्या लोकप्रिय वंशजानें तीं राज्यें सोडलीं नाहींत. उलटपक्षीं ह्या माजी वसाहतप्रदेशांत व इंग्लंडमध्यें हाच एक जणुं दुवा आज अबाधित राहिला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

अगदीं प्राथमिक अवस्थेंत हा खेळ झाडाच्या बुंध्याला उपयोगांत आणून खेळला जात असे व खेळासाठीं लागणारीं उपकरणें म्हणजे झाडाच्या तोडलेल्या खांदीची वाकडी काठी व एक गोलाकृति दगड. त्यावेळीं चेंडूफेक ही खालून म्हणजे भुईसपाट होत



अनुक्रमणिका

असल्यामुळें हॉकीस्टिकसारखी दिसणारी ही बॅट तो चेंडू फटकावण्यासाठीं उपयोगी ठरत असे. अशा तऱ्हेचा गांवठी वाटणारा हा खेळ सतराव्या शतकानंतर नागरी रूपांत अवतरला. १७२३ मध्यें फ्रेडरिक लुइस, प्रिन्स ऑफ वेल्स ह्यांनीं आपले दोस्त गोळा करून हा खेळ खेळण्याचा पायंडा घातला व अशातऱ्हेनें राजाश्रयानें ह्या खेळाला नागरी मान्यता मिळाली. दुर्दैवानें ह्या शोकिन राजपुत्राचा अंत मात्र क्रिकेटमुळेंच ओढवला. एका सामन्यांत चेंडू छाताडांत बसून मर्मस्थानीं दुखापत झाल्यामुळें जायबंदी झालेला हा राजपुत्र १७५१ सालीं एका नृत्यप्रसंगांत त्याच जागीं धक्का लागल्यामुळें मरण पावला. ह्या प्रसंगामुळें शोकिन लोकांनीं ह्या खेळाचा धसका घेतला.

हॅम्पशायर परगण्यांतल्या हॅम्बलेडन गांवीं क्रिकेटच्या खेळाला शिस्तप्रद स्वरूप प्राप्त झालें. काळ्या पाटलोणी व पांढरे गंजिफ्राक व त्रिकोणी टोप्या घालणारे हे खेळाडू अखिल ब्रिटिश संघाशीं सामना खेळून तुल्यबल ठरले. ह्या काळीं धांवांची गणति करण्यासाठीं वह्या न वापरतां झाडाच्या काठ्यांना धांवांच्या संख्येप्रमाणें वेळोवेळीं खांचा पाडल्या जात असत. हॅम्बलेडनच्या खेळांत उभे दोन खुंट व त्यावर आडवी विटी अशा तऱ्हेची यष्टि वापरली जात असे. सुरवातीस उपयोगांत आणलेल्या झाडापेक्षां ही नवीन पद्धत उपयुक्त असे. शिवाय हा खेळ रानांतून शहरांत आल्यामुळें अशा तऱ्हेची यष्टि निवडणेंहि भाग पडलें. ह्या यष्टीची उंची एक फूट असून दोन दांड्यामध्यें दोन फूटाचें अंतर असे. हें अंतर इतकें जास्त असण्याचें कारण गमतीदार वाटतें. ह्या दांड्यांमधल्या अंतरांत एक खड्डा असे व फलंदाजाला धांवचीत करण्यासाठीं यष्टिरक्षकाला चेंडू ह्या खड्ड्यांत टाकावा लागत असे. तसेंच खेळतांना व धांवा काढतांना फलंदाजाला आपली बॅट ह्या खड्ड्यास टेकवावी लागत असे. आणि म्हणूनच हें अंतर आवश्यक होतें.

यष्टिमध्यें तिसरी दांडी रोवण्याची प्रथा नंतर पडली आणि त्याला कारणहि तसेंच घडलें. ब्रिटिश क्रिकेटच्या जगांत सुप्रसिद्ध ठरलेले जॉन स्मॉल हे अठराव्या शतकांतले नाणावलेले फलंदाज होते. १७७७ सालीं हॅम्बलेडन क्लब व केंट यामध्यें सामना चालू होता. हॅम्बलेडन क्लबचा शेवटचा खेळाडू म्हणून जॉन स्मॉल खेळावयास आला. विरुद्ध बाजूनें लम्पी स्टीव्हन्स हा कुशल गोलंदाज चेंडूफेक करत होता. सामना जिंकण्यास फक्त चवदा धांवा कमी होत्या म्हणून केंटच्या स्टीव्हन्सनें स्मॉलला चित करण्यासाठीं पराकाष्ठा केली. त्याची गोलंदाजी अचूक पडूनसुद्धां चेंडू दरवेळां दोन दांड्यांच्या पोकळींतून निसटून जाई, त्याचा स्पर्श यष्टिला होईना. अशा तऱ्हेनें हॅम्बलेडन संघानं तो सामना जिंकला. पण त्यानंतर ह्या यष्टिच्या पद्धतीबद्दल खडाजंगी चर्चा होऊन त्यानंतर तिसऱ्या दांडीचा उपयोग करण्याची पद्धत रूढ झाली. तदनंतर १७९७ मध्यें विंचिलसीचे आठवे अर्ल ह्यांनी चौथी दांडी बसवण्याची कल्पना सुचवली व स्टम्पूची एक फुटाची उंचाहि दोन इंचांनीं वाढविण्यांत आली पण ह्या सुधारणांना मान्यता न मिळाल्यामुळें त्या मागें पडल्या.

१७९१ सालीं एम्. सी. सीची स्थापना झाली. त्यानंतर हॅम्बलेडन क्लबचें ह्या खेळांतलें महत्त्व कमी होऊं लागलें. एम्. सी. सी. ची हुकमत आजतागायत ह्या खेळावर पक्की आहे. क्रिकेटचे संपूर्ण नियंत्रण करणें आज तिच्या हातीं आहे. १८६६ सालीं लॉर्डसचें मैदान एम्. सी. सी. च्या मालकीचें झालें त्यानंतर ब्रिटिश राज्यांतल्या क्रिकेटला एक प्रकारचें लोकशाहीचें स्वरूप येऊन एम्. सी. सी. चें प्रभुत्व मान्य करण्यांत आलें. ह्या काळीं सर्व प्रमुख खेळाडू ह्या क्लबचे सदस्य असत. व सर्व महत्वाचे सामने ह्याच क्लबच्या मैदानावर खेळले जात असत. एम्. सी. सी नें क्रिकेटच्या खेळांत पुष्कळ सुधारणा केल्या. १८६० पर्यंत खेळण्याचा पिच खांचाखळग्यांनीं भरलेला असे. तशाच परिस्थितींत सामनेही खेळले जात. पुष्कळदां गोलंदाजांचे चेंडू खड्डयाला चाटून फलंदाजाच्या कपाळावर आदळत असत. सरे व ससेक्स परगण्यांनीं अशा भयंकर पिचवर खेळण्याचें नाकारलें. तसेंच जाळें लावून खेळाची प्रॅक्टिस करण्याची सोय उपयोगांत न आल्यामुळें कोणीही वाटसरू चेंडू उचलून गोलंदाजी करी; त्यामुळें पुष्कळदां खेळाडू अगर प्रेक्षकांना चेंडूचे तडाखे लागून इजा होत. एम्. सी. सीनें पिच तयार करण्याचा आदेश आपल्या सदस्य संघाना दिला व त्यामुळें क्रीडांगणें सुधारण्यांत येऊन त्याबाबतचे नियमहि अमलांत आले.

क्रिकेटच्या ह्या सुरवातीच्या युगांत फलंदाजीला महत्त्व जास्त असे. दगडी चेंडूच्या उपयोगानंतर, कातड्याचे भरलेले चेंडू उपयोगांत आणले गेले. १७८० सालीं प्रथम शिवलेला चामड्याचा चेंडू वापरला गेला. एवढा बदल होऊनही गोलंदाजीत वैचित्र्य येऊं शकलें नाहीं, चेंडू भुईसपाट टाकण्याच्या पद्धतीनें चेंडूला फक्त गतीचेंच वैचित्र्य असे.

ऑऽ! तुमचा रस्ता चुकलेला दिसतोय!
खरं म्हणजे तुमची जागा एखाद्या धर्मादाय संस्थेतच

डेव्हिड हॅरिस ह्या हॅम्ब्लेडनच्या गोलंदाजानें मात्र आपलें वैशिष्ट्य दाखवलें. वेगाची फेंक, अचूक नेमबाजी आणि टप्प्यानें उसळी घेऊन घुसणारा चेंडू हे हॅरिसच्या गोलंदाजीचे विशेष असत. ह्याच क्लबच्या टॉम वॉकर नांवाच्या गोलंदाजानें चेंडू फेंकतांना हात उंचावून फेकल्यामुळें त्याला तंबी देण्यांत आली. १८२२ सालीं जॉन विल्स नांवाच्या गोलंदाजानें एका सामन्यांत खांद्यांवरून चेंडूफेक केली. अंपायरनें तत्काळ 'नो बॉल' म्हणून पुकारा गेला. जॉन तत्काळ रागानें चेंडू फेकून आपल्या घोड्यावर स्वार होऊन क्रीडांगण सोडून चालता झाला. १८२८ सालीं मात्र एम्. सी. सी नें सध्यां प्रचलित झालेली खांद्यावरून गोलंदाजी करण्याची पद्धत स्वीकारली आणि त्यानंतर गोलंदाजांना हाताच्या हालचालीबाबत संपूर्ण स्वातंत्र्य मिळालें.

१८५९ सालीं प्रथम इंग्लंडचा संघ कॅनडा व अमेरिकेच्या दौऱ्यावर गेला त्यानंतर दोन वर्षांनीं आस्ट्रेलियालाहि गेला. ह्या ठिकाणीं मात्र क्रिकेट चांगलाच प्रगतिपथावर होता व त्यामुळें बलाढ्य इंग्लिश संघावर दोनदां हरण्याची पाळी आली. १८७७ सालीं प्रथम अधिकृत टेस्ट मॅचिस खेळण्याची कल्पना रूढ झाली आणि इंग्लिश संघ मेलबोर्नच्या सामन्यांत हरला. पुढील वर्षीं ऑस्ट्रेलियन संघ इंग्लंडमध्यें आला त्यावेळीं त्यांच्यांत पुढें नामवंत ठरलेला स्पोफोर्थ नांवाचा गोलंदाज होता. ह्या गोलंदाजानें पहिल्याच सामन्यांत डॉ. ग्रेस ह्या नामवंत इंग्लिश खेळाडूला चीत केलें. ह्या दौऱ्यांत इंग्लिश जनतेला ऑस्ट्रेलियन संघाच्या व तदनुषंगानें त्यांच्या सर्वांगीण कौशल्यपूर्ण प्राबल्याची जाणीव झाली. एम्. सी. सीच्या प्रबल संघाचा एका दिवसांत उडवलेला धुव्वा त्यांच्या स्मरणांत ताजा होता. आणि म्हणून ह्यापुढें अधिकृत सामन्यांत अखिल इंग्लंडमधून खेळाडू निवडून टेस्ट मॅचिस् खेळण्यांत याव्या असें ठरलें. १८८२ सालीं पुन्हां ऑस्ट्रेलियन संघ इंग्लंडमध्यें आला. मरडॉकसारखा विख्यात फलंदाज ह्या संघाचा नेता होता. गिफेन, होरान, बॅनरमन सारखे धीमे फलंदाज ह्या संघांत होते तसे बॉनर, मॅसी, व मॅक्डोनेल सारखे चढाऊ फलंदाजहि होते. गोलंदाजीचे वीर स्पोफोर्थ, बॉईल, गॅरेट आणि पामर आणि यष्टिरक्षक ब्लॅकहॅम ह्यांचाहि समावेश संघांत असल्यामुळें हा संघ खरोखरच तुल्यबल होता. ऑगस्ट महिन्यांत ओव्हलवर पहिली अधिकृत टेस्ट मॅच सुरू झाली. इंग्लंडचा संघहीं प्रबल होता. शनिवारीं पाऊस खूप पडल्यामुळें सोमवारच्या सामन्याबद्दल ऑस्ट्रेलियन संघ जरा साशंकच होता. ऑस्ट्रेलियानें टॉस जिंकला व खेळावयास सुरवात केली. लंचपर्यंत ऑस्ट्रेलियाचा धुव्वा उडाला. त्यांचे सहा खेळाडू बाद होऊन फक्त ४८ च धांवा झाल्या होत्या. दुपारीं अर्ध्या तासांतच ऑस्ट्रेलियन संघाचे सर्व गडी बाद होऊन फक्त ६४ धांवांतच डाव आटोपला होता. इंग्लंडचे फलंदाज झोडपून विजय मिळवणार याबद्दल कुणाला शंकाच नव्हती. पण स्पोफोर्थनें आपली चुणूक दाखवली. पहिले दोन खेळाडू १८ धांवांच्या आंतच बाद झाले होते. युलेट व

सुमारें शंभर वर्षांपूर्वींची हिंदी क्रिकेटच्या पहिल्या दिवसांतील गोष्ट आहे. स्थळ मुंबई; तेथें पारशी लोकांनीं हा खेळ प्रथम सुरू केला. त्यांच्या संघाचा इंग्रज सोजिरांच्या संघाशी सामना होता. आरंभी खेळावयास गेलेला पारशांचा एक चांगला गडी लौकर बाद झाला. डाव गडगडूं लागला तेव्हां कोणी क्लृप्ति काढली. या गोऱ्या 'टॉमीं'ना पेस्तनजी कावसजी बैरामजी सगळे सारखेच दिसतात. (त्यांतहि, तेव्हां दाढीच्या जंगलानें अर्धा चेहरा झांकलेला असे!), तेव्हां कोणी दोनदां खेळला तरी ओळखणें कठीण. म्हणून त्या बाद झालेल्या बहाद्दर खेळाडूला पुन्हां एकदां पाठवलें; आणि त्यानें गोऱ्यांची दाणादाण उडवली.......

दुर्दैवानें, त्यांतल्यात्यांत कमी मठ्ठ अशा एका सोजिराच्या ध्यानांत हा चलाखपणा आला...आणि क्रिकेटऐवजीं मुष्टियुद्ध सुरू झालें......

**श्री. बाळ ज. पंडित, शां. शां. रेगे, श्री. डोसा, पुरुषोत्तम धाकस वगैरे मित्रमंडळींनीं या क्रिकेट विभागासाठीं सहकार्य केल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.** •

लुकास ह्या पुढच्या जोडीनें मात्र ५७ पर्यंत धांवांची संख्या नेली. पण इतक्यांत स्पोफोर्थला पुढें येऊन मारण्यास गेलेला युलेट बाद झाला. नंतर थोड्या वेळांत लुकासहि परतला. घसरगुंडी सुरू झाली. इंग्लंडचे सहा गडी बाद होऊन ६४ धांवा झाल्या. अखेरीस डाव संपला तेव्हां इंग्लंडच्या फक्त ३८ धांवा जास्त झाल्या होत्या. त्या रात्रीं पुन्हां जोराचा पाऊस पडल्यामुळें दुसऱ्या दिवशीं क्रीडांगणावर चिखलच झाला होता. मॅसी व बॅनरमन ह्यांनीं ऑस्ट्रेलियन संघाचा दुसरा डाव सुरू केला. मॅसीनें दणकेबाज खेळ सुरू केला व त्या जोडीनें एका तासांतच साठावर धांवा केल्या. मॅसी परतल्यावर इंग्लंडच्या गोलंदाजीनें पुन्हां सत्र सुरू केलें. मरडॉकनें नेत्याच्या धीमेपणानें डाव सावरला. अखेरीस ऑस्ट्रेलियन संघानें इंग्लंडपेक्षां ८४ धांवा अधिक करून डाव संपवला. दहा मिनिटांच्या मध्यंतरानंतर ऑस्ट्रेलियन संघ ईर्षेनें क्रीडांगणावर उतरला. इंग्लंडच्या संघाचा नेता हॉर्न्बीनें ग्रेसला जोडीला घेऊन डाव सुरू केला. स्पोफोर्थ व गॅरेटनें गोलंदाजी सुरू केली. पहिल्या पंधरा धांवांतच इंग्लंडच्या कप्तानाचा बळी स्पोफोर्थनें घेतला. बार्लो त्याजागीं आला पण पहिल्या चेंडूफेकीवरच परतला. जनसमुदाय निस्तब्ध झाला. युलेटनें मात्र पुढल्या अर्धा तासांत ग्रेसबरोबर ३६ अमोल धांवा मिळवल्या. आठ खेळाडू शिल्लक राहून आतां फक्त ३४ धांवांचीच जरुरी होती. विजय समीप होता आणि सहज प्राप्तहि होता. इंग्लंडच्या संघाची ५१ वी धांव झळकते न झळकते तोंच स्पोफोर्थनें युलेटचा बळी घेतला. दोन धांवानंतर ग्रेस परतला. त्याजागीं आलेल्या लिटलटन्नें एक चौकार मारला आणि प्रेक्षक आशेनें खुलले. धांवांची संख्या साठावर गेली. नंतर बॉईल आणि स्पोफोर्थ कसून गोलंदाजी करूं लागले. त्यांनीं बारा निर्धाव षटकें टाकलीं. आणखी एक धांव मिळाली

अनुक्रमणिका

आणि तीसुद्धां मुद्दाम चेंडू सोडून लिटलटनला, स्पोफोर्थच्या समोर आणण्यासाठीं. आणि ठरल्याप्रमाणें कांहीं वेळानंतर लिटलटन बाद झाला. त्यानंतर ७० धांवा होताच स्टील परतला. त्याजागीं रीडसारखा पहिल्या डावांत चमकून गेलेला फलंदाज आला पण दुसऱ्या चेंडूवरच तो तंबूंत आला. आतां फक्त पंधरा धावांची जरुरी होती आणि सातच गडी बाद झाले होते. बार्नस्‌, तसेंच ह्याच संघाच्या विरुद्ध दोनदां शतकें काढणारा स्टड आणि खेळत असलेला लुकस ह्या तीन नामवंत फलंदाजांना पंधरा धांवा म्हणजे नुसता पोरखेळच होता. पांच धांवा वाढल्या. लुकस खेळतच होता. स्पोफोर्थच्या षट्‌काच्या अखेरच्या चेंडूनें मात्र घात केला आणि धीमेपणानें टिकून राहिलेला लुकास परतला. पुढच्या बॉइल्‌च्या षट्‌कांत बार्नस्‌चा झेल उडाला आणि बॉइल्‌नें उडीमारून तो पकडला. आतां पीट आणि स्टड यांची अखेरची जोडी खेळूं लागली. पीटनें पहिलाच चेंडू लेगला हाणला आणि दोन धांवा वाढविल्या. दुसरा चेंडू त्यानें कसाबसा आडवला आणि तिसऱ्या चेंडूला तडाखे देण्याच्या प्रयत्नांत त्याला अपयश आलें.

हा शेवटचा अर्धा तास धकाधकीचा गेला. एक प्रेक्षक जागच्याजागीं मृत झाला तर दुसऱ्यानें त्वेषाच्या भरांत छत्रीची मूठच चावून तिचे तुकडे केले. एक इंग्लंडचा खेळाडू खेळायला निघाला तेव्हां त्याचे ओठ पांढरेफटक पडले होते आणि घसा साफ सुकून गेला होता, तर स्कोअररनें आपल्या वहींत पीटच्या नांवाऐवजीं दुसरेंच नांव लिहिलें पीटचा बळी पडतांच प्रेक्षक क्रीडांगणावर घुसले त्यांनीं स्पोफोर्थला खांद्यावर उचलून घेतला. तोच त्यादिवशींचा नायक होता. अवघ्या नव्वद धावांत त्यानें इंग्लंडचे १४ गडी त्या सामन्यांत बाद केले होते आणि अखेरच्या अकरा षट्‌कांत तर दोन धांवा आणि चार बळी असा त्याचा विक्रम होता. हा चुरशीचा सामना ऑस्ट्रेलियन संघानें आठ धांवानीं जिंकला. हा नमुनेदार टेस्ट सामना क्रिकेटच्या इतिहासांत संस्मरणीय ठरला. स्पोर्टिंग टाइम्सच्या पुढच्या अंकांत 'ग्रहसंस्कार' ह्या सदराखालीं प्रस्तुत सामन्याचा उल्लेख आला तो असा—

In Affectionate Rembrance
of
ENGLISH CRICKET
which died at the Oval
on
29th August, 1882
Deeply lamented by a large circle
of Sorrowing Friends and
Acquaintances
R. I. P.

N. B. The body will be cremated and the ashes taken to Australia

"इंग्लिश क्रिकेटचा मृत्यु २९ ऑगस्ट १८८२ रोजीं ओव्हलच्या मैदानावर झाला. त्याच्या बहुसंख्य मित्रांना व परिचितांना अपरंपार दुःख झालें. त्याच्या संस्मरणार्थ ता. क. शवाचें दहन करण्यांत येईल व रक्षा ऑस्ट्रेलियास नेण्यांत येतील."

ह्याच वर्णनांतून अॅशिसची कल्पना क्रिकेटच्या युगांत रूढ झाली. इंग्लंड आणि ऑस्ट्रेलियाच्या तदनंतरच्या सामन्यांना विजेत्यासाठीं करंडक म्हणून जो ठेवण्यांत आला आहे तो मृताची रक्षा ठेवण्याच्या पात्राच्या आकाराचा करण्यांत आला आहे. ऑस्ट्रेलियानें क्रिकेटच्या खेळांत त्यानंतर चांगलेंच स्थान प्राप्त केलें. तसेंच क्रिकेटच्या खेळालाही त्यांनीं अधिक क्षेत्र रक्षणाच्या योजना, गोलंदाजीचे नवनवीन प्रयोग आणि चमत्कार फलंदाजीच्या पद्धती यामुळें क्रिकेटला नाविन्य प्राप्त झालें आहे. इंग्लंड ऑस्ट्रेलियाचे सामने म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणाइतकेच सनसनाटी स्वरूपाचे गणले जातात. वर्तमानपत्रांचीं बातमी यंत्रें, रेडिओ व टेलिव्हिजन यांना या सामन्यांच्या काळांत फारच महत्व येतें. पहिल्या टेस्टनंतर १९५९ पर्यंत ऑस्ट्रेलियानें ७४ व इंग्लंडनें ६२ सामने जिंकले असून ४२ सामने अनिर्णित राहिले आहेत.

दक्षिण आफ्रिकेमध्यें सुद्धां ब्रिटिश राज्य कर्त्यांबरोबर क्रिकेट गेला होता. १८६३ सालीं नाताळ ब्रिटिश सैन्यानें व्यापल्यावर, ब्रिटिश नागरिकांनीं तिथें एक क्रिकेटचा क्लब स्थापला. १८८८ पर्यंत आफ्रिकेंत हा खेळ विशेष प्रगत झाला नव्हता. त्या वर्षीं मेजर वॉर्टन आणि सर डोनाल्ड करी ह्यांच्या खटपटीनें इंग्लंडचा एक मध्यम-दर्जाचा संघ आफ्रिकेंत खेळण्यासाठीं आला. बॉबी अॅबेल, जॉनी ब्रिग्ज सारखे खेळाडू ह्या दौऱ्यांत चमकले. इंग्लंडच्या संघानें सहज बहुतेक सामने व दोन टेस्ट सामनेहि जिंकले. ब्रिग्जची गोलंदाजी विशेष ऐतिहासिक झाली. ह्या सामन्यांमुळें आफ्रिकन संघाला अनुभव चांगलाच मिळाला. फ्रँक हर्न सारखा विख्यात खेळाडू सामने संपल्यानंतर क्रिकेटचें शिक्षण देण्यासाठीं मागें राहिला. त्यानंतर आंतरप्रांतीय सामने आफ्रिकेंत सुरू झाले व त्याचें श्रेय ह्या सामन्यांच्या विजेत्यासाठीं ज्यांनीं करंडक ठेवला ते सर डोनाल्ड करी ह्यानांच विशेषतः आहे. इंग्लंड व दक्षिण आफ्रिका या देशांनीं त्या नंतर पुष्कळदां परस्परांच्या देशांत दौरे काढले. १९०५ सालीं प्रथमवर्गीय संघाचा दर्जा प्राप्त व्हावा म्हणून द. आफ्रिकेनें खटपट केली आणि चार टेस्ट सामने जिंकल्यामुळें त्यांना तो मिळालाहि. १९१० सालीं द. आफ्रिकन संघ ऑस्ट्रेलियांत गेला आणि जरी ऑस्ट्रेलियाच्या प्रबल संघानें पांचापैकीं चार प्रातिनिधिक सामने जिंकले तरीसुद्धां इवार्डची गोलंदाजी व फॉकनरची फलंदाजी यांची चमक दिसून आली. १९५८ पर्यंत इंग्लंड व दक्षिण आफ्रिकेच्या संघांत

डब्ल्यू. जी. ग्रेस म्हणजे इंग्लिश क्रिकेटचा बादशहा. त्याच्यापुढें बोलायची कोणाची हिंमत नसे असा त्याचा दरारा. एकदां ग्रेसच्या खेळाच्या आरंभीच, जम बसतो न बसतो तोच, फटका हुकला आणि चेंडूनें अलगद एक 'बेल' उडविली. ग्रेसनें मागें पाहिलें. आणि संथपणें खाली पडलेली 'बेल' उचलून पुन्हां स्टंपांवर ठेवली आणि विकेटकीपरला म्हटलें, "काय वारें सुटलें आहे आज, नाहीं?"

विकेटकीपरनें मान डोलावली.—

अनुक्रमणिका






८९ टेस्ट सामने झाले. त्यापैकीं ४२ सामन्यांत इंग्लंडला व १७ सामन्यांत दक्षिण आफ्रिकेला विजय मिळाला आहे. गेल्या वर्षी ऑस्ट्रेलियाचा संघ आफ्रिकेंत गेला आणि पांचापैकीं तीन टेस्ट सामन्यांत त्यांनी विजय मिळवला, व बाकीचे दोन सामने अनिर्णित राहिले. १९४७ च्या इंग्लंडच्या दौऱ्यांत दक्षिण आफ्रिकेच्या संघानें एका टेस्ट सामन्यांत एका डावांत ५३३ धांवा काढून विक्रम केला आहे.

न्यूझीलंडमध्यें १९२७ सालपर्यंत क्रिकेटला स्थानिक महत्व होतें. त्यावर्षी टॉम लोरी याच्या नेतृत्वाखाली न्यूझिलंडच्या संघानें इंग्लंडला प्रथमच भेट दिली. त्यानंतर १९३१ सालीं दुसऱ्यांदा तिकडील संघ पुन्हां इंग्लंडला आला. ह्या मधल्या काळांत गिलिगनच्या नेतृत्वाखालीं एम्. सी. सी. च्या संघानें न्यूझिलंडला भेट दिली. त्यांच्यांत चार टेस्ट सामने झाले होते,—त्यापैकीं एक सामना एम्. सी. सी नें जिंकला व तीन अनिर्णित राहिले होते. ह्या १९३१ च्या दौऱ्यांत तीन टेस्ट सामने आंखले होते. या तीन पैकीं एक अनिर्णित व एकांत न्यूझीलंडचा पराभव झाला व तिसरा सामना रद्द झाला.; पण या सामन्यांत न्यूझीलंडच्या खेळाडूंनीं दाखविलेलें कौशल्य असामान्य होतें.

न्यूझिलंड हें छोटे राष्ट्र असल्यामुळें इथल्या क्रिकेटला आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्यें विशेष महत्व मिळालेलें नाहीं तरीसुद्धां ऑस्ट्रेलियाच्या जवळच असलेल्या या बेटाला ऑस्ट्रेलियाला जाणारे संघ परततांना भेट देतात ह्यामुळें इथल्या संघांत चैतन्य भरलेलें आहे.

वेस्ट इंडीज देशांत क्रिकेटला राष्ट्रीय खेळाचा मान प्राप्त झाला आहे. १९०० सालीं प्रथमतः वेस्ट इंडीजचा संघ इंग्लंडच्या दौऱ्यावर आला आणि त्यानंतर दोन चार फेऱ्याहि झाल्या पण १९२८ सालापर्यंत वेस्ट इंडीजला पहिला दर्जा प्राप्त झाला नव्हता. १९२८ च्या दौऱ्यांत प्रथमच टेस्ट सामने खेळण्याची संधी त्यांना देण्यांत आली. लिअरी कॉन्स्टंटाइनची जलद गोलंदाजी त्यावर्षी इंग्लंडच्या प्रेक्षकांना फारच रूचली. गोलंदाजीप्रमाणें फलंदाजीमध्यें सुद्धां त्याचें धोरण तुफानी स्वरूपाचें होतें त्यामुळें तडफदार टोलेबाजीनेंही तो चमकला. त्यावर्षी जरि त्यांनीं सामन्यांत विजय मिळवला नाहीं तरीसुद्धां १९३० सालीं ऑस्ट्रेलियांत त्यांनीं एक टेस्ट सामना जिंकला. १९३३ सालीं इंग्लंडमध्यें व १९३४ सालीं वेस्ट इंडिजमध्यें पुन्हां इंग्लंडच्या संघाशीं त्यांनीं सामने दिले. पण ह्यावेळीं कॉन्टंटाईनच्या निवृत्तीमुळें ग्रिफिथ व मार्टिन्डेलवर अवलंबून राहावें लागलें. पण तरीसुद्धां हेडले या फलंदाजानें संघाचे नांव राखलें. १९५० सालीं वेस्ट इंडिजचा संघ प्रबल होता. ह्या वर्षी इंग्लंडच्या दौऱ्यांत तीन टेस्ट सामने जिंकून आपलें सामर्थ्य ह्या संघानें पटवून दिलें. ह्या संघाचें वैशिष्टय म्हणजे त्यांची सांघिक मनोवृत्ति. पराजय मिळाले तरीसुद्धां खचून न जातां खिलाडू वृत्तीनें खेळ खेळणें हें त्या संघाचे आजहि गमक आहे. ह्या संघाचे तीन श्रेष्ठ खेळाडू म्हणजे वीकस्, वॉरेल व वॉल्कॉट हे युद्धोत्तर काळांतील वेस्ट इंडीज संघाचे तीन भव्य खांब. प्रत्येक सामन्यांत ह्या तिघांपैकीं निदान दोघांनीं वैयक्तिक शतकें कमावलीं आहेत. शिवाय हे तिघेही फलंदाजीमध्यें कुशल असून इतर अंगांतहि चमकले आहेत. वॉरेलची डावखोरी गोलंदाजी वॉलकॉटचें यष्टिरक्षण हे क्रिकेटच्या इतिहासांत संस्मरणीय ठरलेलें आहे. वीक्सनें १९४८ सालीं भाराताविरुद्ध चारहि टेस्ट सामन्यांत शतकें काढून उच्चांक प्रस्थापित केलेला आहे. वॅल्कॉटचे सहज मारलेले फटकार भारतीय प्रेक्षकांना परिचित आहेतच. अर्थात् गोऱ्या क्रिकेटच्या जगांत ह्या काळ्या निग्रोंचे कौतुक विशेष होत नाहीं हें मात्र खरें.

भारतीय क्रिकेटचे खरें उगमस्थान मुंबईच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. विसाव्या शतकाच्या सुरवातीपर्यंत युरोपियन अधिकारी व सैनिक सोडले तर मुंबईबाहेर क्रिकेटचें लोण पोंचलेलें नव्हते. १८४८ सालीं ओरिएंटल क्रिकेट क्लब मुंबईत कांहीं पारशी उत्साही तरुणांनीं सुरू केला. त्यानंतर १८५० सालीं झोरास्ट्रियन क्रिकेट क्लबची स्थापना झाली. त्यानंतर पारशांचेच असे सात आठ क्लब स्थापन झाले. हे सर्व क्लब ओव्हलवर खेळत असत. १८७८ सालीं युरोपिअन जिमखान्याबरोबर पारशांचा पहिला सामना झाला. पारशांनीच प्रथम भारतांत चक्राकार गोलंदाजीची सुरवात केलीं. १८६८ ते १८७७ पर्यंत सोराबजी बंगाली ह्या दानशूर पारशी गृहस्थांच्या उत्तेजनानें पारशी क्रिकेट क्लबचे आपापसांत सामने चालत व त्यासाठीं सदरहू सद्‌गृहस्थ पारितोषिकें व इतर सर्व खर्च स्वतः सोसत असत. १८६६ मध्यें हिंदु क्रिकेट क्लब स्थापन झाला तर १८८३ मध्यें मुस्लिम क्रिकेटची सुरवात झाली. १८८४ सालीं हिंदु क्लबाचा युरोपिअन जिमखान्याबरोबर सामना झाला आणि त्यांत हिंदु क्लबाचा पराजय झाला. १८९३ सालीं महॉमेडन जिमखाना केनेडी सीफेसवर स्थापन झाला आणि १८९४ मध्यें हिंदु जिमखानाहि शेजारी उभा राहिला. मुंबईमध्यें १८९२ ते १९०६ पर्यंत ऑगस्ट, सप्टेंबरमध्यें प्रेसिडेन्सी सामने खेळण्याची प्रथा पडली. हे सामने पुण्यास व मुंबईस असे प्रतिवर्षी दोनदां होत. ह्या क्लबांच्या जातीय सदस्यत्वानें निर्माण झालेली जातीयता पुढें तिची परिणति न होतां जातीय जिमखान्यांच्या स्थापनेनें उलट पक्की रोवली गेली. प्रेसिडेन्सी सामने दुरंगी म्हणजे पारशी व युरोपिअन्स् यांमध्यें होत. १९०७ सालीं हिंदु क्लबांनीं भाग घेतल्यामुळें हे सामने तिरंगी झाले, १९१२ सालीं मुसलमानांच्या प्रवेशानंतर चौरंगी व १९३७ सालीं रेस्ट संघाचा अंतर्भाव झाल्यामुळें पंचरंगी झाले. १९४७ सालीं महात्मा गांधीनीं या जातीयतेविरुद्ध कौल दिल्यामुळें हे सामने बंद पडले, आंतरराष्ट्रीय सामन्यांत

---

टेस्ट-मॅचला खूप रंग भरला होता. कोणाला काय सुचत नव्हतें; ज्याचें त्याचें लक्ष 'स्कोअर'कडे. अशा एक क्रिकेट-वेड्या न्यायाधीशाची चलविचल जाणून, त्याच्यापुढें खटला चालविणाऱ्या वकिलानें मध्येंच एक नवा मुद्दा उपस्थित केला, आणि आधार दाखविण्यासाटीं त्या विशिष्ट पानांत खुणेचा कागद घालून कायद्याचें एक लठ्ठ पुस्तक त्याच्या हातीं दिलें. न्यायाधीशानें कंटाळलेल्या मुद्रेनें तें पान उघडलें. आणि त्या खुणेच्या कागदावर त्याला ताजा 'स्कोअर' आढळला.—

नांवास आलेले बहुतेक खेळाडू या जातीय सामन्यांतूनच उदयाला आले. ह्या काळांत भारतीय खेळाडूनीं खासगी संघांतून परदेशचे दौरे केलेले होते. १८८६ सालीं पहिला हिंदी (पारशी) संघ इंग्लंडच्या दौऱ्यावर गेला. प्रत्येक खेळाडूनें आपला सर्व खर्च स्वतःच सोसायचा असल्यामुळें हा धनिकांचा संघ विशेष कौशल्य दाखवूं शकला नाहीं यांत नवल नाहीं. १८८८ सालीं दुसऱ्यांदा हिंदी संघ इंग्लंडमध्यें गेला. १९११ सालचा तिसऱ्यांदा इंग्लंडचा दौरा करणारा संघ जरी पूर्वीप्रमाणें खाजगीच होता तरीसुद्धां खेळाडूंची निवड संमिश्र व जास्त प्रातिनिधिक व लायकतेवर आधारलेली होती. ह्या संघाची गोलंदाजी बरेच वेळां चांगली पडली. बाळू, बॉर्डन, सलामुद्दिन ह्या गोलंदाजांचा उपयोग जसा झाला तशीच मेहेर होमजी, शिवराम व कांगा ह्यांची फलंदाजी ही उपयुक्त ठरली. पण क्षेत्ररक्षण अगदींच कमी प्रतीचें असल्यामुळें पराभवच पदरीं आले.

१९३२ सालीं पोरबंदरच्या महाराजांच्या नेतृत्वाखालीं इंग्लंडच्या दौऱ्यावर गेलेला संघ हा पहिला अधिकृत भारतीय संघ मानण्यांत आला व टेस्ट सामना खेळण्याचा दर्जा त्याला मिळाला. ह्या टेस्ट सामन्याचे नेतृत्व कर्नल सी. के. नायडू यांनीं केलें. हिंदी संघानें पहिल्या डावांत १८९ व दुसऱ्यांत १८७ धांवा केल्या तर इंग्लंडनें पहिल्या डावांत २५९ व दुसऱ्या डावांत आठ गडी बाद २७५ धांवा केल्या. निसार व अमरसिंगानें आपल्या प्रभावी गोलंदाजीचा अनुभव होम्स् व सटक्लिफ या नांवाजलेल्या खेळाडूंना चांगलाच दिला. या सामन्यांत क्षेत्ररक्षणहि उत्कृष्ट होतें. पराजय झाला तरि अमरसिंग, नायडू, वझिरअलि व निसार यांनीं गोलंदाज व फलंदाज असें दुहेरी व्यक्तिमत्व प्रगट केलें. अमरसिंगानें या दौऱ्यांत एकूण १६०० धांवा काढल्या व ६५ गडी बाद केले. १९३३ सालीं इंग्लिश संघ भारतांत आला. ह्या एम्. सी. सी. संघाचा नेता जार्डिन या अनुभवी व नामवंत खेळाडूकडे होतें. ह्या संघानें भारतांत झालेल्या तीन टेस्ट सामन्यांपैकीं दोन जिंकले. १९३६ सालीं विजयानगरमूच्या महाराजकुमाराच्या नेतृत्वाखालीं पुन्हां भारतीय संघ इंग्लंडमध्यें गेला. ह्यावेळीं तीन टेस्ट सामने ठरले होते त्यापैकीं दोन सामने इंग्लंडने जिंकले व एक अनिर्णित राहिला. ह्या शिवाय इतरत्र झालेल्या अशा एकूण एकतीस सामन्यांपैकीं फक्त पांचच सामने हिंदी संघानें जिंकले व बहुतेक पहिल्या दर्जाच्या सामन्यांत मारच खाल्ला होता. आपापसातले हेवेदावे त्यांतून निर्माण झालेलें अमरनाथ प्रकरण, कांहीं खेळाडूंचा आजार ह्या कारणांनीं हिंदी संघाची पिछेहाट तर झालीच पण त्यापेक्षां नामुष्किच जास्त झाली. फक्त नांव झालें विजय मर्चंटचें. जगांतल्या पांच निवडक खेळाडूमध्यें त्याचवी त्याला स्थान मिळालें. ह्यानंतर एप्रिल १९४६ मध्यें पुन्हां भारतीय संघ इंग्लंडला गेला. ह्यावेळीं पतौडीचे नबाब संघाचे नेते होते. हा दौरा हिंदी क्रिकेटला लोकप्रिय करण्याबाबत उपयुक्त ठरला. पावसानें जरी तिसरी टेस्ट व इतर एकदोन महत्वाचे सामने सोडून द्यावे लागले, तसेंच हवेंतल्या बदला मुळें हिंदी खेळाडू ऐनवेळीं आजारी पडूं लागले तरीसुद्धां पतौडीचे नबाब, मर्चंट, अमरनाथ, मुस्ताक, मन्कड, हजारे, मोदी सरवटे व बानर्जी यांचे चमकदार खेळ व शतकें यांनीं इंग्लिश प्रेक्षकांना रंजविलें. बानर्जी व सरवटे यांचा सरेविरुद्ध अखेरच्या जोडीचा खेळ हा एक चिरस्मरणीय विक्रम ठरला. वैयक्तिक शतकें व २४९ धांवांची भागीदारी ही या हिंदी खेळाडूंची कामगिरी त्यांच्या गोलंदाजीपेक्षां जास्त आकर्षक ठरली. विनू मन्कडच्या अष्टपैलुत्वामुळें जागतिक क्रिकेटमध्यें त्याचवी उल्लेखनीय खेळाडू म्हणून त्याला स्थान प्राप्त झालें. १९४७ सालीं हिंदी संघ प्रथमच ऑस्ट्रेलियाला गेला. या दौऱ्यावर एकूण २० सामने झाले त्यापैकीं हिंदी संघानें पांच जिंकले ७ हरले व ८ अनिर्णित राहिले. त्यावेळीं संघाचें नेतृत्व अमरनाथकडे होतें. हिंदी संघाच्या गचाळ क्षेत्ररक्षणामुळें, लिनवॅलवशाच्या फलंदाजीपुढें व अननुभवी नेतृत्वामुळें ब्रॅडमनच्या नेतृत्वाखालीं असलेल्या बलिष्ठ ऑस्ट्रेलियन संघाकडून वारंवार मार खावा लागला तरीसुद्धां या प्रवासी संघानें लोकप्रियता मिळवली. अमरनाथ, हजारे, फडकर, मन्कड व सरवटे हे लिंडवालच्या प्रभावी गोलंदाजीसमोरहि चमकदारपणें व निर्भयपणें खेळले. टेस्ट सामन्याच्या दोन्ही डावांत शतकें काढून हजारेनें हिंदी क्रिकेटचें स्थान उच्च केलें.


ऑल राऊंडर !

भारताच्या फाळणीनंतर पाकिस्ताननेंहि क्रिकेटमध्यें आपलें वैशिष्ट्य दाखवलें व १९५२ सालीं पाकिस्तानला प्रथम दर्जाच्या क्रिकेटमध्यें स्थान प्राप्त झालें. ह्या सालीं भारतीय संघ इंग्लंडच्या दौऱ्यावर पुन्हां गेला. त्यानंतर १९५८ सालीं वेस्ट इंडिज संघ भारतांत आला १९५४ सालीं पाकिस्ताननें इंग्लंडमध्यें टेस्ट मॅच २४ धांवांनीं जिंकून आपलें सामर्थ्य प्रस्थापित केलें. त्यानंतर १९५६ सालीं ऑस्ट्रेलिअन संघाचा कराचीच्या टेस्टमध्यें पराजय केला, १९५९ सालीं वेस्ट इंडिज संघाबरोबर दोन टेस्ट सामनेहि त्यांनीं जिंकलें.

आंतरराष्ट्रीय क्रिकेटच्या खेळाचा हा धांवता परामर्श घेतला आहे. त्यांत स्थलाभावानें जास्त तपशील देणें अशक्य आहे. तरी सुद्धां हॉब्स, हटन, ब्रॅडमन, अलिउद्दीन व मन्कड यांचे चमकदार खेळ, तसेंच रामाधीन, व्हेरिटी, पेगलर व मेले यांचे गोलंदाजीचे पराक्रम आंतरराष्ट्रीय क्रिकेटचीं लेणीं होत हें आपण विसरतां कामा नये. आज क्रिकेटमध्यें डौलदारपणा कमी कमी होत चालला आहे. गेल्या महायुद्धानंतर तर क्रिकेटचा खेळ आणखी खालच्या पातळीवर आला आहे. तरीसुद्धां क्रिकेट पुन्हां नवनवीन जोमानें आपलें स्थान प्रस्थापित करील अशी आशा आहे.

●|●

अनुक्रमणिका

❀

❀

❀

## क्रिकेटचा राजपुत्र



चेंडू तडकावण्यासाठीं नसतो—
बॅटीनें त्याला खेळवायचें असतें!
दातओठ खाऊन त्याच्यावर तुटून
पडण्यापेक्षां लीलेनें तो खेळ-
ण्यांत खरें कसब असतें!

# प्रिन्स दुलिपसिंहजी

शुक्रवार ता. ४ डिसेंबर रोजीं मुंबईच्या संध्यापत्रांनीं "थोर क्रिकेटपटूचें आकस्मिक निधन" ही बातमी आणली आणि हां हां म्हणतां मुंबईच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत ती पसरली. क्रिकेटच्या क्षेत्रांतील मातबर मंडळींत आणि अनेक होतकरू तरुण क्रिकेटखेळाडूंत दुःखाची आणि निराशेची दाट छाया पसरली. दिलीपसिंहजींशीं त्यांचा या ना त्या नात्यानें संबंध आला होता. दिलीपसिंहांच्या ऐन उमेदींतला खेळ, क्षयाच्या व्याधीनें मध्येंच तोडलेली त्यांची तेजस्वी उमेद आणि उतरत्या वयांत त्यांनीं क्रिकेटच्या ऊर्जितावस्थेसाठीं घेतलेले परिश्रम आणि सोसलेले अपमान हें सर्व ज्यांनीं पाहिलें किंवा अनुभवलें होतें त्यांना फार फार वाईट वाटलें.

नव्या पिढींतील सर्वसामान्य थरांत त्यांच्या मृत्यूनें फारशी हळहळ दिसली नाहीं. साहजिक होतें. दिलीपसिंहांचा खेळ त्यांनीं पाहिला नव्हता, आणि दिलीपसिंहांनीं आपल्या क्रिकेटसाठीं घेतलेल्या परिश्रमांची त्यांना फारशी कल्पना नव्हती. मैदानांत, पेपरांत किंवा रेडिओंत दिसतो तो प्रत्यक्ष खेळ. सामान्यपणें लोकांना आकर्षण असतें तें या खेळाचें. त्याच्या किचकट घडणीची किंवा जोपासनेची अंतर्गत बाजू त्यांना फारशी माहीत नसते, ती फारशी त्यांच्या समोर येतहि नाहीं—आणि मनांत भरेल, लक्ष खेचील असें त्यांत कांहीं नसतें. लक्षांत राहतो तो प्रत्यक्ष पाहिलेला किंवा ऐकला-वाचलेला प्रत्यक्ष खेळ. दिलीपसिंहांचा खेळ नव्या काय, पण दिलीपसिंहांच्या पिढीतल्याहि अनेक लोकांना दिसलेलाच नव्हता. त्यांचा बहुतेक अभिमान दिलीपसिंहांच्या इंग्लंडमधील एकाच खेळाबद्दलचा आहे. तो ज्यांना ऐकून वाचून परिचित आहे त्यांनाच या धीर दुर्दैवी खेळाडूच्या अकालीं लोपलेल्या तेजाची कल्पना येईल.

नवानगरचे महाराज रणजित सिंहजी, त्यांचे पुतणे कुमार दिलीप सिंहजी आणि पतौडीचे नवाब या तिघां भारतीयांनी इंग्लंडच्या क्रिकेट इतिहासांत मानाचें स्थान मिळवलें. तिघेहि इंग्लिश विद्यापीठातून पुढें आले, इंग्लिश काउंटीसाठीं खेळले, आणि इंग्लंडच्या कसोटी सामन्यांत स्थान पटकावून तिघांनींहि पहिल्याच कसोटी सामन्यांत शतक झळकवण्याचा सन्मान मिळवला. रणजी तर इंग्लंडच्या क्रिकेटचे 'माईल-स्टोन' ठरले. दिलीपसिंहजी आणि पतौडी यांना मात्र प्रकृतीनें ऐन उमेदींत दगा दिला, आणि दोघांनाहि एका काळच्या करामतीवरच बहुतेक आयुष्य काढावें लागलें. पतौडी १९४६ सालीं स्वतःच्या देशाचें नेतृत्व करून गतवैभवाला उजाळा देण्याची संधि मिळाली, पण दिलीपसिंहजी मात्र क्रिकेटला कायमचे पारखे झाले. अवघ्या तीनचार वर्षांची कारकीर्द पाहिली तर क्रिकेटही त्यांना पारखा झाला असं म्हणणें अतिशयोक्तिचें ठरणार नाहीं.

पुतण्या अगदीं थेट चुलत्याच्याच वळणावर चालला होता. केंब्रीज विद्यापीठ आणि ससेक्स परगण्यांतून त्यांचा खेळ बहरला. १९३० सालीं लॉर्डसवर पहिल्या कसोटीच्या पहिल्या डावांत त्यांनीं १७३ धांवा—ऑस्ट्रेलियाविरुद्ध—काढून इंग्लंडच्या संघाला ?जन मिळवून दिलें. दोन-अडीच वर्षांत ते

फक्त बारा कसोटी सामन्यांत खेळले, आणि बत्तीस सालीं प्रकृतीनें त्यांना असहाय बनवलें तुलत्याप्रमाणेंच ससेक्सचें कर्णधारपद त्यांच्याकडे १९३१ सालीं चालून आलें. ओघ्या दोन मोसमांत ससेक्सच्या संघावर त्यांनीं आपल्या कल्पक नेतृत्वाची मजबूत छाप बसवली आणि ससेक्सची मान कळसापर्यंत नेऊन भिडवली.

त्यांची पहिल्या प्रतीच्या खेळाची एकूण कारकीर्द १९२५ ते ३२ पर्यंतचीं. या तुटपुंज्या कारकीर्दींतलीं सुरुवातीचीं तीन चार वर्षांची उमेदवारी सोडली तर खरी कारकीर्द पुऱ्या चार वर्षांचीहि म्हणतां येणार नाहीं. १९३० मध्यें लॉर्ड्सच्या एकाच मैदानावर लागोपाठ तीन सामन्यांत तीन शतकें करून त्यांनीं जवळजवळ पांचशें धावा मिळवल्या. सक्सेस-

— चन्द्रकांत भांडारे

साठीं एका दिवसांत ३३३ धावा काढून दाखवल्या (आजच्या काळांत हें खरेंसुद्धां वाटणार नाहीं !), आणि स्वतःच्या नांवापुढें एकूण-पन्नास शतकें लावलीं.

पण इंग्लिश क्रिकेट रसिक त्यांच्यावर खूष होते ते या शतकांपेक्षांहि त्यांच्या खेळावर. म्हणूनच दिलीपसिंहांच्या मृत्यूची बातमी ऐकतांच इंग्लंडमधले सर्व क्रिकेट-समीक्षक हळहळले. तो काळ अनेकांच्या डोळ्यांसमोर आला. अॅलेक्स बॅनिस्टर म्हणतो, "दिलीपनें गरुडाच्या विलक्षण दृष्टीनें मंद वेगाच्या गोलंदाजांची कत्तल केली, आणि तुफानी चेंडूचा वेग लवचिक मनगटांनीं तोडण्याचें त्यांचें कौशल्य हें वेगवान् गोलंदाजांचें दुःस्वप्न ठरलें."

दुर्दैवानें भारतीय रसिकांना मात्र त्यांचा खेळ फारसा पाहायला मिळाला नाहीं. १९२८ सालीं हिंदूसाठीं पार्शी संघाविरुद्ध एकाच सामन्यांत ते खेळले. त्या सामन्यांत त्यांनीं पहिल्या डावांत ३८ व दुसऱ्या डावांत ८४ धावा केल्या. पण त्या सामन्यांत एल्. पी. जय हे विलक्षण भरांत येऊन वेगानें धावा काढीत होते, त्यामुळें त्या सामन्यांत लोकांचें लक्ष जय यांच्या भराभर वाढत गेलेल्या धावांवर जास्त केंद्रित झालें होतें. त्यामुळें दिलीपसिंहजींच्या सौंदर्यपूर्ण, लयदार खेळाकडे लोकांचें जावें तसें लक्ष गेलें नाहीं !

पण ह्या चौरंगी सामन्यापेक्षांहि त्या आधींचा चांचणी सामनाच त्या वेळच्या रसिकांच्या जास्त लक्षांत राहिला आहे. दिलीपसिंहांच्या कौशल्याचें पहिलें दर्शन तिथें झालें. चांचणी सामना असूनहि केवळ त्यांचा इंग्लंडमध्यें सर्वतोमुखीं झालेला खेळ पाहायला मिळणार म्हणून लोकांनीं गर्दी केली होती. आपला डाव खेळण्यासाठीं दिलीपसिंहजी पुढें आले, कंबरेंत आणि गुडघ्यांत वाकून त्यांनीं पवित्रा घेतला आणि भक्ष्यावर झडप घेण्यासाठीं झुडुपाआड दबून बसलेल्या चित्त्याची आठवण झाली. वेगाचे चेंडू खेळतांना त्यांचीं विलक्षण मनगटें आणि पायांची चपळ हालचाल पाहून लोक थक्क झाले. खांदे उडवणें किंवा उडी मारणें यासारखें दांडगाईचें प्रदर्शन त्यांच्या वृत्तींत नव्हतें. एक किंवा वेळ पडल्यास दोन पावलें पुढें टाकून ते चेंडू अचूक पकडीत. सारें लक्ष गोलंदाजाच्या हातांतून सुटलेल्या चेंडूवर असे. अगदीं थंडपणें तो घेण्यासाठीं ते तयार असत. तो अचूक कुठें पकडायचा, कसा घ्यायचा आणि कुठें पळवायचा याचा हिशेब चेंडू हवेंत असतांनांच ठरत असावा. फलंदाजी ही त्यांची लीला होती. समोरून नजर चकवीत येणाऱ्या चेंडूकडे ते याच लीलेनें पाहात. सुरवातीचा वेग दिलीपसिंहानी हां हां म्हणतां नामोहरम केल्यावर जमशेटजी पटेल हा फसव्या चेंडूचा मुंबईतला त्या वेळचा सर्वांत मोठा व्यापारी पुढें आला. 'जम्सू' त्यावेळीं मुंबईत 'टेरर' म्हणून ओळखला जात होता. त्यानें चेंडू घेतला, आणि दुसऱ्या टोकाला असलेल्या गोडांबेनें दिलीपसिंहांना 'सावध' केलें. दिलीपसिंहानीं शांतपणें एकदां त्याच्याकडे पाहिलें, आणि त्याचा पहिलाच चेंडू 'फुटण्या' च्या आधींच पकडून 'ओसाड' जागीं ठेवून दिला ! आणि मग जम्सूचे सगळे चेंडू त्यांनीं ब्रेक होण्यापूर्वींच पळवून लावण्याचा सपाटा लावला. केवळ पांच षटकांत 'जम्सू'ला असें आढळून आलें कीं असला माणूस आपण पूर्वी कुठें पाहिलेला नाहीं. आणि शेवटीं 'टेरर जम्सू'ला असेंहि कळून आलें कीं दिलपसिंहजींना तो चांगल्या प्रतीचा गोलंदाज होता, हेंच मान्य नव्हतें !

दिलीपसिंहजी नुसते फलंदाज नव्हते. स्लिपमध्येंहि ह्या वाघ झडप घेण्यासाठीं तसाच टपून असे. त्यांनी स्लिपमध्यें घेतलेले झेल अजून आठवतात—आणि त्यांच्या हातून सुटलेल्या झेलाचा झळकलेला नथळाहि अजून स्मरणांत आहे. क्रिकेटच्या सामन्यांत गोलंदाजांबरोबर क्षेत्ररक्षकांनींहि 'स्टार्ट' घ्यायचा असतो हें मुंबईकरांना त्यांनींच प्रथम दाखवलें.

दिलीपसिंहांचा इकडे दिसलेला खेळ एवढाच. पण जो खेळ पुढें त्यांना दाखवतां आला नाहीं तो नव्या तरुणांनीं दाखवावा म्हणून शेवटपर्यंत ते धडपडत होते. तरुण गड्यांच्या शिक्षणासाठीं त्यांनीं केलेली धडपड हीच त्यांची भारतीय क्रिकेटला देणगी होती. इंग्लंडमधल्या क्रिकेटचें अन्तर्बाह्य स्वरूप त्यांच्या वृत्तींत भिनलें होतें. क्रिकेटची ती उंची गाठायची तर कुठून सुरवात केली पाहिजे हें त्यांना माहीत होतें. म्हणूनच हा खेळ शाळेंत रुजवण्यासाठीं त्यांनीं वरपासून खालपर्यंत अनेक धोंडे हलवले. शाळेंतल्या उत्साही मुलांना पाहून त्यांचें मन प्रसन्न होई, आणि त्या प्रत्येकाचा उत्साह कसा 'एक्स्प्लॉइट' करायचा याचे हिशेब त्यांच्या मनांत तयार होत.

क्रिकेटच्या तरुण शिक्षकांच्या शिक्षणाचें कार्य तर ते करीत होतेच, पण त्याव्यतिरिक्तहि अनेक बाजूंनीं ह्या खेळाच्या उन्नतीसाठीं त्यांनीं प्रयत्न केले, आणि परिश्रमहि घेतले. मुंबई राज्याच्या पब्लिक सर्व्हिस कमिशनचे चेअरमन असतांना त्यांनीं सरकारला क्रिकेटसाठीं करतां येणाऱ्या अनेक गोष्टींची जाणीव करून दिली. मुंबईतील मोठमोठीं मैदानें प्रदर्शनांसाठीं राखून मुलांना प्रॅक्टिसपुरतीहि जमीन मिळूं न देण्याच्या व्यापारी कारवायांना त्यांनीं आपल्या स्थानावर राहून लगाम घालण्याचा प्रयत्न केला. मुंबई सरकारचें क्रिकेटकडे परवां परवांपर्यंत फारसें लक्ष नव्हतें, दूषित ग्रहहि निर्माण झाला होता. पण सरकारी स्थानावर राहून त्यांनीं ह्या ग्रहांत बदल करण्यासाठीं बरेच परिश्रम घेतले. स्पष्टपणामुळें आपल्या स्थानाला धक्का लागेल याचीहि त्यांनीं पर्वा

( पान ८० वर )










# गेले ते दिवस

**केशवराव भोळे**

होय ! खरोखरच ते दिवस गेले ! आतां ते येणार नाहींत क्का ! कुणी सांगावें येतील किंवा नाहीं म्हणून ? कारण ज्या वृत्तीनें, ज्या शिरिरीनें त्या काळीं क्रिकेट खेळला जात असे ती वृत्ति हल्लींच्या एखाद्याच खेळाडूंत दिसते ! मग ते दिवस, तो काळ पुनः येईल असें कसें म्हणावें ? त्या काळांत म्हणजे १९०० ते १९३० सालपर्यंत महाराष्ट्रांत अव्वल दर्जाचे नेते, विद्वान् कर्तबगार लोक होऊन गेले; नट, नाटककार, गायक, चित्रकार होऊन गेले. मराठी जीवनाची सर्वच क्षेत्रें, अंगें गुणी आणि कर्तबगार लोकांनी समृद्ध होऊन गेली होती. तेव्हां त्यांत क्रिकेटसारख्या क्रीडेची बाजूच उणी कशी राहील ? वर्तमानपत्रें, मासिकें, नियतकालिकें ज्यांच्या फोटोंनीं, पराक्रमांनीं भूषविली त्या प्रसिद्ध खेळाडूंखेरीज त्यांच्या जवळपास येणारे किती तरी खेळाडू महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत होऊन गेले. त्यांचीं नांवें त्या विभागांतच प्रसिद्ध होतीं. पुण्या-मुंबईच्या वर्तमानपत्रांनीं त्यांना प्रसिद्धी दिली नसली तरी ते क्रीडेचा आनंद लुटण्याकरतां खेळत होते. मनगटाचें तेज व चापल्य दाखविण्याकरतां क्रिकेट खेळत होते. आज प्रसिद्धिलोलुप खेळाडूंची होत असलेली धडपड, आणि विक्रम करण्याकरतां दिवसभर कष्ट करणारे ते कावाडी पाहिले म्हणजे त्या काळच्या क्रीडापटु कलावंतांची आठवण होते त्यांच्या चमकदार खेळाची आठवण येऊन ऊर भरून येतो. ते खेळांतील कलावंत ( Artists ) होते. आज त्याच क्रीडांगणावर कावाड्यांची गर्दी दिसते. ते लंच पूर्वी फळ्यावर शतक झळकवून आम्हां प्रेक्षकांच्या टाळ्यांच्या गजरांच्या मानाच्या मुजऱ्याचा स्वीकार करीत तंबूत दिमाखानें परतत असत व मागच्या खेळाडूंना धावा काढण्यास भरपूर वाव देत असत. आज जणुं काय मला एकट्यालाच खेळायचें आहे, अमक्याच्या धावांचा विक्रम मोडायचा आहे अशा स्वार्थ बुद्धीनं खेळणारे व दिवसभर टुकुटुकु खेळून कसेबसे शंभर काढून दमले-भागलेले, त्राण नसलेले फलंदाज दीनवाण्या चेहऱ्यानें पॅव्हिलियनमध्यें कसेबसे येऊन पोचलेले दिसतात. असला रुक्ष खेळ पाहिला कीं त्या उदास भयाण स्टेडियममध्यें भर गर्दीत आजाद मैदानावरील ते बाळू, तो विठ्ठल, तो शिवराम, तो नायडू, तो रामजी, चंदाराणा, पुण्याचे युसुफ बेग, देवधर उभे राहतात; एस. एम्. जोशी यांचे लोंबते फसवे चेंडू दिसूं लागतात, रामजीच्या तुफान गोलंदाजीनें निष्णात फलंदाजांच्या तीन्ही दांड्या आडव्या पडलेल्या दिसतात, ' मेट्रोकडे ' आकाशांतून विमानाप्रमाणें भरारी मारणारा नायडूनें मारलेला चेंडू दिसूं लागतो अंगावर रोमांच उभे रहातात. अन् सहजच उद्गार निघतात, " तो होता खरा खेळ ! अन् आतां ? जाऊं द्या, गेले ते दिवस !" मुंबईत असूनहि ज्यांनी विठ्ठल, जय, नायडू, कर्नल मिस्त्री, युसूफ बेग यांची चमकदार फलंदाजी पाहिली नसेल चंदाराणा, रामजी, पी. बाळू, एस्. एम्. जोशी यांची वेगवान् आणि फिरकी गोलंदाजी पाहिली नसेल, पावरी, विठ्ठल, शिवराम, दळवी, नायडू यांचें चपळ व अचूक क्षेत्ररक्षण पाहिलें नसेल ते दुर्दैवी असेंच मी म्हणेन.

१९०३ साली मी आयुष्यांतील पहिला क्रिकेटचा उत्तम सामना यवतमाळला पाहिला यवतमाळ हें आडगांव नुकतेंच विदर्भांतील जिल्ह्याचें गांव झाल्यानें तेथें इंग्रज अधिकाऱ्यांची भरती फारशी झाली नव्हती. परंतु अमरावती जिल्ह्याचा क्रिकेटचा जो संघ खेळायला आला होता त्यांत सर्व सिव्हिलियन गोरे अधिकारी होते. त्यांत कांहीं ऑक्सफर्ड केंब्रिज ' ब्ल्यू ' म्हणून गाजलेले खेळाडू होते. यवतमाळचा संघ धोतराचा काचा घातलेल्या ' भट ' खेळाडूंचा होता. अपवाद होता एक पारशी ! एंजिनियर हिरजी हा एकटाच विजारीतला खेळाडू होता पण धोतरातल्या खेळाडूतल्या भाटवडेकर व पृथ्वीगीर हरिगीर ऊर्फ हरिकिशोर या दोघा गोलंदाजांनीं साहेब लोकांची हजेरी घेतली. क्रिकेटचा जामानिमा करून आलेला प्रत्येक गोरा खेळाडू स्टान्स घ्यायचा अन् वरील गोलंदाजांनीं एकदोन चेंडूंतच त्याचा त्रिफळा उडायचा, किंवा झेल तरी उडायचा, आणि तो बिचारा ऑक्सफर्ड केंब्रिजची आठवण करीत रिकाम्या बॅटीसह तंबूंत परत यायचा. नामांकित गोऱ्या खेळाडूंना हे आमचे धोतरवाले खेळाडू अक्षरशः खडे चारीत असलेले पाहून टाळ्यांचा कडकडाट होत होता, हास्याचे प्रचंड फवारे उडत होते. हें दृश्यच मोठें मौजेचें होतं. कुठे ते शुभ्र नीटनेटके पोशाक केलेले, पॅड्स-गॉटलेट्सनें सुसज्जित असलेले गोरे खेळाडू, अन् कुठे आमचे सामान्य धोतरांतले ( त्यांतले कांहीं अनवाणीच ! ) नेटिव्ह ( हा साहेबांचा त्या काळचा आवडता तुच्छतादर्शक शब्द ) खेळाडू ! या भटांनीं साहेबांच्या भराभरा दांड्या उडवाव्यात, कुठलेंहि पद्धतशीर शिक्षण न घेतलेल्या या एकलव्यांनीं तरबेज साहेबांचा दोन तासांत धुव्वा उडवावा हें दृश्य साहेबांना लाजिरवाणें करणारें होतेंच, पण त्याकाळीं स्वराज्यप्राप्तीकरतां चळवळ करणारे महाराष्ट्रांतील टिळकांच्या राष्ट्रीय वृत्तीच्या बाणेदार, वृत्तींच्या मराठी खेळाडूंना विशेष भूषणावह वा त होतें. विशेषतः त्यांना पाठिंबा देणाऱ्या आम्हां प्रेक्षकांना ! कर्झनशाहीचे चटके बसणाऱ्या नेटिव्ह प्रेक्षकांना ! त्यांतून पृथ्वीगीर हरिगीर ऊर्फ हरिकिशोर हे टिळकभक्त होते. यवतमाळ येथील " हरिकिशोर " या राष्ट्रीय बाण्याच्या साप्ताहिकाचे ते तेजस्वी संपादक होते. त्यांनीं साहेबांची दांडी उडविली कीं प्रेक्षकांत ' जिरली ' ' वेल्बोल्ड ', या आरोळ्या उठत. गोऱ्या खेळाडूंना उसन्या खिलाडूपणामुळें ही होत असलेली आपली फजिती

( पान ७३ वर )



अनुक्रमणिका





# हिंदी क्रिकेट काल आणि आज



— वा र क री

लॉकरच तिसरा, हिंदुस्थान-ऑस्ट्रेलिया कसोटी सामना मुंबईत सुरू होणार. चाळीस हजार माणूस दररोज गर्दी करील; हे तिकीटधारी. त्याशिवाय वशिल्याच्या फटींतून आणखी चारदोन हजार आंत घुसतील. रविवारी आणि सुटीच्या दिवशीं आंकडा थोडा चढाच राहील. या सगळ्या यात्रेपैकीं एकचतुर्थांश–पंचमांश महिला. त्या क्रिकेट संबंधीं कुतूहलानं प्रश्न विचारतील, अन्य विषयांसंबंधीं मोकळेपणानें बोलतील आणि उत्साहानें खातील. पुरुषवर्गापैकीं कांहीं शिमगा करतील, कांहीं बोळे, साली, टरफलें असलीं अस्त्रें इतरांवर, कधीं खेळाडूंवर सोडण्याचा पुरुषार्थ दाखवतील. उरलेल्यापैकीं एक-तृतीयांश एकाग्रतेनें खेळ सोडून अन्यत्र पाहातील; उरलेल्यापैकीं निम्मे समोरचा खेळ पाहाण्याचा प्रयत्न करतील, हे सगळे वजा जाऊन राहातील ते मन लावून बोलत राहतील.

हे बोलणारे सहसा तिशीपारचे; त्यांच्या बोलण्याचें पालुपद एकच–' गेले ते दिवस. ' आठवणींची अभ्रें नाचूं लागतात. त्यापलीकडे जुना काळ आणि जुने देखावे उभे राहातात. वीस वर्षापूर्वीचे या स्टेडिअमवरील पंचरंगी सामने; आणि त्यापूर्वीचे कापाच्या मैदानावरील चौरंगी सामने. हा असला खर्चिक भपका तेव्हां नव्हता. आजच्याहून प्रेक्षक कमी असत. फार कमी, पण खेळ पाहाणारे आजच्याहून अधिक, विशेषतः समजून पाहाणारे. (तासन् तास खेळ ऐकण्याचीं फॅशन वीस वर्षापूर्वी पडली, त्यापूर्वी ऐकायचें म्हणजे याचि डोळा पाहून आलेल्या भाग्यवंताकडून रात्रीं शिळोप्याला...) स्टेडियम समोरील अजस्र पण कळाहीन (आणि कलाहीन) ' क्लबहाऊस ' मधून मैदानावर येतांना खेळाडू किती क्षुल्लक वाटतो; तेंच पूर्वी बॉम्बे जिमखान्याच्या ठुसक्या, ठुबक, हिरव्या इमारतींतून बाहेर पडतांना त्याचा रुबाब कसा डोळ्यांत भरायचा...आणि ते पुण्यश्लोक खेळाडू संध्येंतल्यासारखी जो तो नांवें पुटपुटायचा—विठ्ठल आणि देवधर आणि नायडू आणि वझीर आणि जय आणि कोला आणि बाळू आणि एस्. एम्. जोशी आणि चंदाराणा आणि रामजी आणि—तरण्या आठवणीतले, निसार, अमरसिंग, मर्चंट, मुश्ताक, हजारे, इलाही, सी. एस्. आणखी कोणाकोणाची खासगी दैवतें...

अर्थात् ' गेले ते दिवस ' हे पाल्लुपद सगळ्यांच क्षेत्रांत वाजत असतें. मनुष्यस्वभाव आहे तो, विशेषतः हिंदी राजकारण, साहित्य, रंगभूमि–सगळ्यांतच जुन्या काळाचें वैभव फुगून दिसतें; आजचा काळ क्षुद्र वाटतो. फार कशाला, खाण्यापिण्याचीहि चव उतरते...' गेलें त्या दिवसाचें (किंवा आजीचें) थालिपीठ ' (किंवा ऑम्लेट त्या कोंबड्याच निराळ्या!)—मग खेळांतहि तेंच. पुढ्यांत वाढलेलें मीठ अळणी!—वयाबरोबर रुचीहि कोमेजू लागते.

हें सगळें खरें. पण एखाद्या क्षेत्रांत आपली प्रगति अशी उफराटी असते कीं नव्याचा कट्टर अभिमानी देखील हिरमुसला होतो. उदाहरणार्थ, क्रिकेट. गेल्या पांचसात वर्षांत हिंदी क्रिकेटची जी दुर्दशा झाली आहे ती झांकायला कोणचा अभिमान पुरा पडणार !

गतवर्षी वेस्ट इंडीज संघानें आपली अब्रू घेतली. गेल्या पावसाळ्यांत इंग्लंडला गेलेल्या आपल्या संघाची कर्तबगारी अशी कीं प्रतिष्ठित टेस्ट-सामन्यांनून हिंदुस्थानला







गाळावें अशी भाषा तेथें सुरू झाली. आतां पहिल्या कसोटी सामन्यांत ऑस्ट्रेलियानें आपला धुव्वा उडवला; त्यावरून पुढचें लक्षण पुरें दिसतें. येत्या वर्षी पाकिस्तान येणार. नुकतीच पाकिस्ताननें ऑस्ट्रेलियाला विशेषतः शेवटच्या सामन्यांत–ज्या दमदारपणें लढत दिली त्यावरून आपलें काय होणार याविषयीं जबर शंका वाटूं लागली आहे. शेवटीं आंतरराष्ट्रीय क्रिकेट–वर्गात आपला देश नंबर लागणार का ?

पण हा केवळ जय-पराजयाचा, प्रश्न नाहीं धांवांच्या अंकगणितांचा कागदी हिशेब नाहीं. पराजय झाला तरी नामुष्की झाली नाहीं, असें पूर्वी आपलें नाक वर असे. असें कोणाचं कौशल्य झळकून जाई कीं प्रतिस्पर्धी थक्क व्हावा, नतमस्तक व्हावा, १९३२ च्या इंग्लंडच्या दौऱ्यांत निसार अमरसिंगच्या चेंडू-सलामीनें साहेबाला धडकी भरे; सी. के. नायडूच्या खेळ-शैलीनें तो थरारून जाई—पूर्वी रणजी अथवा पतौडी अथवा दुलीप-सिंगाच्या शैलीनें जाई तसा. १९३६ च्या दौऱ्यांत मुस्ताकनें आणि अमरनाथनें तो हिंदी ढंग दाखवला, आणि विजय मर्चंटनें त्यांना साथ दिली. दहा वर्षांनीं पुन्हां एकदां साहेबांनीं तें कसब पाहिलें. तेव्हां विजय हजारेहि होता. १९५२ सालीं वाताहात झाली, पण त्यांतहि कोठें कांहीं उठून दिसलं. यंदा मात्र सगळे सपाट. मधल्या वर्षात सुभाष गुप्तेच्या फिरकीची झळाळी गाजली, पण ती किती लवकर मावळली. फार लहान वयांत त्याची जादुगार बोटं आखडली !

काल परवापर्यंतची गोष्ट अमका खेळतो आहे असें ऐकलं कीं माणसें मैदानाकडे धांव घेत. डोळे भरून त्याचा खेळ पाहात, आणि तो बाद झाला कीं परतले कामावर. ज्यांच्या-साठीं गर्दीला भरती यावी असे बहाद्दर खेळाडू होते. तसले असाधारण तन्त्र असे. खास नखऱ्याचे कमावलेले फटके असत. जाणकार प्रेक्षक ते पाहून डोळ्यांचे पारणें फेडायला जाई. सी. के. ची 'सिक्सर पोरासोराला नाचवी, पण त्याची नजाकतीची लेटकट विशेषतः किंवा मुस्ताकची, किंवा मर्चंटची, पुन्हां प्रत्येकाचा निराळी लज्जत तसाच सी. के. चा लेग-ग्लान्सहि आणि विठ्ठलचा ऑफ-ड्राइव. आणि देवधर तात्यांचा चॉप, आणि अमरनाथचा स्टेट-ड्राइव आणि हजा-रेचा कव्हर-ड्राइव...असल्या गोड आठवणीचे मोहोळ उठतें.सामन्यांचा फासा कसाहि पडो त्यांनी खेळाची शान दाखवली...

आज सामन्याचा फासा न चुकता उलटा पडतोच; म्हणजे नशीब दुबळें, पण खेळ त्याहूनहि दुबळा. कुणाचा खास फटका नाहीं खरें म्हणजे फटकाच क्वचित् ! चेंडूच बॅटीला आपटून यदृच्छेनें कोठें जाईल तो ! त्याला उद्दामपणें टोलविणारा, बॅटीची रग दाखवि-णारा खेळाडू अगदींच अपवादासारखा झाला आहे; अवघें लक्ष धांवांच्या फळ्याकडे, हिशेबाकडे. खुरडत-कुंथत एकेक धांव गोळा करायची. इतकें करून शेवटीं हिशेब जमत नाहीं, आणि सपशेल पराभव आहेच. म्हणजे गाढव गेलें आणि ब्रह्मचर्यहि गेलें !

आमचे सलामीचे खेळाडू पाहा. कमींत-कमी धावा करायला जास्तींतजास्त वेळ घेण्याची त्यांची करामत केवढी गाजत आहे. जलद बोलिंगनें त्यांना कापरें भरतें; मंद गतीच्या फिरक्या गोलंदाजीलाहि ते फार जपून खेळतात. प्रेक्षकाला कष्ट होतात. माहितगाराला मुस्ताकची राहूनराहून आठवण येते. तो पहिला खेळायला येई, आणि आल्यापासून विजेसारखा लवलवत थैमान घाली. चेंडूचा पल्ला किंचित उणा पडला कीं त्यानें आपली बेगुमान बॅट फिरवलीच. चैतन्याच्या या दर्शनामुळें प्रेक्षक आनंदानें पुलकित होई; नसांतून तो आनंद भरून घेई. आतां सगळें शांत शांत;—म्हणजे मैदानावर; म्हणून प्रेक्षक थैमान घालतो !

हेंच थोड्याफार फरकानें, त्या खेळाच्या इतर शाखांत. आपल्या बोलिंगच्या धडाक्या-बरोबर तुमच्या काळजाचे ठोके जलद करील असा बोलर नाहीं; मग स्टेडिअमवर तुमचें काळीज फालतू गोष्टीकडेच वळणार ! त्याला तरी करमणूक हवीच !—आणि खेळ पाहातांना किंवा खेळाविषयीं वाचतांना सगळें नीरस वाटलें तरी आपल्या क्रिकेटमध्यें आतां एक सुरस भाग आहेच–तो म्हणजे त्या खेळा-मागील राजकारण. त्याचें चर्वण आपण केवढ्या आवडीनें आणि अटीतटीनें करतो. क्रिकेटच्या मैदानावर नसला तरी त्याच्या खलबतखान्यांत केवढा रंग भरतो !

तरीसुद्धां आम्ही हा कसोटी सामना पाहा-यला जाणार. अगोदर तिकिट मिळविण्यासाठीं खेटे घालणार, मनधरणी करणार; नंतर गर्दीत उबवून घेणार; जांभया देणार, डोकें-दुखी मिळविणार, बोटें मोडणार—आणि मग बोलणार. अर्थात् बोलणार तें कालच्या क्रिकेटविषयीं—त्या वीर गड्यांविषयी—आणि धन्य होणार. कालच्या क्रिकेटच्या तोंडी लावण्यावर आजच्या क्रिकेटला तोंड देणार !

○ ● ○

## नो बॉल !



केंब्रिजला किंग्ज कॉलेज व ट्रिनिटी कॉलेजचा सामना चालू होता. पहिल्या डावांत ट्रिनिटी संघ कांहींही धांवा न करतांच परतला. आतां किंग्ज कॉलेजची पाळी होती. सामना जिंकण्यासाठीं खेळून एकच धांव मिळविणें जरूर होतें. पण न खेळतांच किंग्ज संघानें तो सामना जिंकला. ट्रिनिटी संघाच्या गोलंदाजानें चेंडू फेकण्यास सुरवात केली तोंच त्याचे पाय रेषेबाहेर जातांच "नो बॉल" म्हणून अंपायरनें पुकारलें आणि किंग्ज कॉलेजच्या संघास न खेळतांच विजय मिळाला.







# क्रिकेटचें खरेंखुरें वैभव !



बाळ ज. पंडित M. A., LL. B.

" There is no doubt that of all the--fascinating aspects of the batsman's art, the most thrilling one for the spectator is when a great hitter opens his shoulders and dispatches the ball to wreck the roofs distant towns."

जेराल्ड ब्रॉडब्रीचें हें मत अगदी तंतोतंत बरोबर आहे असें मला वाटतें. पॅव्हिलियनच्या पायऱ्या झपाझप उतरून जेव्हां एकादा फलंदाज हिरवळीवर पाऊल टाकतो व मोठ्या दिमाखानें स्टंपच्या रोखानें चालूं लागतो आणि स्टंपपाशीं आल्यावर आपले खांदे उंचावून व बॅट फिरवून समोर पडणारा चेंडू अंतराळांत उंच चढवितो तेव्हांचें मैदानाच्या मध्यावरचें तें दृश्य जितकें आकर्षक व मोहक असतें तितकेंच तें रोमहर्षक व अविस्मरणीयहि असतें. त्या वेळीं हिरव्या मैदानावर चालणारी ती तांबडी टोलेबाजी पाहून प्रेक्षक अक्षरशः वेडे होऊन जातात. संथपणें खेळून एक-एक दोन-दोन धांवा जमविणाऱ्या फलंदाजापेक्षां चेंडूवर चेवानें तुटून पडणारा फलंदाजच प्रेक्षकांना अधिक आवडत असतो आणि म्हणूनच फलंदाजांतील स्वैर फटकेबाजीची जी एक रम्य कला आहे तीच प्रेक्षकांना थरारून सोडत असते व तीच त्यांना विशेष प्रिय झालेली असते. 'क्रीडांगणावरील षट्कार आणि चौकार' बघण्यासाठींच खरे म्हटलें तर प्रेक्षक मैदानावर आलेले असतात. संथपणानें चाललेला नीरस खेळ पाहणें त्यांना रुचत नाहीं. असा कंटाळवाणा खेळ पाहण्यापेक्षां सामना न पहाणेंच बरें असें त्यांना वाटत असतें.

शास्त्रीय पद्धतीनें केलेल्या फलंदाजीचें महत्त्व मला पूर्णपणें कळतें. केवळ फटकेबाजी म्हणजे फलंदाजी नव्हे हेंहि मला समजतें. पण तांत्रिक पथ्य न पाळतां केलेल्या टोलेबाजीलाहि दुसरी बाजू आहे.

कानाला जें गोड लागतें तें उत्तम संगीत अशी सर्वमान्य रसिकांची उत्तम संगीताबद्दल व्याख्या असते मग डोळ्यांना जी आल्हाददायक व आकर्षक वाटते ती फटकेबाजी सुंदर व कलात्मक कां म्हणूं नये ! कलेचा उद्देश माणसाच्या मनाला आनंद देणें हा आहे. जर अशा घडाकेबंद फटकेबाजींत माणसाला आनंद देण्याची शक्ति आहे, तर मग त्या प्रकारची फटकेबाजी करण्यांत कला आहे असें कां म्हणूं नये !

खेळ कितीहि शास्त्रशुद्ध पद्धतीनें होत असे, पण त्यांत चमक नसली, तडफ नसली, तर तो खेळ सत्त्वहीनच नव्हे काय ! शास्त्रशुद्धपणा हें फलंदाजीचें शरीर होय. आत्मा नव्हे. फलंदाजीचा आत्मा किंवा प्राण म्हणजे त्यांतील प्रेरणायुक्त चमकच होय. तंत्रबद्धता व चमकदारपणा--या दोन्हींची फलंदाजीमध्यें सांगड घातलेली असेल तर उत्तमच. पण नुसती शास्त्र शुद्धताच त्यांत असली व चमक नसली तर त्याचा काय उपयोग ! उलट पक्षीं एक वेळ शास्त्रशुद्धपणा खेळांत नसेल, पण त्यांत आवेग आणि आवेश व तडक आणि चमक असेल तर प्रेक्षकांचीं मनें जिंकलीं गेलींच म्हणून समजावें. कारण अशा खेळांत हृदय हलवून सोडण्याचे व अंतःकरण थरारून सोडण्याचे गुण असतात. अशा खेळांत सामर्थ्य असतें. नयनरम्य किंवा चित्तथरारक प्रसंगांचें विलोभन किंवा आकर्षण माणसाला निसर्गतःच असतें व असे प्रसंग पाहून आनंदित होणें हा त्याचा मनोधर्मच असतो. क्रिकेटमध्यें रोमहर्षक व साहसयुक्त फलंदाजीचें आकर्षण प्रेक्षकांना अगदीं जबरदस्त असतें तें यामुळेंच !

फलंदाज पवित्रा घेऊन उभा आहे, समोरून चेंडूमागून चेंडू पडत आहेत, ते विनासायास तटविले जात आहेत किंवा गोलंदाजाकडे 'साभार परत' केले जात आहेत, मागें यष्टिरक्षकाच्या उठाबशा चालू आहेत, गोलंदाज धांव घेऊन व तावातावानें चेंडू टाकून पिचून जात आहे, क्षेत्ररक्षक एका जागीं स्तब्धपणें उभे आहेत; मध्येंच एकादा चेंडू त्यांच्या दिशेनें आला तर तो अडवायचा, गोलंदाजाकडे फेंकायचा, त्याचें चक्र सुरू करून द्यायचें व इकडे आपण पुनश्च निश्चलतेनें उभें राहायचें हा त्यांचा क्रम चालू आहे . सारेच मंद, शांत, स्थिर आणि गंभीर ! फलंदाजाच्या चेहऱ्यावरची माशी हलूं नये म्हणजे त्याचा चेहरा जसा मख्ख दिसेल तशीच या वेळीं मैदानाला अवकळा आलेली असते. प्रेक्षकांच्या चेहऱ्यावर आनंदाची किंवा हास्याची रेषा उमटलेली नसते





अनुक्रमणिका

तेथें मार्मिक आठ्यांचें जाळें पसरलेलें असतें. आणि त्यांचीच काय ती खिन्न हालचाल चालू असते. निर्विकारपणानें आणि हताश होऊन ते मधूनमधून पंख्याचा वारा घेत असतात. मग कांहीं वेळानें केव्हां तरी कुठें तरी टोलवलेल्या चेंडूमुळें एकादी धाव फळ्यावर चढवली जाते, आणि कधींकाळीं पन्नास वा शंभराचा आकडा झळकल्यास मैदानाच्या कोणत्या तरी कोपऱ्यांतून थोड्याफार टाळ्या पडलेल्या ऐकूं येतात. नि परत सारें कांहीं शांत होऊन जातें.

अर्थात शुद्ध, तांत्रिक फलंदाजी पांच टीकाकारांना खूष करूं शकेल, पण खैर, अनिर्बंध फटकेबाजी पन्नास हजार प्रेक्षकांना सुखवूं शकते ! इतकें या तडफदारपणाच्या फलंदाजीस महत्त्व आहे हें नाकबूल करून चालणार नाहीं. ही अमर्याद फटकेबाजी थांबवण्यासाठीं मैदानावर गोलंदाजांची आणि क्षेत्ररक्षकांची जेव्हां ' धावपळ ' चालू होते, तेव्हां ती पाहण्यासाठीं तिकिटाकरतां मैदानाबाहेरहि धावपळ सुरू होते.

अशा फटकेबाजींत जसा बेदरकारपणा दिसतो तसा बाणेदारपणाहि दिसून येतो. हिच्यांत जोष असतो आणि जोमहि असतो. नियमांना झुगारून बंधनाच्या पलीकडे जाण्याची ईर्षा या फटकेबाजीमागें असते.

गगनाला गवसणी घालायला पाठविलेले हे चेंडू प्रेक्षकांची दृष्टि दिपवून टाकतात व त्यांचीं मनें हरखून सोडतात. आणि म्हणूनच मैदानावर अशी ही चौफेर फटकेबाजी चालू असली कीं आपल्या दिशेनें चेंडू फटकारणाऱ्या फलंदाजाची, प्रेक्षक मनसोक्त स्तुति करीत असतात आणि उंच उंच चेंडू टोलविणाऱ्या त्या फलंदाजाकडे ते मोठ्या आदराच्या आणि कौतुकाच्या भावनेनें बघत असतात. असाच एखादा षट्कार मारला गेला तर सारे प्रेक्षक जागचे उठून, अंतराळांत भरारी मारणाऱ्या त्या तांबड्या ठिपक्याकडे अनिमिष नेत्रांनीं बघत असतात. मात्र यांतच जर का एखादा टोला हवेंतून सीमापार होण्याऐवजी मध्येंच मैदानावर क्षेत्ररक्षकाकडून झेलला गेला तर ती सर्वच्या सर्व प्रेक्षक-जमात निराश होऊन सहस्रावधि जिभांनीं चुकचुकूं लागते. शिताफीनें झेल पकडणाऱ्या त्या क्षेत्र-रक्षकाची तारीफ न करता उलट बाद होऊन तंबूकडे परतणाऱ्या त्या फलंदाजाकडेच सारे प्रेक्षक केविलवाण्या नजरेनें पाहूं लागतात. कांहीं जण तर त्या क्षेत्ररक्षकालाच लाखोली वाहूं लागतात. कारण त्या समोरच्या चालत्या हालत्या मनोरम देखाव्याचा नाश करण्यास तो कारणीभूत झालेला असतो. सारांश, अशाच मनोदृश्याशीं सारे प्रेक्षक इतके तद्रूप होऊन गेलेले असतात !

या षट्कार चौकारांमुळें त्रयस्थ प्रेक्षकांना जर इतका आनंद होत असतो तर असे टोले लगावणाऱ्या खुद्द त्या फलंदाजाला किती मनमुराद आनंद मिळत असेल याची कल्पनाच केलेली बरी ! अशा वेळीं, गालावर चाराची चपराक बसल्यामुळें जीव घेऊन चौखूर पळत सुटणाऱ्या त्या चेंडूकडे पाहून फलंदाज आनंदातिशयानें अक्षरशः मोहरून निघत असतो. फलंदाज जेव्हां षट्कार मारतो तेव्हां त्याला वाटत असतें कीं आपण खुद्द गोलंदाजालाच दोन्ही हातांनीं धरून सीमापार भिरकावून दिलेलें आहे. क्षेत्ररक्षकांना चुकवून किंवा त्यांचें वर्तुळ छेदून जेव्हां एकादा फलंदाज चेंडू तंबूकडे फटकारीत असतो तेव्हां त्याला वाटत असतें कीं आपण गनिमी काव्यानें शत्रुपक्षांतील सैनिकांच्या हातावर तुरी देऊन किंवा बेफामपणें त्यांची कोंडी फोडून किल्ल्यांतच प्रवेश केलेला आहे. अशा वेळीं गोलंदाजाच्या पडलेल्या चेहऱ्याकडे पाहातांना किंवा हताश झालेल्या क्षेत्ररक्षकाकडे पाहतांना त्याला मनांतल्या मनांत अपरंपार आनंद होत असतो. खरोखर पाहतां, अशा वेळीं तो फलंदाज म्हणजे, ' समोर दिसणाऱ्या सर्व साम्राज्याचा सम्राट ' असतो. शरीरवेधी आपटबारांना मोठ्या रुबाबानं ' लेग ' कडे ' पुल ' करतांना यथोचित टप्प्यावरील चेंडू जोरदारपणें कव्हरमधून फटकारतांना, आखूड टप्प्याचा ऑफब्रेक मागें येऊन स्टंप्स कव्हर करून लेगकडे ओढतांना, ' लेग स्टंपजवळून जाणारा चेंडू मोठ्या ऐटीनें ' ग्लान्स ' करतांना, आणि नंतर सर्व प्रेक्षकांवरून विजयी मुद्रेनें दृष्टि टाकतांना फलंदाजांना आत्यंतिक व पराकाष्ठेचा आनंद होत असतो. प्रेक्षक त्याच्या नांवाचा जयघोष करीत असतात, स्वपक्षांतील खेळाडूंचा व नेत्याचा आनंद, वाढणाऱ्या धांवांबरोबर अधिकच वाढत असतो, त्याच वेळीं प्रतिपक्षाचा धीर खचत असतो; धांवा नोंदणी पुस्तकांतील संघाच्या धावसंख्येंत चार–चार सहा–सहा धावांची भर पडत असते, त्या तिकडे पलीकडे उंचावरील त्या लहानशा खोलींत कॉमेन्टेटर ' स्प्लेंडिड, ' ' मॅग्निफिसेंट, ' ' ब्यूटिफुल ' अशा गोंडस शब्दांची खैरात करीत असतो. सारांश, क्रीडांगणावरील बहरलेल्या व फुलून गेलेल्या अशा ह्या वातावरणांत खेळणें म्हणजे मानसिक आनंदाची व समाधानाची परिसीमा गांठण्यासारखेंच असतें ! अशा वेळीं त्यांच्या खेळांत कोलंबसाची ईर्षा असते, तेनसिंग-हिलेरीची धडाडी असते आणि शिकंदराचा लढाऊ बाणाच संचरलेला असतो. त्यांच्या खेळांतील तें तेज व चमक पाहून खुद्द चेंडूचीहि 'चमक' फिकी पडलेली असते. असा हा बॅटधारी फलंदाज जेव्हां तंबूकडे परततो तेव्हां चोहोंकडून वाजणाऱ्या टाळ्यांच्या कमानी खालूनच तो चालत आहे असेंच बघणाराला वाटत असतें. क्रीडांगणावरून मोठ्या डौलानें व रुबाबदारपणानें परतणारा तो फलंदाज पाहिला म्हणजे रणांगणावरून घरीं परतणाऱ्या शूर विजयी

( पान ७७ वर )

## हॅट ट्रिक



साधारणपणें लागोपाट टाकलेल्या तीन चेंडूंत तीन गडी बाद झाले, तर तो कौतुकास्पद पराक्रम गणला जातो. इंग्लंडमध्यें पूर्वीं अशा पराक्रमी गोलंदाजाला बक्षीस देण्यासाठीं हॅट फिरवून प्रेक्षकांतून रकम गोळा केली जात असे व प्रेक्षकहि हौसेनें यथाशक्ति देणगी देत असत. ह्याच प्रथेवरून ह्या तीन गडी लागोपाठ बाद करण्याच्या पराक्रमाला ' हॅट ट्रिक ' असें नांव पडलें.

( पान ६८ वरून चालू )

उघड्या डोळ्यांनीं पहाणें प्राप्त होतें ! निदान क्रिकेटमध्यें आपण साहेबांवर मात करून त्यांची फजिती उडवितों याचा आनंद प्रेक्षकांना फार होत होता. राजकारणाचा तो एक विशिष्ट रंग त्या सामन्यांना त्या काळीं चढत असे. साहेबांचा डाव संपवून हरिकिशोर आणि भाटवडेकर यांनीं साहेबाची गोलंदाजी इतकी चोपली आणि त्यांना उन्हांत मैदानभर पळायला लावून इतकें दमविलें कीं क्षेत्ररक्षण करण्याचें त्राणच त्यांच्यांत उरलें नाहीं. याचा फायदा हिरजीनें खूप घेतला. त्यानें नंतर अर्ध्या अर्ध्या पिचवर पुढें येऊन षट्कार-चौकारांचें सत्र सुरू करून साहेबांची हवेलंडी उडविली. भाटवडेकर व हरिकिशोर यांचे ऑफकडील कट व ड्राइव्हस इतके प्रेक्षणीय होते कीं या नेटिव्हांनीं नुसतें आपला खेळ पाहूनच आपल्यावर ताण करावी याचें साहेबांना नवल वाटलें. भाटवडेकरांची या साहेबांनीं खुबीनें बदली करवून त्यांना अमरावतीस नेलें. हरिकिशोर सरकारी नोकर नसल्यामुळें त्यांची बदली करतां येईना. त्याखेरीज सरकारच्या विरोधी, म्हणजे टिळकांच्या पक्षांतले ते ! परंतु हा सिद्धहस्त खेळाडू पुढें फार वर्षे जगला नाहीं. पण क्रिकेट ( व राजकारण ) यांत नांव मागें ठेवून हरिकिशोर गेले. गणपतराव भाटवडेकरांच्या चमकदार खेळाची आठवण आजहि होत असते. भाटवडेकरांनीं आपल्या तुफान गोलंदाजीमुळें या ऑक्सफर्ड केंब्रिज प्रसिद्ध फलंदाजांच्या दांड्या त्यांची बॅट उचलली जाते न जाते तोंच उडवाव्यात हें क्रिकेटविषयक शिक्षण न घेतलेल्या गणपतराव भाटवडेकरांना भूषणावहच होतें. क्रिकेटमधील गणपतराव जोशीच होते ते ! गणपतरावांच्या बदलीमुळें यवतमाळ संघ मोडकळीस आला. हरिकिशोरांच्या मृत्यूमुळें तो साफच झाला.

त्या काळीं पिचची निगा घेत नसत. मॅटिंगवर खेळ होई, त्यावर खडे असत, तर मैदानभर गोखरांचे काटे पसरलेले असत. पण असल्या बिकट परिस्थितींत सप्टेंबर-ऑक्टोबर मध्यें कित्येकदा पावसांतहि क्रिकेटचे सामने रंगत असत. पिच आणि बुइकेट यांचें नसतें स्तोम माजत गेलें तें पुढील काळांत. १९२५ सालीं मेलबोर्न येथें प्रथमच कडक इस्त्रीच्या शर्टप्रमाणें मुद्दाम तयार केलेलें पिच पहातांच विख्यात खेळाडू व्हिक्टर ट्रंपरनें आपल्या बरोबरीच्या खेळाडूजवळ हंसत उद्गार काढले. "या पिचवर आपण हजारो धांवा तर काढूच काढूं, पण केव्हांहि आउट म्हणून जाणार नाहीं !" असे उद्गार आजच्या खेळाडूकडून ऐकायला मिळतील काय ?

नागपूरला आंध्र खेळाडूंचा एक फार बळकट संघ होता. नांव मोदी टीम. हे आंध्रीय खेळाडू पी. डब्ल्यू. डी. व रेल्वेमध्यें नोकर होते. वर्णानें काळेशार. त्यांचा नेता रेल्वे गार्ड राजलिंगम म्हणून मोठा अष्टपैलू खेळाडू होता. याच संघांत नायडू असत. ते बॅटिंगबद्दल त्याकाळीं फार प्रसिद्ध होते. मला वाटतें वयाच्या चौदाव्या वर्षापासून ते शतके काढीत असत. त्यांचा स्क्वेअरकट, लेटकट, कव्हर ड्राइव्ह इतका तडाखेबंद असे कीं त्या चेंडूला हात घालण्याची क्षेत्ररक्षकाला भीतीच वाटे. त्यावेळीं क्वचित् एखादे वेळीं शतक झळकल्यावर ते सिक्सर मारीत, पण राजलिंगम् यांचा डोळा चुकवूनच. उत्तम क्षेत्ररक्षणाबद्दल हा संघ प्रसिद्ध होता. यष्टिरक्षक बुटका माणिकम्, गोलंदाज रत्नम्, स्वतः कॅप्टन अष्टपैलू राजलिंगम् आणि अकराव्या गड्यापर्यंत सर्वच भरंवशाचे फलंदाज असा संतुलित नामांकित संघ होता. या संघाला जिंकण्याचें सामर्थ्य त्यावेळीं नागपूर यूरोपियन जिमखान्यालाहि सहसा लाभलें नव्हतें. आपल्या कॅप्टनवर त्या सर्व खेळाडूंचा असलेला विश्वास, व त्याच्याबद्दल नितांत आदर असा त्या काळचा देखावा आज दिसतो काय ? या कॅप्टनलाहि शेवटचा गडी बाद होईपर्यंतसुद्धां सामना जिंकूं अशी खात्री वाटत असे. आणि तें खरें ठरत असे हेंहि आम्हीं पाहिलें आहे. राजलिंगम् यांच्या बॅटिंगची सहज सफाई पाहिली कीं दिलीपसिंहांची आठवण येते. अर्थात् दिलीप मागाहून झाले. वऱ्हाडांतील गोरे व काळे उत्तम खेळाडू पाहिल्यानंतर मला पुण्या-मुंबईत विठ्ठल, देवधर, युसूफ, बेग, बाळू, एसेम जोशी वजा करतां वरचढ कोणीच वाटले नाहींत. म्हणूनच २६ सालीं नायडूंनीं एम्. सी. सी. विरुद्ध अकरा षट्कार मारले, तेव्हां मला आनंद झाला. पण नवल वाटलें नाहीं. कारण नायडू आपल्या प्रांतांतून पूर्ण तयार होऊनच मुंबईत आले होते. १९१६ सालीं चेंज बोलर म्हणून जेव्हां त्यांना पुण्यास होणाऱ्या चौरंगी सामन्यांत प्रवेश मिळाला तेव्हां या निवडीचें थोडें हसूं आलें. पण त्या वेळीं त्यांनीं फ्रँक टॅरंटच्या दोन्ही डावांत बळी घेऊन आपलें हें नवें कसब सिद्ध केलें. कॅप्टनचे धडे त्यांनीं राजलिंगम् यांचेकडून घेतले होते. पण संघवृत्ति मात्र मोदी संघाची – अभेद्य मोदी संघाची. तिचें बाळकडू नायडूंच्या लहानपणींच मिळालें होतें. नायडूंच्या रक्तांत क्रिकेट होता, कारण त्यांचे बॅरिस्टर वडील व चुलते दोघेहि केंब्रिजचे होते. चुलत्यांचे मार्गदर्शन त्यांना नागपूरला लहानपणापासून मिळालें होतें. गुरुसमोर ते कधींहि बसले नाहींत. पांच दहा फूट दूर उभे राहून नम्रपणें नायडूंचें गुरूशीं संभाषण तेलगूमध्यें चाले. गुरूबद्दलची ही निष्ठा, हा आदर आज दिसतो का ? गेले ते दिवस !

आणखी एक क्रिकेटमधील अभूतपूर्व व्यक्ति म्हणजे कै. भाऊसाहेब भिडे. क्रिकेटचें व संगीताचें वेड म्हणजेच भाऊसाहेब ! शनिवारीं-रविवारीं टांग्यामध्यें बसलेली किंचित् आडव्या अंगाची गौरवर्ण मूर्ति—रुंद लालरेशीमकाठी धोतरांत बसलेली व्यक्ति ! पायाजवळ क्रिकेटच्या सर्व सामानानें भरलेली लांबरुंद बॅग—अशा थाटांत भाऊसाहेबांचा टांगा मैदाना मैदाना भोंवती हिंडायचा ! 'काय भाऊसाहेब, खेळतां का—?' म्हणून कोणी म्हणायचाच अवकाश, भाऊसाहेब टांग्यांतून सामानासह उतरून उभे ! त्याच धोतरावर पांढरी विजार चढवायचे, बूट घालायचे कीं स्वारी तयार ! तयारीच्या खेळापेक्षां खेळण्याची त्यांची तयारी केव्हांहि जास्त व हौस दांडगी ! केशवराव भोसलेबालगंधर्वांपासून नायडूबंधूंसारख्या उत्तम खेळाडूपर्यंत भाऊसाहेबांचा सर्वांशीं दाट स्नेह ! अशी उत्साहपूर्ण व्यक्ति आतां कोठें दिसणार ? नाहीं म्हणायला पुण्याचा बाबू टांगेवाला म्हणजे भाऊसाहेबांचा दुसरा अवतार ! उत्तम मॅच असली कीं टांग्याला झाडाखालीं उभा करून बाबू मॅचमध्यें गुंग ! शंभरीपर्यंत खेळाडू येऊं लागला कीं बाबू हाराकरतां टांगा भरधाव सोडून हार घेऊन मैदानावर पुन्हा हजर ! क्रिकेटकरतां जीव टाकणारे भाऊसाहेब आणि बाबू यापुढें दिसतील काय ?

कठीणच. गेले ते दिवस ! ● ●

अनुक्रमणिका

# आमचे पाहुणे



बेनॉ–इंग्लंडचें दुःस्वप्न

**क्रिकेटच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांत-अति-भव्य**

दुसऱ्या कसोटी सामन्याच्या विजयाचें पारडें बहुधा पाहुण्या संघाच्या बाजूलाच झुकतें कीं काय अशी खेळाच्या दुसऱ्या दिवसापर्यंत क्रिकेट शौकिनांत शंकास्पद कुजबूज सुरु होती. तिसरा दिवस उजाडला, आणि जसा पटेलांतला 'घटोत्कच' अचानक प्रगट झाला व खेळाचें पारडें एकदम फिरलें. एकट्यानेंच नऊ जणांचा खुर्दा करून पाहुणे संघाची त्यानें दाणादाण उडविली. नंतरच्या कठीण परिस्थितींत आमच्या तरूण आणि उद्योन्मुख

क्रिकेट हा खेळांचा राजा—आणि ऑट्रेलिया क्रिकेटचा राजा! क्रिकेट हा खेळ इंग्लंडचा, पण तो खेळावा ऑस्ट्रेलियनांनींच! इंग्लंडनें या खेळाची प्राणापलीकडे जोपासना केली, पण तो वैभवाला नेण्यांत ऑट्रेलियाचाच भाग जास्त आहे! कानडा, वेस्ट इंडीज, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान, सीलोन—इंग्लिश माणूस जिथें जिथें गेला तिथें तिथें त्यानें ख्रिश्चन धर्मापेक्षांहि या खेळाचा प्रसार जास्त केला—पण हा खेळ सर्वतोपरी आत्मसात् करून रक्तांत भिनवला तो ऑस्ट्रेलियानें!

क्रिकेटवर एवढें प्रभुत्व ऑस्ट्रेलियानें कसें मिळविलें? याचें मूळ ऑस्ट्रेलियाच्या भूमींत आहे. मॅकार्थे, ट्रंपर, 'गव्हर्नर जनरल' मॅकार्टनी, स्पॉफर्थ, ग्रिमेट, ओरेली, ओल्डफील्ड अशा एकापेक्षां एक थोर खेळाडूंचें पीक या भूमींत निघालें. इंग्लंडच्या तोडीस तोड असे इतिहास घडवणारे आणि स्वतःचें पर्व निर्माण करणारे खेळाडू या भूमीनें निर्माण केले.

माणसें थोडीं आणि भूमि जास्त असलेल्या ऑस्ट्रेलिया देशांत संपन्नता आणि त्यांतून येणारें स्वास्थ भरपूर आहे. इतर देशांच्या धकाधकीत किंवा झकाझकींत न येणारें त्या देशाचें जीवन सुखी आणि शांत आहे. त्यामुळेंच आपापल्या आवडत्या क्षेत्रांत माणसाला वावहि चांगला मिळतो, आणि मोजकीं माणसें झटकन् पुढें येतात. निसर्गाच्या ह्या पाठबळामुळेंच ऑस्ट्रेलियन तरुण खेळाडू सदा उमदे, मजबूत बांधणीचे आणि विशेष



**हार्वे**

एवढासा दिसतो पण गुप्तेला काय मारलाय्...







# आणि आम्ही



रामचन्द्र : भीम—अरे ठोक !

> ...ानीं लिहिला जाणारा भारताचा विजय !
>
> खेळाडूनीं मनाची शांति न ढळूं देतां, विवेकानें खेळून आमच्या धांवांचा आंकडा वाढवला. यांत रामनाथ केणी आणि बापू नाडकर्णी यांनीं दाखवलेलें क्रीडानैपुण्य अविस्मरणीय ठरावें. आणि पांचव्या दिवशीं पुन्हा जसू पटेल आणि उम्रीगर या दोघांनीं अतिबलाढ्य आणि अजिंक्य अशा ऑस्ट्रेलियन संघाचा अश्वमेधाचा विश्वविजयी घोडा करकचून बांधून पाहुण्यानां आपलें पाणी दाखवलें.
>
> आमचा जय झाला, आम्हीं विजयी झालों !   २४-१२-५९

— पुरुषोत्तम धाकस

म्हणजे तडफदार आणि आक्रमक वृत्तीचे निघत असले पाहिजेत. १९४८ सालीं ब्रॅडमन निवृत्त झाला, सिड बार्न्स क्रिकेटमधून हद्दपार झाला, लिंडवॉल-मिलरचा भर ओसरला आणि हळूहळू ऑस्ट्रेलियन क्रिकेट वाईट अवस्थेला आला. दक्षिण आफ्रिकेनें त्यांच्या विरुद्ध दोन सामने जिंकून त्यांच्याशी बरोबरी केली. इथें ऑस्ट्रेलियाला ऑफस्पिनर टेफिल्डने विलक्षण धक्का दिला. ज्या क्षेत्ररक्षणासाठीं ऑस्ट्रेलियाची सर्वांत मोटी ख्याति त्याच क्षेत्रांत त्यांनीं त्याला लाजवलें. ब्रॅडमनपर्व संपल्याचें हें सर्वांत पहिलें चिन्ह. इथून पुढें वर्षामागून वर्ष ऑस्ट्रेलियाचे दिवस फार वाईट आले. गोडार्डच्या वेस्ट इंडीज संघाला तोंड देतांनाहि त्यांना बरेंचसें लौकिक पूर्वपुण्याईमुळें (आणि लिंडवॉल-मिलरच्या फाजील बंपर्समुळें) वांचवलें. त्रेपन्न सालीं हॅसेटच्या नेतृत्वाखालीं गेलेल्या संघाकडून इंग्लंडनें 'ॲशिस' काढून घेतल्या. या नामुष्कींतून वेस्ट इंडीज आणि दक्षिण आफ्रिका यांच्यावर दोन विजय मिळवून वर येण्याची ऑस्ट्रेलियानें धडपड केली पण यादरम्यान इंग्लंडनें एकदां टायसन-स्टॅथमच्या वेगावर, तर दुसऱ्या वेळीं लॉक-लेकरच्या मंद फसव्या गतीवर ऑस्ट्रेलियाला लागोपाठ पराभूत केलें. आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्यें ऑस्ट्रेलियन क्रिकेटची पातळी पार खालीं गेली, आणि इंग्लंड सर्वश्रेष्ठतेच्या सिंहासनावर आरूढ झालें. आणखी कांहीं वर्षें इंग्लंडला तिथून कोणी ओढून काढील असा संभव दिसत नव्हता.



**ओनील**
(टायसनत्रीयसन जानता नहीं !)

—पण गेल्या वर्षीं नॉर्मन ओनील नांवाचा एकवीस वर्षांचा एक तेजस्वी तारा ऑस्ट्रेलियन क्रिकेटक्षितिजावर उगवला, आणि पहिल्याच भेटींत त्यानें इंग्लंडच्या वेगाचें पिसाट भूत उधळून लावलें. ओनीलनें दिलेल्या प्रेरणेच्या प्रकाशांत पंचावन्न-छप्पनमध्यें











अनुक्रमणिका

इंग्लंडपुढें दबून गेलेला हार्वे पुन्हा पूर्वीच्याच तेजानें चमकूं लागला. मॅक्डोनल्डनें मॉरिसन्ची ज़ागा घेतली आणि बर्कनें त्याला सलामीची उत्कृष्ट जोड दिली. बिल जान्स्टनची जागा घेणारा आणि मिलरची उणीव थोडी भरून काढणारा ॲलन् डेव्हिडसन सिद्ध होताच. त्याच्या जोडीला मेकिफ हा एक नवा वेगबहाद्दर पुढें आला. इंग्लंडप्रमाणें वादळांत खडकासारखा उभा राहणारा एक बेली, मॅकाय या नांवानें ऑस्ट्रेलियानेंहि पैदा केला होता. लॅग्लीची पोकळी भरून काढणाऱ्या वॅली ग्रौटचेंहि मध्यंतरीं बारगळलेलें चापल्य याच वेळीं भरांत आलें. आणि हें संगळें ताज्या दमाचें विस्कळीत सामर्थ्य रिची बेनॉ या त्यांच्याच एका जोडीदारानें ओनीलच्या प्रेरणेनें एकवटून घेतलें. ओनील व बेनॉ यांच्या कर्तृत्वाभोंवतीं ऑस्ट्रेलियाचा एक सामर्थ्यशाली संघ उभा राहिला आणि लॉक-लेकर व टायसन-स्टॅथम यांनीं सतत तीन मोसमांत केलेल्या मानखंडनेचा सगळा वचपा या संघानें गेल्या वर्षी मेच्या बलाढ्य संघावर काढला. टायसन-स्टॅथम आणि लॉक-लेकर यांना आपण खेळूं शकतों, आणि निर्दय आक्रमक पवित्र्याच्या नि तीक्ष्ण क्षेत्ररक्षणाच्या जोरावर बेलीलासुद्धां उडवूं शकतों हें एकदां कळून चुकल्यावर रिची बेनॉ आणि कंपनीनें इंग्लंडच्या बलाढ्य संघाला एकदांहि मान वर करूं दिली नाहीं. आणि क्रिकेट खेळणाऱ्या इतर सर्व राष्ट्रांचा एक निवडक संघ काढला तर त्याला सुद्धां भारी पडेल, अशी घमेंड मारणाऱ्या इंग्लंडचा आवाज जाम बसवून टाकला. सर्वश्रेष्ठतेच्या सिंहासनावरून इंग्लंडला खालीं आणून पुन्हा ऑस्ट्रेलिया तिथें आरूढ झाला.

हेंच ऑस्ट्रेलियन क्रिकेटच्या प्रकृतीचें वैशिष्ट्य आहे. एक पर्व नाहींसें झाल्यावर कांहीं वर्षांतच दुसरें पुन्हा त्याची जागा घेतें. ब्रॅडमन गेला तर ओनील येतो, मॉरिस गेला तर मॅक्डोनल्ड येतो, लॅग्ली गेला तर ग्राउट येतो, जॉन्स्टन आणि मिलर गेले तर त्या दोघांचीहि जागा एकट्यानें भरून काढणारा डेव्हिड्सन येतो—आणि रात्र संपून पुन्हा दिवस उगवावा तसा त्यांचा क्रिकेट नव्या तेजानें चमकूं लागतो. निसार-अमरसिंगनंतर पुढें काय, म्हणून वर्षानुवर्षे त्यांना खितपत पडावें लागत नाहीं. नवीं नवीं रत्नें तिथें शोधून काढलीं जातात, आणि एखाद्या रत्नांचा वास लागला कीं त्याला वर काढण्यासाठीं सर्वजण सिद्ध असतात.

गेल्या वर्षी इंग्लंडची घमेंड जिरवणारा बेनॉचा तोच संघ आज आपल्या देशांत आलेला आहे. आमच्या कमकुवत संघाशीं खेळण्यांत त्यांना फारसा फायदा नाहीं. त्यांच्याविरुद्ध आमच्या संघानें थोडासा जरी पराक्रम केला तरी तो जगांत उठून दिसेल. पण त्यांनीं आमच्या विरुद्ध मोठमोठे पराक्रम केले तर त्याला फारशी किंमत मिळणार नाहीं. उलट आम्हीं त्यांना थोडासा धक्का दिला तरी त्यांत त्यांची मानहानि आहे. म्हणूनच आमच्याकडे यायला हे लोक फारसे तयार नसतात. त्यांचें खरें लक्ष असतें तें इंग्लंडकडे—इतरांना नाइलाज म्हणून थोडा थोडा 'चान्स', एवढेंच.

तसा ऑस्ट्रेलियन क्रिकेट आपणाला नवखा राहिलेला नाहीं. १९३५ मध्यें आलेल्या रायडरच्या अनधिकृत संघाला चारापैकीं शेवटच्या दोन सामन्यांत वझीर अलीच्या नेतृत्वाखालीं आपल्या संघानें मार दिलेला आहे. युद्धअखेरीस आलेल्या हॅसेटच्या सैनिकी संघालाहि आमच्या संघानें चांगलें उत्तर दिलें होतें. पण हे दोन्ही संघ प्रातिनिधिक नव्हते.

१९४७ सालीं अमरनाथच्या नेतृत्वाखालीं आमच्या क्रिकेट संघानें ऑस्ट्रेलियांतील पहिला अधिकृत दौरा केला. पांचांपैकीं चार सामने हरून नि एक अनिर्णीत ठेवून आमचा संघ तिथून परतला. एवढेंच कीं हजारे, फडकर, मन्कड वगैरे कांहीं खेळाडूंनीं आमचा संघ १९४६ च्या हॅमंडच्या इंग्लिश संघापेक्षां बरा असल्याचें ऑस्ट्रेलियन लोकांना दाखवून दिलें. अर्थात् हॅमंडचा संघ युद्धकाळांत नष्ट झालेल्या इंग्लिश क्रिकेटचें फळ होतें हें विसरून चालणार नाहीं. १९५६ मध्यें जॉन्सननें इंग्लंडहून परततांना आणलेला संघ प्रातिनिधिक सामर्थ्याचा होता. पण दौरा तीनच कसोटी सामन्यांपुरता मर्यादित होता. त्या तिन्ही सामन्यांत त्यांना थोडासा धक्का कलकत्त्याला गुलाम अहमदच्या गोलंदाजीनें दिला, तेवढाच.



**मॅक्डॉनल्ड**
(शैली नाहीं, पण भलताच चिवट)



**ग्राऊट**
(थोडा लॅग्ली–थोडा ओल्डफील्ड !)



**लिंडवॉल**
(विक्रमवीर ! ब्रॅडमनला मारणार ?)



**मॅकाय**
(ऑस्ट्रेलियाचा बेली)





आमच्या संघाविषयीं आपणाला सर्व कांहीं ठाऊक आहे. एका वर्षांत वेस्टइंडीज, इंग्लंड आणि आतां ऑस्ट्रेलिया या तिघांशीं सामनें खेळण्यासाठीं उभे राहिलों. पण पराभवामागून पराभव खाण्याखेरीज आमच्या संघाला कांहीं करतां आलेलें नाहीं. पण करतां आलेलें नाहीं म्हणजे करतां येणार नाहीं असें नाहीं. कॉन्ट्रॅक्टर, बोर्डे, नाडकर्णी, बेग, केणी, देसाई, सुरेंद्रनाथ, हर्डीकर, मिल्खासिंग, कुंदराम अशी तरुण मंडळी पुढें येत आहेत. या लोकांवर प्रबळ सामर्थ्याचा संघ उभा राहूं शकणार नाहीं, पण ह्या तरुणांत मागून येणाऱ्या तरुणांना विजयाची वाट करून देण्याचें सामर्थ्य खास आहे. महत्त्वाची गरज आहे ती या सगळ्यांना आपल्या कल्पक बुद्धीनें, जिंकण्याच्या ईर्षेनें स्वतः भोंवतीं बांधून काढण्याच्या उत्कृष्ट नेत्याची-काय नेम सांगावा, कदाचित् तोहि याच गड्यांतून निघेल.

---

( पान ७२ वरून चालू )

योद्धयाप्रमाणेंच तो भासत असतो. एकंदरींत फटकेबाजीच्या खेळांत जादू ही अशी असते.

स्वतःला आनंद देणाऱ्या आणि असंख्य प्रेक्षकांच्या आनंदास कारणीभूत होणाऱ्या अशा या फलंदाजाच्या फटकेबाजींत कलेचा आविष्कार होत नाहीं असें कोण म्हणेल ? त्याच्या खेळांत दिसून येणारी ती सहजता, सफाई व सौंदर्य पाहून असा फलंदाज म्हणजे एक श्रेष्ठ दर्जाचा कलावंतच आहे असें कोण म्हणणार नाहीं ? त्याच्या फलंदाजींतील तो रुबाब, तो डौल व ती ऐट लोकांच्या मनावर सदैव मोहिनी घालीत असते व त्यांतील ते लालित्यपूर्णतेनें मारलेले फटकारे, समय साधनेवरील वर्चस्व, संयम आणि तारतम्याचें ज्ञान पाहून लोक प्रमुदित व प्रफुल्लित झालेले असतात. प्रतिकूल परिस्थितीमध्यें, प्रतिपक्षाचें आव्हान स्वीकारून अशी निर्भय फटकेबाजी करण्यास फलंदाजाजवळ पराकोटीचें कौशल्य असावें लागतें. असें कौशल्य व नैपुण्य ज्या फलंदाजांत होतें ते जगांतील उत्कृष्ट प्रतीचे फलंदाज म्हणून आज ओळखले जात आहेत, व त्यांनीं गाजवलेली मैदानबहादुरी क्रिकेटच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं नमूद झालेली आहे. क्रिकेटची सारी बहार आणि वैभव, सौंदर्य आणि सामर्थ्य अशाच खेळांत आहे !

• • •



**कॉन्ट्रॅक्टर**
(सवाई मर्चंट)



**उम्रीगर**
( कांहीं खरं नाहीं ! )

ऑस्ट्रेलियन संघ कितीहि सामर्थ्यवान् वाटत असला तरी त्यालाहि मर्यादा आहेत. कोसळायला लागल्यानंतर तेहि सटासट कोसळूं शकतात. इंग्लंडची ती 'बेली छाप' चिकाटी त्यांच्या वृत्तींत फारशी नाहीं—मॅकाय हा एकच अपवाद आहे. ते कोसळूं शकतात हें टेफील्ड आणि लेकर यांनीं सर्वांत जास्त चांगलें दाखवून दिलें होतें ! १९५६ मध्यें कलकत्त्याला गुलाम अहमदनें—आणि आतां कानपूरला ह्या वर्षांत जसू पटेलनेंहि तेंच दाखवलें नाहीं काय ?

ऑस्ट्रेलियाच्या ह्या संघाकडून आम्हांला घेण्यासारखी एकच गोष्ट होती—स्वतःवरील आत्मविश्वास आणि जिंकण्याची ईर्षा. दिल्ली कानपूरला त्यांच्याचकडून आम्हीं ती शिकलों, आणि कानपूरला ती त्यांच्यावरच उलटवली. आमचीं तरुण पोरें दिसतात तितकीं वाईट नाहींत, कुठें कांहीं तरी चुकतें आहे ही मनोमन वाटणारी खात्री कानपूरला प्रत्यक्षांत उतरली आहे. जे सगळ्या जगाला भारी



**रमाकांत देसाई**
( बंपर टाकतो–पण पल्ला चुकतो ! )

आहेत त्यांना आम्ही शंभरावर धावांनीं हरवून दाखवून दिलें आहे कीं, 'भारत भी कर सकता है ! "

कानपूरनें क्रिकेटच्या सगळ्या जगाला हादरा दिला आहे. आमच्या क्रिकेटला 'कानपूर' ची ही स्फूर्ति अनेक वर्षें प्रकाश दाखवीत राहील यांत शंका नाहीं.

• •



हॅट ट्रिक्

# हाऊज् दॅट अंपायर !



हिरव्या हिरवळीवर पांढऱ्या लांब गाऊनमध्यें वावरणारी व्यक्ति नेहमींच दुर्लक्षिली जाते. रणरणत्या उन्हांत पांच पांच तास अखंड सावधानतेंत राहाणारा अंपायर म्हणजे क्रिकेटचा चौकीदारच ! अशा एक नामवंत अंपायरचें-श्री. बी. जे. मोहनी यांचें हें व्यक्तिचित्र—

—पी. गोलंदाज

एका टेस्ट सामन्यांतील ही गोष्ट ! वॅारेलसारखा दणकेबाज फलंदाज खेळतोय. विकेटच्या मागें यष्टीरक्षक म्हणून नाना जोशी डोळ्यांत तेल घालून उभा. एका लोंबत्या चेंडूवर फलंदाज वॅारेल किंचित् पुढें सरकला आणि चुकून चेंडू हुकला.

निमिषार्धांतच नाना जोशीनें बेल्स उडविल्या आणि How's that अशी आरोळी ठोकली.

लेग अंपायरनें न डगमगतां निर्णय दिला—आऊट ! !

वॅारेल क्षणभर चमकला. आणि खाली मान घालून तंबूकडे परतला. उपहाराच्या वेळीं खेळ संपला तेव्हां वॅारेलनें लेग अंपायरची गांठ घेतली आणि त्यांना आवर्जून म्हणाला— " खरोखर तुमचा निर्णय अचूक होता. माझा पाय रेषेवर होता आणि मी आऊट होतो. इतर कोणत्याहि अंपायरला हें समलें नसतें. "

आपल्या खिलाडू वृत्तीला साजेसें प्रशस्तीपत्रक वॅारेलनें ज्यांना दिले ते त्यावेळचे अंपायर म्हणजे श्री. बी. जे. उर्फ आप्पासाहेब मोहनी.

निर्णय देतांना आप्पासाहेब मोहनी फलंदाजाप्रमाणें गोलंदाजांचीहि तमा नाहीं बाळगीत. ऑस्ट्रेलियाविरूद्ध चाललेल्या एका टेस्ट सामन्यांत जॉर्ज ट्राइबचा एक चेंडू मर्चंटच्या पॅडला लागला आणि त्यामुळें जबरदस्त शंका येऊन ट्राइबनें मोठ्याने ' अपील ' केलें. मोहनींनीं तें नामंजूर केलें. ट्राइबनें परत आरोळी ठोकली. पण मोहनी डगमगले नाहींत. ते तसेच निश्चल राहिले. आरडाओरड्याचा त्यांच्यावर यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. मर्चंटच्या बॅटला चेंडू लागून तो पॅडला लागला होता आणि हें लक्षांत आल्यामुळें त्यांनीं मर्चंटला नाबाद ठरविले.

त्याहिपेक्षां त्यांनीं गेल्या वर्षी गीलक्रिस्ट सारख्या जगप्रसिद्ध गोलंदाजाला चांगलाच धडा शिकवला होता. त्याचे तब्बल बारा चेंडू त्यांनीं एका सामन्यांतच नो बॉल ठरविले आणि एवढें निर्णयात्मक धाडस दाखविण्याइतका अनुभव आणि प्रामाणिकपणा मोहनी जवळ खासच आहे.

पण तसं पाहिलं तर आप्पासाहेब मोहनी हे फारसे शिकलेले नाहींत. कॉलेजमध्येंहि त्यांनीं प्रवेश केलेला नाहीं. अंपायरला कायद्याचें थोडें ज्ञान असावें लागतें असें म्हणतात, पण आप्पासाहेबांकडे त्याचाहि अभाव आहे. वयाच्या बाराव्या वर्षापासून क्रिकेटची बॅट हातांत वागवून आणि पी. वाय. सी. जिमखान्याच्या पायरीवरून रणजी ट्रॉफीच्या आखाड्यांत उडी टाकून मोहनींनीं खेळाचें प्रत्यक्ष ज्ञान खूपच घेतलें आहे. ' रणजी ट्रॉफी ' स्पर्धा सुरूं झाल्यापासून म्हणजे महाराष्ट्र क्रिकेट मंडळाच्या स्थापनेपासून १९४२ सालापर्यंत मोहनींनी प्रथम दर्जाच्या क्रिकेटमध्यें आपलें नैपुण्य दाखविलें. सुप्रसिद्ध ऑस्ट्रेलियन खेळाडू चार्ली मेकार्टनी यानें १९३५ सालीं गोलंदाज मोहनींबद्दल—Mohani was








in my opinion the best bowler on the side and I pay a tribute to his remarkable stamina असे उद्गार काढले होते. त्यांचे क्षेत्ररक्षण तर अचूक असे. त्यांनीं मुंबईविरुद्ध एका डावांत तब्बल पांच झेल घेऊन खेळाचा कल महाराष्ट्राकडे झुकविला होता. दुसऱ्या एका सामन्यांत आठ विकेट्सहि घेतल्या होत्या. आणि तितकेच गडी झेल बाद केले होते.

या आठ वर्षांच्या काळांत त्यांची दृष्टी निर्दोष बनली, कान तयार झाले आणि अनुभव संपन्न झाला. क्रिकेटियरचा अंपायर होणें हें फार फायद्याचें. मोहनींच्या बाबतींत नेमकें हें घडल्यामुळें अमरनाथसारखा जगप्रसिद्ध क्रिकेटियर त्यांच्यावर निहायत खूष होता. १९४८ सालीं बरोडा विरुद्ध वेस्ट इंडिज या सामन्याच्या वेळीं मोहनींनी प्रथमच अंपायरचें काम केलें आणि लगेच त्यांना टेस्टसाठीं आमंत्रण आलें.

अमरनाथ प्रमाणें वेस्ट इंडिजचा कॅप्टन जॉन गोडार्ड हाहि मोहनींवर बेहद्द खूष होता. त्यानेंहि मोहनींचेंच नांव सुचविलें होतें.

गेल्या दहा वर्षांत एकूण ३५ रणजी सामन्यांत त्यांनीं हें अंपायरचें अवघड काम कसोशीनें सांभाळलें. कसोटीच्या सामन्यांतहि त्यांचें अस्तित्व महत्त्वाचें मानलें जातें. त्यामुळें एका कसोटी मालिकेंत कोणालाहि न मिळणारा मान दोन दोन तीन तीन टेस्टकरितां अंपायरिंग करण्याचा मान त्यांना मिळालेला आहे.

याचें कारण त्यांची निर्भीड आणि प्रामाणिक मतें. मुंबईचा एक गोलंदाज मिनू पटेल यालाहि त्याचे चेंडू थ्रो पद्धतीचे असतात असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें होतें.

अशा या धडाडीमुळें इतकीं वर्षे अंपायरचें काम करून एकदांहि Controversy घडलेली नाहीं. यामुळें पंचाचें कार्य आणि कर्तव्य आणि क्रिकेटचे नियम याबाबत आप्पासाहेब मोहनी म्हणजे एक 'उभा ज्ञानकोश' आहे. कोणीहि कसलीहि शंका घेऊन त्यांच्याकडे जावें आणि त्यांनीं त्याची सहज समजूत घालावी.

अंपायर मोहनी म्हणजे भारतीय क्रिकेटचे भूषणच !



# पहिली कसोटी सामन्याची १०० री

— कोलोसस्

कॅनडांत क्रिकेटचा खेळ आज औषधापुरताहि खेळला जात नाहीं. पण तुम्हांला सांगून खरें वाटणार नाहीं कीं, जगांतील पहिला आंतरराष्ट्रीय क्रिकेट-सामना १८५९ सालीं म्हणजे बरोबर शंभर वर्षांपूर्वी खेळला गेला तो कॅनडा देशाच्याच हिरवळीवर. हा सामना खेळण्यासाठीं इंग्लिश खेळाडूंचा खास संघ साता समुद्राचा प्रवास करून कॅनडा देशांत आला होता. या घटनेनंतर तब्बल दोन वर्षांनीं म्हणजे १८६१ सालीं इंग्लंडच्या संघानें ऑस्ट्रेलियाचा दौरा केला अन् रक्षाकरंडकासाठीं होणाऱ्या झटापटीची नांदी झाली.

पण इंग्लंडांतील उत्कृष्ट खेळाडूंची साक्षेपानें निवड करून उभा केलेला संघ स्वखर्चानें परराष्ट्रांच्या दौऱ्यावर पाठविण्यास एम्. सी. सी. नें प्रथम अनुमति दिली ती १९०३ सालीं. तत्कालीन उत्कृष्ट खेळाडूंचा समावेश असलेला इंग्लंडचा संघ १८५९ त उभारण्यांत पुढाकार घेतला तो नॉटींगहॅम् येथील बुइल्यम क्लार्क या गृहस्थांनीं. क्रिकेटच्या विकासाच्या इतिहासांत या गृहस्थांचें नांव सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवावें लागेल इतकी त्यांची कामगिरी मोलाची आहे. १७९८ तला त्यांचा जन्म. पुरेपुर २० वर्षे ते इंग्लिश क्रिकेटच्या क्षेत्रांत आघाडीवर मिरवीत होते. क्रिकेटविषयक त्यांच्या बहुमोल कामगिरीबद्दलच अखेर लोकांनीं त्यांना आदरानें 'जनरल' ही पदवी बहाल केली.

इंग्लंडमध्यें सामने खेळण्यासाठीं एक उत्कृष्ट खेळाडूंचा संघ उभारणें हें अंतीं 'क्रिकेटच्या आणि बॅट-बॉल तयार करण्याच्या व्यापाराच्या दृष्टीनें' अतिशय हितावह ठरणार आहे अशी त्यांची धारणा होती. ही गोष्ट लक्षांत घेतां इंग्लंडमधील ( आणि पर्यायानें जगांतीलहि ) 'धंदेवाईक खेळाडूं' चा पहिला संघ तयार करण्याचें श्रेयहि त्यांच्याकडेच जातें. त्यांनीं उभारलेला 'ऑल इंग्लंड इलेव्हन' हा संघ इतका प्रसिद्ध झाला होता कीं, पृथ्वीच्या पाठीवर तो जेथें गेला तेथील सर्व लोकांचें लक्ष त्यानें आपल्याकडे आकर्षित करून घेतलें होतें. या संघाविरुद्ध दोन हात करायाची आपल्याला संधी मिळावी अशी प्रत्येक होतकरू खेळाडूची महत्त्वाकांक्षा असे. या संघाविरुद्ध खेळण्याचें भाग्य ज्या खेळाडूंच्या वाट्यास येई त्यांना स्थानिक मंडळींत आपोआपच मानाचें पान मिळत असे.

१८४६ सालच्या अखेरी अखेरीस 'ऑल इंग्लंड इलेव्हन' संघाचा पहिला सामना 'ट्वेंटी ऑफ् शेफील्ड' या संघाबरोबर हाईड पार्क मैदानावर झाला. या नंतर तेरा वर्षांनीं, बारा निवडक धंदेवाईक खेळाडूंचा संघ कॅनडा आणि अमेरिका या दोन देशांच्या स्वारीवर निघाला. हा संघ पाठविण्याची कल्पना प्रथम निघाली १८५६ सालीं. इटन आणि केंब्रिज येथील एक प्रसिद्ध क्रिकेटपटु श्री. डब्ल्यू. पी. पिकरींग आणि तत्कालीन क्रीडाक्षेत्रांत प्रतिष्ठा मिळविलेला मॉन्ट्रियल क्रिकेट-क्लब यांनीं या कामीं पुढाकार घेतला होता. दौऱ्यावर येणाऱ्या बारा खेळाडूंपैकीं प्रत्येकाला, प्रवासाचा वगैरे खर्चवेंच वजा जातां, कमींत कमी ५० पौंडांची तरी रक्कम मिळण्याची हमी करारानुसार मॉन्ट्रियल क्रिकेट क्लबानें घेतलेली होती. मॉन्ट्रियल, न्यूयार्क, फिलोडाफिया, रॉशिस्टर आणि हॅमिल्टन येथें असे पांच आणि 'ट्वेंटी टू ऑफ् दि यू. एस्. ए.' या संघाबरोबर दोन असे एकूण सात सामने इंग्लंड संघाला खेळावयाचे होतें.

इंग्लंडच्या संघांत एकापेक्षां एक वरचढ असे खेळाडू होते. क्लर्कनें स्थापलेल्या 'ऑल इंग्लंड इलेव्हन' या विख्यात संघांतील एक अत्युत्कृष्ट फलंदाज म्हणून नांवारूपास चढलेला जॉर्ज पार हा खेळाडू या संघाचा कर्णधार होता.



अनुक्रमणिका







विल्यम कफिन यानें या दौऱ्याचा अतिशय वाचनीय असा वृत्तांत आपल्या 'सेव्हंटी-वन नॉट औट' या पुस्तकांत लिहून ठेवला आहे. या पुस्तकांत प्रत्येक खेळाडूची फलंदाजी व गोलंदाजी यांची जी आंकडेवारी दिली आहे तीवरून असें दिसतें कीं, या संघाची निवड करतांना जास्तींत जास्त काटेकोरपणा दाखविला गेला होता. संघाचा कर्णधार जार्ज पार हा तर त्यावेळचा 'चँपियन' फलंदाज होता. विल्यम क्लार्कच्या निधनानंतर 'ऑल-इंग्लंड इलेव्हन' संघाचें कप्तानपद म्हणूनच त्याच्याकडे अगदीं ओघानें आलें होतें.

त्याचाच सहकारी जेम्स ग्रंडी हा एक अतिशय यशस्वी आणि धीमा गोलंदाज होता. त्याच्या फेकीचा मारा इतका अचूक असे कीं स्टंपच्या जागीं ठेवलेली चीजची वडीहि तो बेमालूम उडवीत असे.

याच्या उलट जॉन जॅक्सनचें होतें. ग्रंडीची गोलंदाजी जितकी संथ तितकीच याची धोकेबाज. त्याच्या भयंकर गोलंदाजीवरूनच त्याला 'राक्षस' हा किताब मिळाला होता. या राक्षसानें एकदां सात चेंडूंत सहा गडी बाद करण्याचा विक्रम केला होता. हा त्याचा विक्रम मोडण्याचें कसब आजवर एकाहि गोलंदाजानें दाखविलेलें नाहीं. पंचसारख्या दर्जेदार विनोदी नियतकालिकानेंहि जॅक्सनच्या कर्तबगारीचें तोंड भरून कौतुक केलें होतें.

१८६१ सालीं ऑस्ट्रेलियाला गेलेल्या संघाचें नेतृत्व पुढें ज्याच्याकडे आलें तो स्टीव्हनसनहि याच संघांतून खेळत होता. सरे परगण्यांतील हा धंदेवाईक खेळाडू क्रिकेटच्या सर्व अंगांत प्रवीण होता.

पंधरादिवसाच्या समुद्र पर्यटनानंतर ७ सप्टेंबर रोजीं हा संघ लिव्हरपूलहून सेंट लॉरेन्स बंदरावर उतरला. इंग्लंडचा संघ हा कॅनेडियन संघापेक्षां निश्चितच बलवत्तर होता. कॅनेडियन खेळाडूंना इंग्लिश गोलंदाजाच्या-अन् त्यांतल्या त्यांत पहिल्या गोलंदाजीवर खेळणें जवळ जवळ अशक्यप्रायच होऊन बसलें होतें.

न्यूयॉर्क मध्यें 'युनायटेड स्टेटस् ट्वेंटीटू' या संघाविरुद्ध इंग्लंड इलेव्हनचा जो सामना झाला तो पाहण्यास सुमारें २५००० अमेरिकन प्रेक्षक उपस्थित होते. इंग्लंडच्या संघानें हा सामना अगदीं चुटकीसरशी जिंकला होता. अमेरिकेच्या संघांत कांहींच दम नव्हता. एक डाव आणि ६४ धावांनीं इंग्लंडचा विजय झाला होता.

मग एक आठवडा विश्रांति, मेजवान्या, सहायात्रा यांत गेला. त्यानंतर सामना झाला तो हॅमिल्टन येथें. या सामन्यांत नांव गाजविलें विकेट कीपर हॉम लॉकीयर यानें. यष्टिरक्षणांतील त्याचें चापल्य आणि कौशल्य पाहून प्रेक्षकांचे डोळे अक्षरशः दिपून गेले. जॉन जॅक्सनसारख्या तुफानी गोलंदाजाचेहि चेंडू तो अशा कांहीं चपळतेनें परत करीत असे कीं, गोलंदाजानें चेंडू केव्हां टाकला व यष्टिरक्षकानें तो अडवून त्याच्याकडे परत केव्हां केला हेंच पहाणाऱ्याच्या लक्षांत येत नव्हतें. प्रेक्षक म्हणत, "अरे जॅक्सन चेंडू आपल्या हातांतच ठेवीत असला पाहिजे. त्यानें चेंडू टाकला असता तर तो आपणांस दिसला नसता का?" हॅमिल्टनच्या सामन्यांत इंग्लीश संघाचा दहा विकेटस्नीं विजय झाला.

रॉशेस्टरचा सामना चालू असतांना मध्येंच हिमवृष्टीला सुरुवात झाली. त्यावेळीं इंग्लंडचा संघ क्षेत्ररक्षण करीत होता. असा हा 'थंडगार' सामनाहि इंग्लंडनें चक्क एका डावानें जिंकला. इंग्लंडला परत जातांना त्यांनीं आपल्या बोटीवर मोठ्या अभिमानानें फलक लाविला होता. "सर्व सामने जिंकून आलों!"

१८६१ सालीं इंग्लंडचा संघ ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेला याचेंहि प्रमुख कारण, आधींच्या संघानें कॅनडा व अमेरिका येथें मिळविलेलें आर्थिक यश हेंच असेल.

स्टीव्हनसनच्या नेतृत्वाखालीं ऑस्ट्रेलियाला गेलेला हा संघ १८६१ सालच्या नाताळांत येथें उतरला तेव्हां १०००० लोकांनीं त्यांचें मोठ्या उत्साहानें स्वागत केलें तें उगीच नव्हे.

कॅनडा व अमेरिका या दोन्ही राष्ट्रांत आज क्रिकेट नांवापुरतेंहि उरलेलें नाहीं. अशा स्थितींत या खेळाचा पहिला आंतरराष्ट्रीय (व कसोटीचाहि) सामना या देशांतून खेळला जावा हें आज कसेंसेंच वाटतें नाहीं?

आज—१९५९ सालीं-ऑस्ट्रेलियाचा बलाढ्य संघ भारताच्या दौऱ्यावर आला आहे. उंदीर मांजराला खेळवतें तसा हा संघ भारतीय संघाला खेळवीत आहे. पण शंभर वर्षांपूर्वी याच राष्ट्राला क्रिकेट कशाशी खातात हेंहि माहीत नव्हतें. त्या वर्षी क्रिकेटचे कसोटी सामने चालले होते ते कॅनडा व अमेरिका या राष्ट्रांत.

काळाचा महिमा अगाध हेंच खरें!

•••

(पान ६७ वरून)

केली नाहीं, आणि आज मुंबई सरकारची दृष्टि बरीच निवळली आहे.

वृत्तीचे शांत, निगर्वी आणि मनमिळाऊ असल्यामुळें अनेक चांगलीं माणसें त्यांना मिळालीं. पण त्याचबरोबर निःस्पृहता आणि निःपक्षपातीपणा यामुळें कांहीं माणसें त्यांच्याजवळून दूरहि गेलीं!

याच निःपक्षपतीपणामुळें त्यांच्या अनुभवाचें परिश्रमाचें व्हावें तेवढें चीज आमच्या क्रिकेटच्या सत्ताधिकाऱ्यांना करून घेतां आलें नाहीं. सी. सी. आय्. मध्यें कांहीं दिवस ते सेक्रेटरी म्हणून काम पाहत होते. तिथें राहून कांहीं भरीव करतां येईल अशी त्यांची समजूत होती. पण ती फोल ठरली.

क्रिकेटच्या भल्यासाठीं बॉंबे क्रिकेट असोसिएशन, सी. सी. आय्. किंवा इतरहि अनेक बडीं क्रिकेट धेंडें यांचा कटु अनुभव येऊनहि दिलीपसिंहजीनीं आपल्या कार्यावर त्याचा परिणाम होऊं दिला नाहीं. सरकार आणि क्रिकेट अशीं दोन पारडीं उभीं राहिलीं कीं त्यांचें वजन स्वतःच्या सरकारी स्थानाची फिकीर न करतां क्रिकेटच्याच पारड्यांत पडत होतें. डिमेलो साहेबांनी कांहीं म्हटलें तरी हिंदी क्रिकेटसाठीं दिलीपसाहेबांनीं काय केलें हें चांगल्या माणसांना ठाऊक आहे. खुद्द सरकारनेंहि तें जाणलें, आणि स्पोर्टस कौन्सिलवर त्यांची नेमणूक केली. पण हें कार्य अर्धवट टाकून त्यांना जावें लागलें.

कोणत्याही क्षेत्रांतली थोर व्यक्ति जाते तेव्हां औपचारिकतेनें त्या क्षेत्राचें नुकसान झालें असें आपण म्हणतों. पण ज्यांच्या मृत्यूनें खरोखरच नुकसान होतें अशा व्यक्ती थोड्या असतात. दिलीपसिंहजी हे त्या थोड्यांशांतले होते.

नवानगरचा हा राजपुत्र क्रिकेटचाहि राजपुत्र होता. तो अखेरपर्यंत राजपुत्रच राहिला. क्रिकेटच्या आजच्या संधिसाधु लोकांच्या गोतावळ्यांतहि ते राजपुत्राप्रमाणेंच आपल्या वेगळ्या तेजानें तळपत राहिले.

दिलीपसिंहजींच्या मनाला अखेर अखेर एकच गोष्ट लागून राहिली होती. ती म्हणजे डिमेलो साहेबांचे उद्गार—"दिलीपसिंहजींनीं हिंदी क्रिकेटसाठीं काय केलें?" ••







अनुक्रमणिका

# भारताचे तज्ञ क्रिकेट शिक्षक

पहिल्या कसोटी सामन्यांत ऑस्ट्रेलियन संघानें भारताची जी दाणादाण उडविली त्याचीं इतर कारणें कांहींहि असोत. पण एक गोष्ट मात्र खरी कीं भारतीय क्रिकेटचा दर्जा खालावला आहे. —अशा परिस्थितींत देशांतील तरुणांना उत्कृष्ट क्रिकेट शिक्षकांची फार फार गरज आहे. त्यासंबंधींची नामवंत भारतीय क्रिकेट शिक्षक **श्री. कमल भांडारकर** यांचीं हीं मतें.

**— क्री डा प्रे मी**

क्रिकेटचा शिक्षक जर खेळणारा असेल तर तो उत्तम शिक्षक होऊं शकेल. याला उदाहरणच द्यावयाचें झाल्यास इंग्लंडच्या आल्फ गोव्हरचें देतां येईल. गोव्हर हा इंग्लंडचा टेस्ट खेळाडू. स्वतःची टेस्ट क्रिकेट कारकीर्द संपल्यानंतर तो स्वस्थ बसला नाहीं, त्यानें आपल्या अनुभवसिद्ध ज्ञानाचा उपयोग तरुण होतकरू खेळाडूंना द्यावयाचें ठरविलें व त्यासाठीं एक कोचिंग इन्स्टिट्यूटहि स्थापली. आज तो जगांतला एक श्रेष्ठ दर्जाचा शिक्षक समजण्यांत येतो. तीच गोष्ट खरे परगण्याचा कोच सॅटम याची. तोहि खेळाडू होता व त्याचें मार्गदर्शन खरे परगण्याला मोठेंच उपकारक ठरलें. भारतांत या बाबतींत दिलीपसिंहांचे उदाहरण उल्लेखनीय आहे. त्यांचा खेळाचा गाढा अभ्यास, अनुभवानें मिळवलेलें ज्ञान केवळ अद्वितीय होतें. त्याचाहि त्यांनीं देशांतील सर्व क्रिकेट रसिकांस उपयोग करून दिलेला आहे. दिलीपनंतर आपल्या देशांतील दुसऱ्या क्रिकेट शिक्षकाचें नांव घ्यावयाचें झाल्यास तें कमल भांडारकराचेंच घ्यावें लागेल.

भांडारकर स्वतः आघाडीचे फलंदाज व उत्कृष्ट यष्टीरक्षक होते. ते १९३५ ते ५२ पर्यंत रणजी ट्रॉफी सामन्यांत होळकर व महाराष्ट्र संघाकडून खेळले. त्यांच्या सर्वोच्च धांवा २०५ असून त्यांनीं वेस्टर्न इंडिया स्टेटस् विरुद्ध पुण्याला १९४८-४९ सालीं केल्या होत्या. याच वेळेला निंबाळकरांनीं नाबाद ४४३ धांवा केलेल्या होत्या. निंबाळकरांबरोबर खेळून भांडारकरांनीं दुसऱ्या जोडीच्या भागीदारींत तब्बल ४५५ धांवा केलेल्या होत्या. दुसऱ्या विकेटसाठीं झालेलें हे एक जागतिक रेकॉर्डच आहे. तें अजून अनुल्लंघनीय ठरलेलें आहे. शिवाय यष्टीरक्षणांत होळकर विरुद्ध सीलोन या १९४८ सालीं कोलंबोला झालेल्या सामन्यांत भांडारकरांनीं स्वतः ७ विकेटस् घेतलेल्या होत्या. पण या पराक्रमाची माहिती आमच्या क्रिकेट रसिकांना नाहीं. होळकर संघानें जेव्हां एकदां नऊशेच्या वर धांवा केल्या होत्या त्या वेळीं त्यांच्याकडून ज्या सहा फलंदाजांनीं शतकें केलेलीं होतीं त्यांत भांडारकर हेहि एक होते. १९३९ च्या पंचरंगी सामन्यांत त्यांना हिंदु संघांत स्थान मिळालेलें होतें. अशा रीतीनें प्रथम दर्जाच्या क्रिकेटचा भांडारकरांना दीर्घ अनुभव आहे.

हा दीर्घ अनुभव घेत असतांनाच त्यांनीं खेळाचा व्यासंगहि सुरू केला व वाढवला. इतर खेळाडू करतात त्याप्रमाणें नुसतें खेळ-सामने व वैयक्तिक विक्रम यांतच लक्ष दिलें नाहीं, तर क्रिकेटच्या शास्त्रोक्त शिक्षणाचा विचारहि जातां जातां केला. मिळेल त्यावेळीं डेनिस कॉम्प्टन, ज्यू हार्डस्टाफ ( हे दोघे पूर्वीं भारतांत खेळले होते. ) सी. के., हजारे, अमरनाथ व दिलीप यांच्या बरोबर त्यांनीं चर्चा केली आहे. त्याचप्रमाणें सीलोनमध्यें जन्मलेल्या पण इंग्लंडमध्यें एका परगण्याकडून खेळणाऱ्या डॉ. गुणशेकर कडूनहि भांडारकरांना उत्तम मार्गदर्शन झालें. वेळोवेळीं झालेली चर्चा केवळ गप्पांच्या स्वरूपांत नसे, तर ती प्रात्यक्षिकासह होत असे. वरील सर्व खेळाडूंच्या सूचना, खेळण्याच्या पद्धतीचे महत्वाचे नियम भांडारकरांना कळल्यामुळें त्यांचा कल क्रिकेट शिक्षणाकडे विशेषच झुकला. त्यांतच त्यांना वाडिया कॉलेजमध्यें क्रिकेट संघाला शिक्षण देण्याची 'पगारी संधि' मिळली. तेथेंहि त्यांना मिळालेल्या संधीचा चांगला उपयोग करून आपल्या कल्पना मूर्त स्वरूपांत कशा आणतां येतील या संबंधीं प्रयोग केले व त्यांत यश मिळाल्यानंतर स्वतःचे आखाडे तयार केले.

पुढें राजकोटला दिलीपसिंहाच्या संचालनानें एक शिक्षक शिबिर स्थापण्यांत आलें त्यासाठीं भांडारकरांची निवड झालेली होती. भांडारकर आजहि म्हणतात कीं फलंदाजीसंबंधींच्या ९० टक्के सूचना मला दिलीपसिंहांकडून मिळाल्या आहेत आणि त्या फारच मोलाच्या आहेत. वरील शिक्षण शिबिरांत क्रिकेट शिक्षकांना तयार करण्याचें प्रयत्न झाले व त्यांतूनच भांडारकरांसारखा हिरा बाहेर पडला.

तेथून क्रिकेट-शिक्षक म्हणून बाहेर पडल्यानंतर भांडारकरांनीं पुण्याला अमृतकुंवर योजनेच्या मार्फत शालेय व विद्यापीठांतील खेळाडूंना क्रिकेटशिक्षण देण्याची जबाबदारी पत्करली. वाडिया कॉलेजमध्यें तर ते तेव्हांहि क्रिकेटशिक्षक होतेच. व आतांहि आहेतच. पुढें मद्रास व बंगलोर येथें त्यांना बोलावलें जाऊन त्यांच्या हातीं शिक्षक तयार करण्याच्या केंद्राचें सूत्रचालकत्व देण्यांत आलें. ही योजना कौन्सिल ऑफ स्पोर्टस्च्या विद्यमानें झाली. या ठिकाणीं भांडारकरांना फारच चांगला अनुभव आला. भारतांतील क्रिकेट खेळाडूंना व क्रिकेट प्रेमी रसिकांना क्रिकेटचे सखोल तांत्रिक ज्ञान मिळवण्याची आवड आहे व तें तळमळीनें ज्ञान मिळवूं इच्छितात हें त्यांना येथें दिसून आलें. सर्वजण शिस्तपालनाच्या बाबतींत आज्ञाधारक तर होतेच, पण भांडारकरांच्या सूचना अंमलांत उतरवण्यासाठीं त्यांनीं





अनुक्रमणिका

आटोकाट प्रयत्न केले. त्यांत कित्येकांना पुढें यशहि मिळालें. त्यानंतर १९५८ सालीं मुंबईला भरलेल्या 'टेस्ट कॅम्प'ला एल. पी. जयं यांचे सहकारी म्हणून भांडारकरांना मानानें पाचारण करण्यांत आलें. आणि गत-वर्षी म्हणजे १९५९ च्या एप्रिल महिन्यांत खडकवासल्यास त्यांच्याच हातीं टेस्ट खेळाडूंना सराव देण्यासाठीं उघडलेल्या शिबिराचे सर्व प्रमुख अधिकार देण्यांत आले. ही नेमणूक बोर्डानें केली. अशा रीतीनें सरकार, क्रिकेट कंट्रोल बोर्ड या दोघांकडूनहि भारतीय दर्जाचे क्रिकेट शिक्षक म्हणून आतां भांडारकरांना मान्यता लाभलेली आहे.

क्रिकेट किंवा कोणताहि खेळ शिकण्यासाठीं खेळाडूला कसरतीच्या व्यायामाचे मूलभूत सिद्धांत ठाऊक पाहिजेत आणि तो 'स्प्रिंटग' पळण्याच्या व उडी मारण्याच्या कलेंत निष्णात पाहिजे हें प्रत्येक क्रिकेटरला साधलें पाहिजे.

शालेय विद्यार्थ्यांना, कॉलेज खेळाडूंना व टेस्ट खेळाडूंना द्यावयाचें शिक्षण हें भिन्न प्रकारचें असावें, तें एकाच पातळीवरून देता येत नाहीं असेंच भांडारकरांचें मत आहे. शालेय विद्यार्थ्यांच्या खेळाचा सांचा तयार झालेलाच नसतो. कोरी पाटी असते ती. त्यांचे अवयव, व स्नायूहि बळकट व्हावयाचे असतात. ते लवचिकच असतात. त्यांना सरावानें आकार देण्याचा प्रयत्न या वेळीं शिक्षकानें केला पाहिजे. खेळाडूचा नैसर्गिक कल व गुण बघून त्याला योग्य त्या सूचना देऊन त्याप्रमाणें त्याच्याकडून काम करून घेतले पाहिजे, यावरच भांडारकरांचा भर असतो. कॉलेज क्रिकेटरांच्या सवयी तयार झालेल्या असतात. या वेळांत त्यांच्या ज्या चूका असतील त्या समूळ काढता येत नाहींत, तेव्हां स्वतःची कल्पना शक्ती व बुद्धी वापरून खेळाडूच्या खेळाला पद्धतशीर आकार देण्याचा प्रयत्न करणें जरूर असते. त्याची जी स्टाइल बनलेली असते ती न बदलतां त्यांतच त्याचा खेळ अधिक प्रभावी केला पाहिजे. टेस्ट खेळाडूची गोष्टच वेगळी असते. त्यांचा सांचाच सिद्ध झालेला असतो. त्यांना फक्त चुका दर्शवून अधिक सराव देणें आवश्यक असतें ह्या झाल्या विशिष्ट गोष्टी. तथापि सर्व साधारण महत्वाच्या गोष्टी म्हणून सततचा सराव, एकाग्रता, दीर्घ परिश्रम व सावधपणा या गोष्टी खेळाडूंच्या बाबतींत मौल्यवान् असून प्रत्येक खेळाडूनें त्यावरच भर द्यायला पाहिजे.

क्षेत्ररक्षणाच्या बाबतींत खेळाडूंना स्लिप मशिननें सराव देण्यावर भांडारकरांचा विश्वास आहे. मात्र या स्लिप मशिनला मधें पडदा असावा म्हणजे चेंडू टाकणाऱ्याचा हात कोणत्या दिशेनें जातो हें क्षेत्ररक्षकांना समजणार नाहीं व त्यांची तर्कबुद्धी व चपळता अधिक कार्यक्षम होऊं शकेल. तसेंच दूरचे झेल स्वतः शिक्षकानें खेळून एकाला गोलंदाजी टाकायला लावून स्लिप व लेगस्लिपच्या ठिकाणीं क्षेत्ररक्षकांना उभें करून तेथें त्यांना दिलेला सराव, चार कोपऱ्यांवर चार क्षेत्ररक्षक ठेवून त्यांना मैदानाच्या मधोमध असलेल्या स्टंपवर नेम मारण्यास सांगण्याची पद्धत वगैरे गोष्टीनी क्षेत्ररक्षक सुधारेल असें भांडारकरांचें मत आहे. थ्रो, पिकअप, डाईव्हस् (उडी) या साठीं कांहीं कवायती आहेत व त्या भांडारकरांनीं रचलेल्या आहेत, व त्याचा फायदा खेळाडूंना चांगला होऊं शकतो ही गोष्टहि येथें उल्लेखनीय ठरावी.

गोलंदाजी सुधारण्यासाठीं द्रुतगती गोलंदाज हा सुदृढ शरीराचा, मजबूत, व लवचिक अवयवांचा पाहिजे. हल्लींच्या तरुणांत यापैकीं एकहि गोष्ट नाहीं. द्रुतगति गोलंदाजानें सर्वांत अधिक मेहनत करायला हवी. उजव्या पायाचा आंगठा, पाय, पाठ, हात यांच्या हालचाली व त्यांतील कोन अचूक असणाऱ्याला द्रुतगती गोलंदाजी सुधारतां येईल. मंदगती गोलंदाजाच्या बाबतींतहि टप्पा व दिशा त्या दोन गोष्टी महत्वाच्या आहेत. पण त्या मिळवण्यापूर्वी त्यानें प्रथमतः 'स्पिन्' वाढवला पाहिजे. यासाठीं underhand पद्धतीनें रबरी चेंडू जास्तींत जास्त वळवण्यास त्यांनीं शिकलें पाहिजे. यासाठीं बोटें व तळहात यांचे स्नायू तयार झाले पाहिजेत. प्रत्येक गोलंदाजानें जाळ्यांत एक स्टँप ठेवून अर्धा तास ते तासभर रोज एकट्यानें गोलंदाजी केली पाहिजे व हिरवळीवर वेगवेगळ्या टप्प्यांवर खुणा करून त्यावरच चेंडूचा टप्पा टाकण्याचा ताबा मिळवला पाहिजे. 'स्विंग' वाढविण्यासाठीहि चेंडूवरची पकड व हातापायांचे अचूक व योग्य कोन साधणें जरूरच असतें.

द्रुतगती खेळण्यासाठीं फलंदाजानें नेहमीं कॉंक्रीट पीचेसवर खेळावें. तेथें चेंडू जोरानें आंत येतो. तसेंच कॉमर मॅटिंगवरहि सराव ठेवावा. तेथें चेंडू वर उसळतो व अधिक वळतो. 'विकेटच्या' तीन चतुर्थांश अंतरावरून गोलंदाजाला 'थ्रो' टाकायला सांगून फलंदाजानें शीघ्रगतीचा सराव व बंपिंगचा सराव करून घेणें जरूर आहे. बीमरला मात्र क्रिकेटमध्यें बंदी असावी.

'कॅच् देम् यंग' या तत्वावर भांडारकरांचा विश्वास आहे. पण केवळ तरुण म्हणून तरुण खेळाडूंना संघांत घेणें चुकीचें असतें. तो तरुण खेळाडू जर सामर्थ्यशाली होईल अशी तज्ज्ञांस खात्री वाटत असेल तरच त्याला टेस्टमध्यें संधि द्यावी, पण त्याला 'नर्स' करून व पायरी-पायरीनें द्यावी. • •

## टेस्ट सोडून बोट पकडली !



इंग्लिश संघ दक्षिण आफ्रिकेंत दौऱ्यावर असतांना दरबान येथें पांचवी टेस्ट मॅच सुरू होती. त्यावेळीं सामन्यास वेळेची मर्यादा नसे. त्यावेळीं आफ्रिकन खेडाळू इतके धीमेपणानें व चिकटपणें खेळले कीं एकंदर बारा दिवस झाले तरी सामना संपेना. इंग्रजांची परतीची बोट ठरली होती ती निघायची वेळ झाली व नंतर दुसऱ्या बोटीस पुष्कळ वेळ लागणार होता म्हणून हा टेस्ट सामना अर्धवट सोडून बोट पकडावी लागली. ह्या प्रकारामुळें सहा दिवसाच्यावर कोणताहि सामना लांबवू नये अशी प्रथा पडली.

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

